# नवभारत

वर्ष ९ वें ] जानेवारी १९५६ [ अंक ४ था



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

# ' नवभारत ' निधि

## -- विनंति --

' नवभारत ' मासिकाप्रीत्यर्थ डिसेंबर १९५५ अखेरपर्यंत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प व त्याकरितां एक विनंतिपत्रक ' नवभारता'च्या गेल्या जानेवारी व फेब्रुवारी १९५५ च्या अंकांतून प्रसिद्ध झालेंच आहे. त्या विनंतिपत्रकाखालीं सुमारें ७५ वर सह्या असून, सह्या करणारांमध्यें डॉ. धों. के. कर्वे, डॉ. मु. रा. जयकर, श्री. मा. श्री. अणे, श्री. बा. गं. खेर, कै. ना. म. जोशी, श्री. स. का. पाटील, प्रा. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. भाऊसाहेब हिरे, न्या. मू. वा. रा. पुराणिक, श्री. दिगंबरराव बिन्दु, श्री. माधवराव बागल, श्री. दा. वि. गोखले, श्री. ग. त्र्यं. माडखोलकर, आचार्य प्र. के. अत्रे, प्रा. शं. वा. दांडेकर, श्री. वि. स. खांडेकर, संत तुकडोजीमहाराज, श्री. ना. ग. गोरे इत्यादि महाराष्ट्रांतील निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या क्षेत्रांत कार्य करणारे थोर लोक आहेत.

' नवभारत ' निधीस सर्वांनीं आपल्या शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें, शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें अशी विंनंति वर उल्लेखिलेल्या विनंतिपत्रकांत केली आहे. १०० रु. देणगी देणारांस ' नवभारत ' मासिक दहा वर्षें मिळत जाईल. या विनंतिपत्रकाला मान देऊन सर्वांनीं ' नवभारत ' निधीस साहाय्य करावें अशी आमची सर्वांना प्रार्थना आहे.

' नवभारत ' निधीला देणगी देणाऱ्यांचीं नांवें दर अंकांतून कृतज्ञतापूर्वक दिलीं जातील.

' नवभारता'च्या गेल्या म्हणजे डिसेंबर १९५५ च्या अंकांत त्या वेळपर्यंत मिळालेल्या देणग्यांची पोहोंच व देणगीदारांचीं नांवें दिलींच आहेत. त्यानंतर आतांपर्यंत ज्यांनीं देणग्या पाठविल्या त्यांचे आम्ही आभारी आहोंत. त्यांचीं नांवें व रकमा खालीं दिल्या आहेत :

| | रु. |
|---|---|
| ' क ' ( पुणें ) | १०० |
| श्री. गंगाधर गोविन्द कानेटकर ( सांगली ) | १०० |
| श्री. दीनदयाल गुप्त ( नागपूर ) | १०० |
| | ३०० |
| मागील महिनाअखेर जमा झालेली रक्कम | ४५१३ |
| एकूण | ४८१३ |

' नवभारत ' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे : त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष), न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. बेडेकर (खजिनदार ), श्री. कृ. ना. फडके ( कार्यवाह ), श्री. मा. प. मंगुडकर ( कार्यवाह ).

' नवभारत ' निधि-समितीचें कार्यालय c/o ' नवभारत ' मासिक, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें आहे. देणग्या "खजिनदार, ' नवभारत ' निधि-समिति, ९०६ शिवाजीनगर, पुणें ४" या पत्त्यावर पाठवाव्या अशी विनंति आहे.

**लक्ष्मणशास्त्री जोशी** (अध्यक्ष)

२५।१२।१९५५ **कृ. ना. फडके** } कार्यवाह
पुणें ४ **मा. प. मंगुडकर** }







अनुक्रमणिका

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष नववें | अंक चौथा

# नवभारत

जानेवारी १९५६

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख

प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



अनुक्रमणिका






## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय, या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या वेळीं दिला आहे-- का. सं. ]

**प्रा. अ. ना. देशपांडे**— नागपूर येथील हिस्लॉप कॉलेजमध्यें मराठीचे प्राध्यापक. 'आधुनिक मराठी वाङ्मयाचा इतिहास' ( खंड १ ला. ) या पुस्तकाचे लेखक.

**श्री. विद्याधर जोहरापूरकर** ( नागपूर )— भारतीय संस्कृति व जैन साहित्य यांचे व्यासंगी.

**श्री. वा. ग. अळतेकर** बी. कॉम.— पुणें सेंट्रल कोऑपरेटिव्ह बँकेमध्यें मॅनेजिंग डायरेक्टर.

---

**वार्षिक रु. ९** **सहामाही रु. ५** **अंकास रु. १**

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

श्री. वा. रं. सुंठणकर

# मार्क्सची इतिहास-पद्धति शास्त्रशुद्ध होती काय ?

मार्क्सनें मानवाच्या विचारांना मोठी कलाटणी दिली यांत वाद नाहीं. मार्क्सच्या वेळेपासून विचारांचें एक नवें युग सुरूं झालें आहे. त्याच्या तत्त्वज्ञानाची राजकीय, सामाजिक, आर्थिक अशीं अनेक अंगें आहेत. पण त्याच्या सर्व तत्त्वपद्धतीच्या मुळाशीं इतिहासाविषयींचें विशिष्ट तत्त्वज्ञान आहे. हें त्याचें तत्त्वज्ञान भौतिक इतिहासवाद, आर्थिक नियतिवाद किंवा इतिहासाची भौतिक उपपत्ति या नांवानें ओळखिलें जातें. मार्क्सच्या त्या इतिहास-पद्धतीचा विचार करण्याचें आज योजिलें आहे.

## इतिहासाच्या विविध पद्धती

मानवेतिहास विविध घडामोडींचा आणि गुतांगुंतीचा आहे. त्यांत अनेक समस्या निर्माण होत आल्या आहेत. त्यांची कारण-मीमांसा इतिहासकारांनीं निरनिराळ्या प्रकारांनीं केली आहे. इतिहास लिहिण्याच्या अनेक पद्धती आहेत, निरनिराळे दृष्टिकोण आहेत. ऐतिहासिक घटनांच्या जंजाळांतून विशिष्ट अर्थ, विशिष्ट उपपत्ति, विशिष्ट सूत्रें शोधून काढण्याचे प्रयत्नहि जुने आहेत. इतिहासलेखनाला व्यवस्थित असा प्रारंभ प्राचीन काळीं ग्रीकांनीं केला. त्यानंतर रोमन, ख्रिस्ती, इस्लाम वगैरे पद्धती होऊन गेल्या. सबंध मध्य-युगांत ख्रिस्ती जगांत सेंट ऑगस्टिनचा इतिहासवाद प्रमाण मानला जात होता. इतिहासाची प्रक्रिया सर्वत्र एकच प्रकारें चालूं असते, ती दैवी संकल्पाप्रमाणें चालते, चांगलें-वाईट, पाप-पुण्य यांच्या झगड्यांत शेवटीं पुण्यच विजयी होतें आणि मानवजात देवनगरीप्रत पोहोंचते – असें इतिहासाचें सार सेंट ऑगस्टिननें सांगितलें. देवनगरीची प्राप्ति ही मानवजातीची अंतिम परिणति हें त्यानें इतिहासाचें उद्दिष्ट ठरविलें होतें.

१७–१८ व्या शतकांत विज्ञानाच्या प्रगतीबरोबर इतिहासाच्या पद्धतींत बदल होत गेला. रेनासान्सच्या वेळेपासून सर्वस्वीं ईश्वरी इच्छेवर अवलंबून राहण्याची प्रवृत्ति मागें पडून त्याऐवजीं मानव आणि त्याचें कर्तृत्व यांवर भर देण्यांत येऊं लागला. विज्ञान-युगाच्या प्रारंभामुळें विकासाची कल्पना बद्धमूल झाली. इतिहासाच्या क्षेत्रांत दैवी संकल्पाची जागा विकासवादानें घेतली. ही कल्पना आज बद्धमूल झाली आहे. कान्टनें म्हटलें आहे कीं, मानवजात सतत सुधारणा आणि संस्कृति यांत प्रगति करीत आली आहे आणि ही प्रगति नैतिक उद्दिष्ट गांठण्याच्या दिशेनें होत असते. कॉंडरसेट म्हणतो : “ मानवी गुणधर्मांच्या पूर्णतेला कोणताहि प्रतिबंध नसतो. कॉम्टे या तत्त्ववेत्याला ज्ञानाच्या प्रगतींतच इतिहासाची क्रिया दृग्गोचर होत होती. ”

गिऑंबतिस्ता व्हिको हा इटालिअन पंडित आधुनिक इतिहासवादाचा जनक समजला जातो. मानवजात स्वतःचा इतिहास निर्माण करते हा महान् सिद्धान्त त्यानें प्रस्थापित केला. व्होल्टेअरनें जुन्या कल्पनांना धक्का देऊन इतिहासाचा विशाल दृष्टिकोन पुढें ठेवला. त्याचा परिणाम पुढच्या काळावर झाला. मानवी व निसर्गसिद्ध कारणांनीं इतिहास घडतो असें त्यानें प्रतिपादन केलें. हर्डर आणि बकल यांनीं आपल्या इतिहास-मीमांसेंत नैसर्गिक आणि भौगोलिक परिस्थितीवर अधिक भर दिला. बकलनें मनाच्या विकासालाहि महत्त्वाचें स्थान दिलें. मानवी सुधारणा म्हणजे बाह्य घटकांवर मानवी मनानें मिळविलेला विजय असें त्यानें सांगून टाकलें.

मध्यंतरीं जें रोमँटिक युग आलें त्यांत व्यक्ति आणि विशेषतः विभूति यांना विशेष महत्त्व प्राप्त झालें. वीर-पुरुष इतिहास घडवीत असतात असा सिद्धान्त पुढें आला. कार्लाइलनें या मताचा हिरीरीनें पुरस्कार केला. मार्क्सचा गुरु हेगेल यानें इतिहासाला तत्त्वज्ञानाच्या पातळीवर आणून बसविलें. इतिहासाच्या क्रियेमध्यें कल्पना, विवेक, प्रज्ञा याला त्यानें सर्व प्राधान्य दिलें आणि त्याच्या आधारें स्वातंत्र्य-संपादना-








ची प्रगमनशील प्रक्रिया म्हणजे इतिहास असें सूत्र त्यानें ओंवलें.

## मार्क्सचा इतिहासवाद

मार्क्सच्या पूर्वी इतिहासवादाच्या अशा परंपरा होत्या. इतिहास कसा आणि कोणत्या कारणांनीं घडतो याची तपासणी करतां करतां कांहीं विशिष्ट तत्त्वें त्याच्या मुळाशीं असतात असें प्रत्ययास आल्यामुळें विचारवंतांनीं या तत्त्वांचा शोध सुरूं केला. त्यांतून निरनिराळ्या पद्धती पुढें आल्या. मार्क्सनें, त्याच्याच शब्दांत सांगावयाचें झाल्यास, हेगलची पद्धति "खाली डोकें वर पाय" होती ती उलटी फिरवून 'वर डोकें खालीं पाय' केली आणि तिला भौतिक पाया दिला. त्याच्या पद्धतीचा प्रभाव इतिहासाच्या एकंदर तत्त्वज्ञानावर बराच पडलेला आहे यांत शंका नाहीं. मार्क्सच्या इतिहासवादांत मोठा आकर्षक भविष्यवाद आहे. त्यामुळें त्याची पद्धति मोहिनी घालते आणि मनाची जबरदस्त पकड घेऊं शकते.

मार्क्सच्या पद्धतीचें वैशिष्ट्य हें कीं, साऱ्या मानवांचा इतिहास एकसंध असतो असें त्यानें सांगून टाकलें. पौर्वात्य, पाश्चात्त्य, यूरोपियन, अेशियाटिक, पर्शियन, हिन्दी, चिनी, ईजिप्ती असे इतिहासाचे भेद त्यानें पाडले नाहींत. सर्व माणसें आणि मानवसमूह – मग तीं वर्णानें काळीं, पिवळीं, तांबडीं वा गोरीं असोत, धर्मानें ख्रिस्ती, बुद्ध, जैन, हिन्दु, इस्लाम किंवा इतर कोणत्याहि पंथाचीं असोत, रानटी अगर सुधारलेलीं, मध्ययुगीन, अर्वाचीन अगर इतर कोणत्याहि काळांतील असोत, – तीं सर्व इतिहासाच्या एकाच प्रक्रियेंतून जात असतात आणि त्यांचें अंतिम साध्य एकच आहे ही कल्पना त्यानें स्पष्टपणें मांडली.

औद्योगिक क्रान्तीमुळें समाजांत झालेलें परिवर्तन मार्क्सनें स्वतः पाहिलेलें होतें. त्या क्रान्तीमुळें आर्थिक जीवनांत आमूलाग्र बदल होत होते. त्याचा परिणाम मार्क्सच्या पद्धतीवर होणें अपरिहार्य होतें. त्यामुळें मार्क्सच्या इतिहासमीमांसेंत उत्पादनाच्या शक्ती, उत्पादनाची पद्धत, उत्पादनाचें स्वरूप यावर अधिक भर दिला गेला. मानवी इतिहासाचें सिंहावलोकन करून मानवाच्या करणीच्या मुळाशीं, मानवाचें भौतिक वा आध्यात्मिक जीवन, सामाजिक, धार्मिक, राजकीय, कौटुम्बिक वगैरे संस्था, आचार-विचार आणि एकंदरींत मानवी विचारसरणी या सर्वांच्या मुळाशीं पायाभूत अशी समाजांतील उत्पादनशक्ति, उत्पादनाचीं साधनें, आर्थिक कारणें असतात असा सिद्धान्त मार्क्सनें ठांसून मांडला. मार्क्सच्या इतिहासवादाचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य हेंच आहे.

मानवजातीच्या इतिहासांत मार्क्सनें कल्पिलेल्या अवस्था म्हणजे प्राचीन आशियाई, प्राचीन यूरोपीय, सरंजामी आणि भांडवलशाही या होत. समाजाचें आर्थिक स्वरूप गृहीत धरूनच मार्क्सनें या अवस्था पाडल्या. मार्क्सच्या मतें प्राक्-ऐतिहासिक काळांत वर्ग-विरहित सामायिक समाजपद्धति अस्तित्वांत होती. यालाच 'प्राथमिक साम्यवाद' असें म्हणतात. ऐतिहासिक काळांत प्राचीन सरंजामी आणि भांडवली या अवस्थांतून बहुजनसमाजाचें अनुक्रमें गुलाम, भूदास, मजूर असें उत्क्रमण झालें आणि शेवटीं मानवी समाजाची परिणति वर्ग-विहीन साम्यवादी समाजरचनेंत होणार आहे असें मनोरम स्वप्न त्यानें रंगविलें ! आणि त्या स्वप्नराज्यांत पोहोंचण्याकरितां कामगारांच्या हुकूमशाहीची अवस्था त्यानें आवश्यक ठरविली. मानवजातीचा इतिहास हा वर्ग-युद्धाचा इतिहास आहे असा सिद्धान्त मांडून मार्क्सनें मानवेतिहासांत सतत संघर्ष चालू असतो असें गृहीत धरलें.

मार्क्सच्या इतिहासवादाची सामान्य रूपरेषा ही अशी आहे. आपली पद्धति ही शास्त्रीय ( scientific ) आहे आणि आपला इतिहासवाद हा इतिहासाचें शास्त्र तयार करतो असा मार्क्सचा दावा आहे. मार्क्सचा खटाटोप एका गोष्टीकरितां आहे. ती म्हणजे सामाजिक संबंधांत एकामागून एक होणारे बदल कसे निश्चित सुव्यवस्थित व अवश्यभावी आहेत. हें बिनचूक शास्त्रीय समीक्षेनें सिद्ध करणें ही होय.

१ या दाव्याच्या समर्थनार्थ 'कॅपिटल' या त्याच्या महान् ग्रंथाच्या प्रस्तावनेंत एका समीक्षकाचा विस्तृत उतारा त्यानें उद्धृत केला आहे. हा **समीक्षक** म्हणतो : " Marx troubles himself about one thing only : to demonstrate by means of exact **Scientific study**, the necessity of definite and orderly successions in social relations, and so far as possible, to give a perfectly correct statement of facts which serve










मार्क्सचा हा दावा कितपत योग्य आहे याचा बारकाईनें विचार करणें आवश्यक आहे.

मार्क्सच्या पद्धतीची शास्त्रीयता तपासावयाची झाली, तर दोन गोष्टींचा प्रामुख्यानें विचार केला पाहिजे. एक म्हणजे मार्क्सनें इतिहासाच्या सामग्रीचा कसा आणि कोणत्या प्रकारें उपयोग केला ? मार्क्सच्या काळांत इतिहासाचें बरेंच संशोधन झालें होतें आणि नवे पुरावेहि उजेडांत आले होते. या संदर्भांत मार्क्सचा इतिहासवाद तपासावा लागेल. दुसरी गोष्ट म्हणजे ऐतिहासिक सामग्री त्यानें बिनचूकपणें वापरली किंवा नाहीं ? इतिहासांत घडलेल्या घडामोडी आणि त्यानें केलेलें विवेचन यांचा ताळमेळ बसतो किंवा नाहीं याचाहि विचार करावा लागेल. इतिहासावरून मार्क्सनें काढलेले निष्कर्ष हे साधार आणि पुराव्यानिशीं मांडले गेले आहेत कीं नाहीं याची छाननी करावी लागेल. निष्कर्षाबद्दल मतभेद असतील तर तो प्रश्न अलाहिदा आहे. पण ज्या पद्धतीनें आणि ज्या साधनांच्या आधारें त्यानें ते निष्कर्ष काढले ते शास्त्रीय पद्धतीला धरून आहेत कीं नाहीं हें पाहणें उद्बोधक ठरेल.

## अपुरे, तोटके आधार !

बारकाईनें तपासले तर मार्क्स हा शास्त्रीय इतिहासकार म्हणून कचा वाटतो. इतिहास-लेखक या दृष्टीनें तो धोपटमार्गी (naive) होता. आणि शास्त्रज्ञ या नात्यानें त्याची भूमिका बऱ्याच वेळां टाळाटाळीची (elusive) असे, असें म्हणावें लागतें. विधानें करतांना किंवा इतिहासाचीं तत्त्वें आणि सिद्धांत पुढें मांडतांना तो जे आधार किंवा पुरावे देत असे, ते बऱ्याच वेळां अपुरे आणि असमाधानकारक वाटल्यावांचून रहात नाहींत. ' कॅपिटल् ' या त्याच्या ग्रंथांत आठशेंपेक्षां अधिक पानें आणि तीस हजारांपेक्षां अधिक ओळी आहेत. एवढ्या मोठ्या ग्रंथ-संभारांत ऐतिहासिक संदर्भ, पुरावे किंवा उतारे अवघ्या सुमारें पन्नास पानांवर आढळतील. आणि त्यांपैकीं कांहीं तर अगदींच तुटपुंजे वाटतात. मार्गारेट हॉज्जेन या विदुषीच्या म्हणण्याप्रमाणें इतिहासविषयक संदर्भाचा मजकूर पंचवीस-तीस पानांपेक्षां अधिक भरणार नाहीं.

इतिहासाचे आधार घेण्याच्या बाबतींत मार्क्सची टॉयन्बी या प्रसिद्ध इतिहासकाराशीं तुलना करतां येण्यासारखी आहे. आजच्या युगांतील श्रेष्ठ इतिहासकार म्हणून तो गणला जातो. त्याचेंहि इतिहासाचें एक विशिष्ट तत्त्वज्ञान आहे. हें तत्त्वज्ञान मांडतांना भरभक्कम आधार आणि विपुल पुरावे तो सादर करतो. मानवेतिहासाचें त्याचें संशोधन सखोल आणि गाढ आहे. एकवीस पुढारलेल्या अशा मानवी संस्कृती आणि मागासलेल्या अवस्थेंतील ६५० मानवसमूह यांची तपासणी त्यानें केली. आणि त्यांचें सम्यक् आलोडन करून आपले इतिहासविषयक निष्कर्ष त्यानें मांडले. उपलब्ध माहिती, विश्वसनीय आधार आणि भक्कम पुरावे यांची जुळणी करूनच त्यानें आपले सिद्धांत प्रस्थापित केले आहेत. मार्क्सला अशा कांटेकोर शास्त्रीय चिकित्सेची गरज वाटली नाहीं. टॉयन्बीसारखेंच सोरोकिन् या महापंडितांचें उदाहरण आहे. उपलब्ध इतिहासाचा गाढ व्यासंग आणि मानवी संस्कृतीच्या बहुविध अंगांची सखोल तपासणी करून त्यानें मानवेतिहासावर नवा प्रकाश टाकला आहे. पण मार्क्सनें आपला मार्ग अशा प्रकारें चोखाळलेला दिसत नाहीं. इतिहासाच्या तोटक्या आधारावर आपलें प्रतिपादन तो मांडीत गेला. आणि आपल्या तर्कशक्तीवर आणि निर्णयावर वाचकांनीं सर्वस्वीं विसंबून रहावें ही अपेक्षा गृहीत धरूनच त्यानें आपला इतिहासवादाचा प्रपंच केलेला दिसतो. शास्त्रीय इतिहासकाराच्या दृष्टीनें हें गौणपणाचें होय.

## एकदेशीय आधारावर इतिहासाचा डोलारा

मार्क्सच्या शास्त्रीय पद्धतीचा अपुरेपणा आणखी एका दृष्टीनें जाणवतो. ' कॅपिटल् ' या ग्रंथांत विद्यमान भांडवलशाही पद्धतीचें विश्लेषण करणें हें त्याचें मुख्य उद्दिष्ट होतें. त्या पद्धतीचे दोष दाखवून त्या दोषांतून उद्भवणारा तिचा विनाश आणि त्यानंतर जन्माला येणारी साम्यवादी आर्थिक पद्धति यांचें दिग्दर्शन त्याला करावयाचें होतें. त्याबरोबरच तिचे पूर्वापर संबंध आणि तत्पूर्व आर्थिक पद्धति यांचाहि मागोवा घेणें त्याला अवश्य होतें. ही सर्व मीमांसा करतांना मार्क्सनें इंग्लंडचेंच उदाहरण घेतलें आणि त्यावर सर्व इमला उभा केला. निरनिराळ्या देशांच्या विविध

---

for the foundation and support of his theory ".







आर्थिक पद्धतींची छाननी करणें आणि त्यांच्या तुलनात्मक अभ्यासांतून निर्णय शोधून काढणें ही शास्त्रीय पद्धति मार्क्सनें स्वीकारली नाहीं. युरोप किंवा आशिया खंडांतील विविध मानव समुदायांच्या अर्थव्यवस्थांची विशेषशी दखल न घेतां एकाच देशाच्या आर्थिक व्यापारावर त्यानें सर्व भर दिला. इंग्लंड औद्योगिक दृष्ट्या पुढारलेलें असल्यामुळें त्याचें अर्थकारण सुधारलेलें आणि सर्वांत प्रगत होतें. इंग्लंडची अर्थपद्धति म्हणजे सर्व राष्ट्रांचा आदर्श आणि भविष्यकालीन उद्दिष्ट असेंच जणूं गृहीत धरून मार्क्सनें विवेचन केलें आहे. शास्त्रीय इतिहासाच्या दृष्टीनें हें विचित्र होतें. हा एक प्रकारें भ्रम होता. एक प्रकारें ही नजरबंदीच होती. सर्वच राष्ट्रांची प्रगति इंग्लंडच्याच मार्गानें होणें शक्य नव्हतें आणि तशी ती झालीहि नाहीं. इतर राष्ट्रांची वाढ निराळ्या प्रकारें झाली. त्यामुळें मार्क्सचे आराखडे व आडाखे चुकले. इंग्लंडमधील भांडवलशाहीच्या आधारानें त्यानें वर्तविलेलें भांडवलशाहीचें मार्गक्रमण अचूक ठरलें नाहीं. सर्वांत पुढारलेलें राष्ट्र इंग्लंड म्हणून तेथें कामगार-क्रांतीची ध्वजा सर्वांत प्रथम फडकेल हें त्याचें भाकित खोटें ठरलें. इतकेंच नव्हें तर आजहि कामगार-क्रांतीचें आमिष सुधारलेल्या राष्ट्रांना नव्हे तर मागासलेल्या शेतकीप्रधान प्रदेशांना अधिक भुरळ घालीत आहे.

इंग्लंडच्या आर्थिक इतिहासाची छाननी करण्याकरितां त्यानें जो काळ निवडला तो सुद्धां मर्यादित होता. १६ व्या शतकापासून १९ व्या शतकापर्यंतचाच काळ त्यानें समोर ठेवला होता. त्यापूर्वीच्या इतिहासांत तो शिरला नाहीं किंवा त्याचें सिंहावलोकनहि त्यानें केलें नाहीं. मार्क्सच्या वेळीं उपलब्ध असलेल्या भांडवलशाहीच्या पूर्वीच्या इतिहासाचा त्यानें उपयोग केलेला दिसत नाहीं. इतरहि देशांच्या भांडवलशाहीपूर्व काळांतील अर्थपद्धतींचें परिशीलन करण्याच्या भरीस तो पडला नाही. त्यानें निवडलें तें फक्त इंग्लंड आणि तेंहि तीन-चार शतकांच्या अवधीचेंच. त्यावरून त्यानें सर्व मानवजातीसाठीं आराखडे मांडण्याचा हव्यास धरला.

## अतिव्याप्तिपूर्ण विधानें

इतिहासाची कसून छाननी करून संशोधनाच्या पद्धतीनें निर्णय घेणें, निष्कर्ष काढणें ही पद्धति न अवलंबितां अनेक ठिकाणीं मार्क्स स्वतःचीं मतें किंवा गृहीतकृत्यें ऐतिहासिक निर्णय किंवा सिद्धांत म्हणून घोषित करतो. त्यांत इतिहास-लेखनापेक्षां प्रचारकी थाटच अधिक दिसून येतो. त्याच्या ग्रंथांत अशीं कित्येक ठिकाणें दाखवितां येतील कीं, केवळ तुटपुंज्या आधारावर त्यानें अैसपैस विधानें केली आहेत. नमुन्यादाखल कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत.

वंशपरंपरागत व्यवसाय किंवा जातिसंस्था कशा उद्‌भवल्या हें सांगतांना मार्क्सनें म्हटलें[2] आहे कीं वनस्पति आणि प्राणी यांची वाढ होत असतांना त्यांच्या जाती व पोटजाती ज्या निसर्गनियमानें निर्माण होत असतात त्याच निसर्गनियमाचा मानवी सृष्टींतील आविष्कार म्हणजे समाजांतील जाती व गट होत.

इतकें व्यापक विधान करतांना मार्क्सनें घेतलेले आधार म्हणजे पहिल्या शतकांतील सिक्युलस याच्या लिखाणांतील एक उतारा आणि त्यानंतर १८३२ चा हिंदुस्थानविषयक संदर्भ एवढेच होत. या दोन संदर्भांत १८ शें वर्षांचें अंतर आहे. एवढ्या तुटपुंज्या आधारावर मार्क्सनें जातिसंस्थेच्या उगमाबद्दल व्यापक विधान केलें आहे.

दुसऱ्या एका ठिकाणीं सहकार आणि श्रमविभाग यांचें विवेचन करतांना मार्क्सनें म्हटलें आहे कीं

2 " The transformation of detail-work into the life-occupation of an individual corresponds to the tendency of earlier societies to make occupations hereditary, to petrify them into castes or to ossify them in guilds. ...... Castes and guilds are the expression of the same natural law as that which regulates the sub-division of plants and animals into species and sub-species, the only difference being that at a certain phase of development of the hereditariness of castes or the exclusiveness of guilds, it is decreed as a social law. " — ( Capital, Vol. I, p. 357 ).



अनुक्रमणिका






कोणताहि माल निर्माण करतांना आरंभीं होणारा श्रम-विभाग स्वाभाविकपणें होत असतो, त्याला येणारें स्वरूप प्रत्यक्ष प्रयोगांतून निर्माण झालेलें असतें; पण पुढें मात्र कालान्तरानें तें स्वरूप शतकानुशतकें केवळ परंपरेच्या बळानेंच रहातें; कारखान्यांतील निर्मितीचा इतिहास असाच आहे.[3] या विधानांत मार्क्सनें इतिहासाचा हवाला दिला आहे पण आधार घेऊन तें सिद्ध करण्याची काळजी मात्र घेतली नाहीं.

त्याच ग्रंथांत पैशाच्या चलनाच्या उगमाबद्दल लिहितांना मार्क्सनें म्हटलें आहे कीं प्रारंभीं भटक्या टोळ्यांनीं देव-घेवीसाठीं पैशाच्या चलनाला प्रारंभ केला; कारण त्यांच्या भ्रमणामुळें अनेक परक्या जमातींशीं त्यांचा संबंध येत असे आणि देवाण-घेवाण होत असे. हें विधान करतांना मार्क्सनें भटक्या जमातींना पैशाच्या शोधाचे जें श्रेय दिलें आहे, त्याकरितां ऐतिहासिक आधार देण्याची किंवा पुराव्यानिशीं आपलें विधान तपासून पाहण्याची आवश्यकता त्याला वाटली नाहीं.

आपली पद्धति शास्त्रशुद्ध आहे असें मार्क्सनें ठासून म्हटलें असून घडलेल्या गोष्टी शक्य तितक्या बिनचूकपणें शोधण्याचा आपण प्रयत्न केला असेंहि त्यानें म्हटलें आहे. पण तशा तऱ्हेची खबरदारी त्यानें घेतली नाहीं. त्यानें जागोजाग जीं विधानें ऐतिहासिक म्हणून घोषित केलीं आहेत त्यावरून हें दिसून येतें. हा प्रकार शास्त्रीय पद्धतीच्या चौकटींत बसूं शकत नाहीं.

**साध्य उच्च, साधनें दुबळीं !**

मानवजातीची प्राथमिक साम्यावस्था म्हणून जी अवस्था मार्क्सनें गृहीत धरली आहे, त्यासंबंधींहि असेंच म्हणतां येईल. मानवजातीची ही प्रारंभींची अवस्था निश्चित करतांना मार्क्स भक्कम पायावर उभा होता असें म्हणता येणें कठिण आहे. तुटपुंज्या माहितीच्या आधारेंच त्यानें आपला निष्कर्ष ऐतिहासिक सत्य म्हणून मांडला. त्याच्या या निष्कर्षाला ऐतिहासिक पुरावे अगर दाखले त्यानें दाखल केले नाहींत. ज्या इंग्लंडच्या इतिहासाचा त्यानें आधार घेतला त्याचा प्राचीन इतिहास उपलब्ध नाहीं. इतकेंच नव्हें तर ८-१० हजार वर्षांचा मानवजातीचा जो इतिहास उपलब्ध आहे त्यांत कोठेंहि प्रारंभींच्या अवस्थेबद्दल अंधुकशीहि कल्पना येण्याची शक्यता नाहीं. इतिहासाचा हा प्रदेश अद्याप अज्ञातच आहे, ही खरी वस्तुस्थिति आहे. या प्रकरणीं जो आधार घेतला जातो तो सध्यां ज्या मागासलेल्या आणि रानटी अवस्थेंत असलेल्या जमाती आहेत त्यांचाच होय. मार्क्स आणि इतरहि अनेक इतिहासकार या आधारावर अनुमानें बसवितात. पण तीं केवळ अनुमानेंच होत. त्यांना निश्चित ऐतिहासिक सिद्धान्त म्हणून सादर करणें हें शास्त्रीय पद्धतीला धरून नाहीं. हल्लींचे मानववंशशास्त्रज्ञ सुद्धां ही पद्धत स्वीकारूं शकत नाहींत.

प्राथमिक अवस्थेंतील या जमातींची मार्क्सची माहिति विस्तृत होती असेंहि दिसत नाहीं. अशा जमाती शेंकडोंनीं अस्तित्वांत असल्याचें त्या काळीं माहीत झालें होतें. पण त्याच्या 'कॅपिटल' ग्रंथांत अशा सहासात जमातींचा उल्लेख आहे. हेहि उल्लेख अर्धवट आहेत. प्राचीन आशिआई, ईस्ट इंडियन, अमेरिकेंतील रानटी इंडियन, बेफिन बे-च्या पश्चिम किनाऱ्यावरील रहिवाशी, पूर्वेकडील एस्किमो आणि काफीर इतकीं नांवें मार्क्सनें दिलीं आहेत. त्याचा जोडीदार ॲंगल्स् हा आपल्या ग्रंथांत याखेरीज आणखी आठ जमातींचा उल्लेख करतो. मार्क्सच्या वेळेला मानववंशशास्त्रज्ञांनीं अशा जमातींबद्दल बरीच नवीन माहिती उजेडांत आणली होती. मानववंशशास्त्राचा जनक जो टायलर हा मार्क्सचा समकालीन

3 "Cooperation based upon the division of labour, or in other words, manufacture, is, to begin with, a spontaneous growth. As soon as it has attained a certain consistency and extension, it becomes conscious, purposive, and systematic form of capitalist method of production. The history of manufacture proper shows that the division of labour peculiar to this system acquires its appropriate form empirically, ...... and that then having acquired this form, it endeavours to retain it by the force of tradition, and does sometimes thus retain it for centuries."
—(Capital, Vol. I, p. 385).







अनुक्रमणिका



होता. डार्विन आणि लायेल या शास्त्रज्ञांच्या ग्रंथांत या जमातींविषयींचें कितीतरी अधिक ज्ञान दिसून येतें. हे दोघेहि मार्क्सच्याच काळांत होऊन गेले. हें सर्व पाहतां मार्क्सनें यासंबंधीं जे आधार घेतले, ते अपुरे आणि अगदी तुटपुंजे वाटतात.

मार्क्सच्या विवेचनांत आशियाला बरेंच महत्त्व प्राप्त झालें आहे. पण येथेंहि ऐतिहासिक पुराव्यांचा अभावच अधिक जाणवतो. पौर्वात्य देशांतील समूहाविषयीं स्पष्ट कल्पना किंवा अतिपूर्वेतील लोकांच्या इतिहासाचें यथार्थ ज्ञान मार्क्सच्या ग्रंथांत सांपडत नाहीं. प्राचीन आशियाई समाज असा उल्लेख अनेक वेळां मार्क्सच्या ग्रंथांत आला आहे, तसेंच उत्पादनाची आशियाई पद्धति असेंहि मार्क्सनें पुनःपुनः म्हटलें आहे. पण त्यांची स्पष्ट कल्पना मार्क्सनें दिली नाहीं ' कॅपिटल् ' ग्रंथांत अतिपूर्वेतील देशांच्या कर्तृत्वाची अगदींच थोडी माहिती सांपडते. आणि एवढ्या अर्धवट आधारावर त्यांच्या आर्थिक पद्धतीची कल्पना करून मार्क्सनें तीं ऐतिहासिक सत्यें म्हणून मांडलीं; एवढेंच नव्हे तर त्यावर आपल्या इतिहासरचनेची उभारणी केली. ' कॅपिटल् ' ग्रंथांत हिंदुस्थान, चीन किंवा इतर पौर्वात्य संस्कृति यांचा उल्लेख येतो तो पाश्चात्त्यांच्या तृष्णेला आणि पिळणुकीला बळी पडलेले देश या अर्थानेंच. या देशांच्या इतिहासाची बारकाईनें तपासणी करून पाश्चात्त्य देशांशीं त्यांची तुलना मार्क्सनें केल्याचें दिसून येत नाहीं. मार्क्सच्या शास्त्रीय चिकित्सेंत पौर्वात्य मानवाचे अनुभव आणि त्याचें कर्तृत्व यांना विशेष असें स्थान नाहीं असें म्हणणें भाग आहे.

मार्क्सनें जी पद्धति स्वीकारिली ती म्हणजे कांहीं गृहीत कृत्यें आधीं मानावयाची आणि त्याच्या पुष्ट्यर्थ इकडचीं-तिकडचीं ऐतिहासिक उदाहरणें द्यावयाचीं. विस्तारानें संशोधन करून आणि तौलनिक अभ्यास करून ऐतिहासिक भक्कम आधारांवर सिद्धान्त प्रस्थापित करण्याची शास्त्रीय पद्धत मार्क्सनें अंगिकारली नव्हती हा त्याच्या इतिहास-पद्धतींतील मोठा दोष आहे. म्हणून कासिरेर हा टीकाकार म्हणतो त्याप्रमाणें ( "In the history of science, there is perhaps no other example where so high a purpose was pursued with such indifferent means." ) मार्क्सचें सिद्धान्त म्हणजे अनिश्चित आधारावर उभारलेल्या उच्च भराऱ्यांचें उदाहरण होय.

मार्क्सनें इतिहासांत भविष्यवादी होण्याचा प्रयत्न केला. विज्ञान किंवा शास्त्र यांच्या क्षेत्रांत भविष्यवादाला थारा नसतो. भविष्यकथन करणें आणि त्याचे पडताळे पहाणें हें शास्त्राचें काम नव्हे. ( ' Scientific inquiry ' मध्यें ) शास्त्रीय जिज्ञासेमध्यें या दोन्ही गोष्टी बसत नाहींत. फार तर संभव अगर शक्यता दिग्दर्शित करतां येतील. त्याच्यापुढची मर्यादा ओलांडली तर शास्त्राला तें धरून होणार नाहीं. मानवी जीवनांत अनेक शक्यता, अनेक विकल्प असतात; त्यांपैकीं विशिष्ट कार्यकारणभावामुळें त्या त्या काळीं इतिहास विशिष्ट मार्ग आक्रमण करतो. गतकालीन इतिहासाबद्दल जी निश्चितता सांगतां येते ती भविष्याबद्दल सांगतां येत नाहीं. इतिहासवादाचें कार्य म्हणजे विशिष्ट कार्यकारणमीमांसा शोधून काढून ठराविकच मार्ग इतिहासानें कां पत्करला हें सांगणें. भविष्यवाद सांगून मार्क्सनें शास्त्रीय इतिहासाची चौकट सोडून अभिनिवेश आणि प्रचारकी भूमिका यांचा अवलंब केला. म्हणून मार्क्सचा शास्त्रशुद्ध इतिहास लिहिण्याचा दावा लंगडा पडतो.

## चीनचा सामुदायिक शेतीचा महान् प्रयोग

गेल्या ऑक्टोबर ११ तारखेस चीनच्या कम्युनिस्ट पार्टीच्या मध्यवर्ती समितीनें शेती सामुदायिक करावयाचा निर्णय घेतला. १९५०–१९५२ च्या जमीनसुधारणाविषयक धोरणानें, ५० कोट लोकांजवळ शेतीचे लहान लहान असें ११ कोटि तुकडे आहेत. १९६० पर्यंत हे सर्व तुकडे सामुदायिक 'सहकारी' शेतींत विलीन होणार आहेत. १९५५ च्या जूनपर्यंत, ७ कोट ५० लक्ष लोकांच्या १ कोट ७० लक्ष जमीन-तुकड्यांचे ६ लक्ष ५० हजार सहकारी ' फार्म ' ( farms ) बनले आहेत. १९५६ च्या ऑक्टोबरपर्यंत आणखी १ कोट ७० लक्ष तुकड्यांचे असेच सहकारी फार्म बनणार आहेत. १९५८ च्या मार्चपर्यंत २५ कोट लोकांच्या ५ कोट ५० लक्ष जमीन-तुकड्यांचे सहकारी शेतींत रूपांतर होणार आहे. अशारीतीनें पुढें १९६० पर्यंत चीनच्या सबंध शेतीचेंच सामुदायिकीकरण होणार – चीनचा हा निर्णय अत्यंत महत्त्वपूर्ण असून त्याचे जगावर व विशेषतः आशियावर फार मोठे दूरगामी परिणाम होणार आहेत.

— आयझॅक ड्यूशर (Isaac Deutscher)
( ' रॅडिकल ह्युमॅनिस्ट'वरून ४ । १२ । ५५ )



अनुक्रमणिका






डॉ. केतकरांच्या कादंबऱ्यांतील समाजदृष्टि : प्रा. अ. ना. देशपांडे

# ' गोंडवनांतील प्रियंवदा ' : १ :

" राष्ट्र म्हणजे बायका; पुरुष नव्हे. राष्ट्ररक्षण म्हणजे बायकांचें रक्षण; पुरुषांचें रक्षण नव्हे. "

' जरा बाहेरच थांबा अं. आंत जाऊं नका. ' — त्या अर्धभग्न व अंधारलेल्या देवालयांत शिरलेली ती पिंपळाची एक लांबच लांब मुळी पाहून त्याठिकाणीं सर्प असावा असा बिंबाबाईला भ्रम झाला. त्यामुळें ती भयभीत झाली. हरिभय्यानें तिला आपल्या हातांनीं आपल्या हृदयाशीं घट्ट आवळून धरलें. कांहीं वेळानें ते दोघेहि बाहेर आले. त्यापूर्वी, पुन्हा आपणांस कदाचित् अशी संधि मिळणार नाहीं अशी शंका येऊन हरिभय्यानें बिंबाबाईस क्षणभर घट्ट आवळून धरलें व मग सोडलें. बाहेर आल्यावर बिंबाबाईनें स्वतःला लागलींच सावरून घेतलें आणि मग हरिभय्यास एक पद म्हणण्यास विनंति केली. त्यानें अत्यंत शृंगारगर्भ असें एक पद म्हणून दाखविलें. तें पद आपल्यालाच उद्देशून आहे, हें बिंबाबाईनें त्याच्याकडून युक्तिप्रयुक्तीनें काढून घेतलें. तो तिच्याजवळ सरकला. तिनें त्याला दृढालिंगन दिलें. पुढें बराच वेळपर्यंत आलिंगन – चुंबनादि विधी सुरू राहिले.

उत्तान प्रणयचेष्टांचे खेळ खेळणाऱ्या या जोडप्यापैकीं बिंबाबाई ही एक सधन विधवा आहे. पहिल्या पत्नीपासून झालेला तिला एक मुलगाहि आहे. हरिभय्या मोघे हा तिचा गायनशिक्षक आहे. तो अविवाहित आहे. दोघेहि एकमेकांवर अनुरक्त आहेत. बिंबाबाई आपल्याला अनुकूल आहे हें त्यानें आधींच ताडलेलें आहे. त्या भग्न देवालयाकडे बैलगाडींतून येतांना त्यानें आपल्या मांडीनें तिच्या मांडीस इतक्या जोरानें दाबलें कीं निजलेली बाई देखील तेवढ्या दाबण्यानें जागी झाली असती. तथापि बिंबाबाईच्या पापण्याहि हालल्या नाहींत, हें त्यानें पाहिलें आहे. प्रणयचेष्टा करीत असतांनाच दोघांनीं एकमेकांशीं विवाहबद्ध होण्याचा निर्णय घेतला. त्यांच्या चोरट्या प्रेमाच्या चाळ्यांची अखेरीस समाजमान्य अशा विवाहाच्या घटनेंत परिणति झाली. त्यामुळें त्या प्रेमाच्या चाळ्यांचें पापमय स्वरूप नष्ट होऊन तें केवळ क्षम्यच नव्हे तर इष्ट आणि आवश्यक ठरलें.

डॉ. केतकरांनीं बिंबाबाईचा हा असा पुनर्विवाह हेतुपूर्वकच घडवून आणला. विधवा-विवाहासंबंधीं आपली भूमिका मांडण्यांत त्यांनीं या विवाहाचा उपयोग करून घेतला. ज्या रीतीनें त्यांनीं हा पुनर्विवाह घडवून आणला त्या रीतीचें त्यांना समर्थन करावयाचें होतें हें उघड आहे. या विवाहाच्या निमित्तानें हरिभय्या मोघे आणि बिंबाबाई यांच्यांत जें संभाषण झालें त्यामधून डॉ. केतकरांनीं पुनर्विवाहासंबंधीचीं आपलीं जीं मतें सूचित केलेलीं आहेत त्यांचेंच आपणांस येथें निरूपण करावयाचें आहे :

१. पुनर्विवाहाला – एवढेंच नव्हे तर अविवाहित तरुण-तरुणींच्या विवाहाला सुद्धां – अनुनयाची पार्श्वभूमि असावी. आधीं प्रियाराधन, मग विवाहबंधन असा क्रम रूढ व्हावा. हरिभय्याच्या भाषेंत सांगायचें म्हणजे ' तरुणांनीं तरुणींशीं आपलें आपण लग्न जुळवावें. आईबापांच्या चोरून पाहिजे तर पत्रव्यवहार करावा; आणि स्पष्ट भाषेंत सांगायचें म्हटल्यास तरुणींस तरुणांनीं फूस लावून पळवून न्यावें. " पुनर्विवाहाच्या बाबतींत तर विवाहपूर्व अनुनय अत्यंत आवश्यक असतो; कारण " पुनर्विवाह व्हावयाचे ते लहान मुलांमुलींच्या पद्धतीनें जुळणार नाहींत. कुमारीच्या लग्नासाठीं बाप हजारों रुपये हुंडा खर्च करण्यास तयार होतो तसा विधवेसाठीं तयार होईल काय ?

---

हा या लेखाचा पूर्वार्ध असून उत्तरार्ध पुढील महिन्यांत प्रसिद्ध होईल. – का. सं.








आणि तसा होत नसतां विधवेचें लग्न कसें होईल ?". त्यासाठी बिंबाबाईंनी आपला विवाह जसा जुळविला तसा इतर विधवांनींहि आपला विवाह जुळवून आणला पाहिजे. आईबाप कुमारी मुलीच्या लग्नाइतका विधवा-मुलीच्या लग्नाकरितां खर्च करायला बहुधा तयार नसतात. त्यामुळें विधवांनीं आपल्या लग्नाच्या बाबतींत आपणच पुढाकार घेऊन प्रियाराधनाच्या साहाय्यानें तें जुळवून आणणें हाच मार्ग योग्य ठरण्यासारखा आहे. विवाहाच्या मागची मुख्य प्रेरक शक्ति प्रेम ही असली पाहिजे, हा मुख्य मुद्दा या ठिकाणीं लक्षांत ठेवण्या-सारखा आहे. आधी प्रियाराधन, मग विवाह—हा क्रम पुनर्विवाहासाठीं पाळावा, यासंबंधी जी कारण-मीमांसा या कादंबरींत दिलेली आहे ती फारच भडक भाषेंत मांडलेली आहे. हरिभय्या बिंबाबाईस समजावून सांगत आहे— "ज्या स्त्रीबरोबर आपण लग्न लावणार ती स्त्री आपल्याशीं केवळ आपल्या पोटापाण्याची सोय करण्या-साठी लग्न लावीत नाहीं, अगर कोणीहि पुरुष केवळ रात्रीच्या सोयीकरितां हवा एवढ्यासाठींच लग्नास प्रवृत्त होत नाहीं किंवा आपण हवे तसे व्यवहार केल्यामुळें मूल झालें असतां मुलाला बाप म्हणून दाखविण्यासाठीं कोणी तरी हवा म्हणून पुनर्विवाहाकरितां तयार होणार नाहीं याबद्दल तरी मनाची खात्री पाहिजे व यासाठीं विवाहपूर्व प्रेमसाधनाहि केली पाहिजे." तात्पर्य काय कीं आर्थिक स्थैर्याची ओढ किंवा कामवासनेचा प्रभाव किंवा पापावर पांघरूण घालण्याच्या साधनाचा शोध हें पुनर्विवाहाचें प्रमुख कारण न राहतां परस्परानुरक्ति ही त्याची प्रमुख नियामक शक्ति बनली पाहिजे.

डॉ. केतकरांनीं याच कादंबरींत नव्हे तर आपल्या इतर लिखाणांतहि विवाहपूर्व अनुनयाचा मोठा जोरकस आणि निष्ठापूर्ण प्रचार आणि पुरस्कार केलेला आढळून येतो. 'महाराष्ट्रीय ज्ञानकोशा'च्या ६ व्या विभागांत अनु-नयावर जो मजकूर आलेला आहे तो डॉ. केतकरांनीं तोंडीं सांगून श्री. चिं. ग. कर्वे यांनीं उतरून घेतलेला आहे. केतकरांची अनुनयासंबंधीची संपूर्ण भूमिका समजावून घेण्याच्या दृष्टीनें त्यांचा त्याविषयींचा 'ज्ञान-कोशां'तील मजकूर साररूपानें जाणून घेणें आवश्यक आहे. त्यांच्या त्या मजकुराचा आशय असा आहे : " अनुनय म्हणजे पुरुषांनीं स्त्रियांची किंवा स्त्रियांनीं पुरुषांची केलेली प्रेमयाचना. विवाह-पूर्व अनुनय, विवाहोत्तर दंपतींतील अनुनय आणि विवाहाची अपेक्षा नसतां किंवा वैवाहिक नियमा-विरुद्ध अनुनय असे अनुनयाचे तीन भाग पडतात. विवाहपूर्व अनुनय हा सर्व देशांत दृष्टीस पडत नाहीं. अनुनयाचे दुसरे दोन प्रकार मात्र चोहोंकडे दृष्टीस पडतात. पशुपक्ष्यांमध्यें देखील संभोगापेक्षां अनुनय आढळून येतो, मग तो मनुष्यजातींत असावा यांत नवल नाहीं. अनुनयाची विवाहांत परिणति होण्याची रीति फार अर्वाचीन आहे. वैदिक काळीं किंवा पौराणि-क काळीं अनुनयपद्धति विकासलेली दिसत नाहीं. प्रौढविवाह रूढ असला म्हणजे तेथें अनुनयपद्धतीहि रूढ असतें असें म्हणतां येत नाहीं. वेदामध्यें स्त्रियां-साठीं पुरुषांशीं अनुनय करण्याचा धंदा करणारीं माणसें अथर्ववेदांतील कांहीं सूक्तांतून येतात. गांधर्व विवाहाखेरीज इतर प्रकारच्या विवाहांतून अनुनयाचें अनुसरण आढळून येत नाहीं. सीता, द्रौपदी, सावित्री यांची जरी कथा घेतली तरी त्यांत विवाहपूर्व अनुनय दिसत नसून विवाहोत्तर पत्नीधर्म फक्त दाखविला आहे. दमयंती किंवा दुसऱ्या अनेक राजकन्यांच्या कथा पाहिल्या तरी केवळ दूरस्थ पुरुष व स्त्रिया यांनीं एकमेका-संबंधानें माहिती करवून घेऊन किंवा रूपवर्णन ऐकून झुरणें किंवा 'मला चोरून न्या' म्हणून कळविणें याच्या पलीकडे कांहीं मजल गेलेली दिसत नाहीं.

" अनुनयपद्धतीचें पहिलें अंग म्हटलें म्हणजे परिचय होय. पुष्कळशीं लग्नें अशीं होतात कीं जेथें विवाह्य तरुणतरुणींचा परिचय बऱ्याच दिवसांचा किंवा अगदीं लहानपणापासूनहि असतो; परंतु अनेक लग्नें अशींहि होतात कीं जेथें विवाहपूर्व परिचय फारच थोडा असतो. अनुनयामध्यें विवाहपूर्व ओळखीची कालमर्यादा किती असते याविषयीं कांहीं नियम सांगतां येत नाहीं. प्रथमचा परिचय जो होतो तो कुटुंबाच्या कोणातरी मित्राकडून व्हावा किंवा मुलीच्या हितचिंतकांनीं तिची व तरुणाची गांठ घालावी हें शिष्टमत आहे. घरगुती किंवा स्नेह्यामार्फत ओळखी-पेक्षां स्वयंस्फूर्तीनें व स्वयंनिर्णयानें ओळख करून घ्यावी हा प्रकार पुष्कळ तरुणतरुणींस रुचतो. अनुनयपद्धती-मध्यें एका गोष्टीबद्दल तरुण-तरुणींस खटपट करावी लागते. ती ही कीं आपण दुसऱ्याकरितां फार फिकीर बाळगतों असें दाखवावयाचें नाहीं. पुष्कळ वेळां आपलें










प्रेम दुसऱ्यापासून गुप्त ठेवावें लागतें.

" युरोपांत व अमेरिकेंत अनुनयपद्धतीच्या विकासास अनुकूल परिस्थिति आहे; कारण एक तर औद्योगिक वृद्धीमुळें तेथें स्त्रियांस बरेंच स्वातंत्र्य प्राप्त झालेलें आहे. तेथें रोजच्या व्यवहारांत स्त्रियांशीं ओळख होत असते. एका ठिकाणीं शिकणें, एका ऑफिसांत काम करणें, एका दुकानांत काम करणें, रस्त्यावरच अन्य स्त्रीपुरुषांची ओळख करणें या प्रकारांमुळें स्त्रीपुरुषांची स्वाभाविक ओळख होते. औद्योगिक परिस्थितीमुळें स्त्रियांची परिचयकक्षा वाढते एवढेंच नव्हे तर मुलींवर किंवा मुलांवर आईबापास सक्ती करतां येत नाहीं. मुलगी मिळविते, अर्जिताचा अंश बाजारभावाप्रमाणें घरखर्चास देते, उरलेले पैसे बँकेंत ठेवते. मुलगा तेंच करतो. त्यामुळें जी स्वतंत्रता येते तिचें पर्यवसान पैतृक अधिकाराच्या नियमनांत होतें.

" औद्योगिक स्वातंत्र्याशिवाय अनुनयपद्धतीस जोर देणाऱ्या संस्था म्हटल्या म्हणजे मजा मारण्याच्या जागा होत. सार्वजनिक उपवनें, नाटकें, सिनेमा इत्यादि मजा मारण्याच्या ठिकाणीं तरुण पुरुष आपल्याबरोबर मुलीस घेऊन जातात. जी मजा आपण मारावयाची तिची वांटेकरी कोणी सहचरी असली म्हणजे मजा मारण्यास अधिक आनंद वाटतो. उपवनें, नाटकगृहें, बोलपटगृहें हीं अशा रीतीनें अनुनयास अनुकूल परिस्थिति उत्पन्न करून देतात. "

अनुनयासंबंधीच्या वरील विवेचनांत डॉ. केतकरांनीं, प्राचीन काळीं आपल्या देशांत विवाहपूर्व अनुनय प्रचलित नव्हता हें दाखविलें असून, अलीकडे स्त्रियांना जी आर्थिक स्वतंत्रता प्राप्त होऊं लागलेली आहे ती अनुनयपद्धतीला विशेष पोषक आणि प्रोत्साहक आहे हें त्यांनीं प्रामुख्यानें नजरेस आणून दिलें आहे. ज्या विधवा बिंबाबाईचा या कादंबरींत विवाहपूर्व अनुनय दाखविलेला आहे, ती आर्थिक दृष्ट्या बरीच स्वायत्त होती ही बाब येथें लक्षांत घेण्यासारखी आहे. आज आपल्या मराठी समाजांत नोकरी करणाऱ्या तरुणींची संख्या दिवसेंदिवस सारखी वाढतच चाललेली आहे. एके काळीं जो बाप आपल्या तरुण मुलीला लग्न करून उजवून टाकीपर्यंत घरांत कोंडून ठेवीत असे व बाहेरच्या वाऱ्याचा स्पर्शसुद्धां होऊं नये याबद्दल डोळयांत तेल घालून दक्षता बाळगीत असे, त्याच बापावर, आज आपली तरुण मुलगी महाविद्यालयांत आणि कचेऱ्यांत सर्वस्वीं अपरिचित आणि असंबंधित पुरुषांबरोबर अनिर्बंध मनानें वावरते, हें दृश्य मुकाट्यानें पाहण्याचा प्रसंग येऊन ठेपला आहे. आपल्या समाजांत स्त्रियांना मिळूं लागलेल्या आर्थिक आणि सामाजिक स्वातंत्र्यामुळें विवाहपूर्व अनुनयाला अनुकूल अशी परिस्थिति आपल्याकडे आतां हळूहळू उदयास येऊं लागलेली आहे. आगरकरांच्या संज्ञा उपयोजून सांगायचें म्हणजे असें म्हणतां येईल कीं ' प्रियाराधन ', 'वल्लभोपासना' आणि ' स्वयंवर ' यांना अनुकूल असा काळ प्राप्त झालेला आहे. परिस्थितीच्या दडपणामुळें विवाहपूर्व अनुनयाला जी अनुकूलता लाभूं पाहात आहे तेवढ्यावर डॉ. केतकरांचें समाधान होणें अशक्य आहे. त्या अनुनयाला सहायभूत होईल अशा संस्थांच्या संचालनाला समाजानें जाणीवपूर्वक चालना दिली पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. म्हणूनच त्यांनीं ' केसरीं 'त लिहिलेल्या एका लेखांत असें सुचविलें आहे कीं, " प्रेममूलक विवाह उत्पन्न होण्यास आपणांमध्यें क्लब्स्, पार्ट्या वगैरे वाढलीं पाहिजेत. अनुकूल संस्था उत्पन्न करून दिल्याशिवाय प्रीतिविवाहासंबंधींची ओरड फोल आहे. " याच लेखांत त्यांची प्रीतिविवाह व विधवाविवाह या संबंधींची आपली भूमिका स्पष्ट स्वरूपांत मांडलेली आहे. ही भूमिका आणि ' गोंडवनांतल्या प्रियंवदे 'तील हरिभय्या मोघे याच्या मुखांतून वदविलेलीं त्या विषयावरचीं मतें यांत अर्थातच विलक्षण साम्य आहे. या लेखांत केतकरांनीं लिहिलें आहे :--

" पुरुष व स्त्रिया हीं स्वतःचीं लग्नें स्वतःच्याच प्रारंभयत्नाने करतील व तीं लग्नें परिचयजन्य प्रेममूलक होतील तर पुरुष व स्त्रिया प्रेमी जनांसाठीं समाजाची टीका व टीकेहून अधिक त्रासदायक अशी हेटाळणी सोसण्यास तयार होतील. याकरितां प्रीतिविवाह देखील आपणांत घडवून आणणें सोईस्कर केलें पाहिजे; पण प्रीतिविवाह एकाएकीं जुळत नसतो. अविवाहित स्त्रीपुरुषांस एकमेकांस भेटण्यास व गुजगोष्टी करण्यास देखील संधि सांपडावी लागते. शारीरिक साहचर्य आणि मानसिक साहचर्य यांचा निकट संबंध आहे. आज एका जातींतील तरुण-तरुणींस एकत्र येण्यास व अनुनय करण्यास संधि मिळत










नाहीं. आज विधवाविवाहांस जरी लोकमत बरेंच अनुकूल आहे तरी ते फारसे घडून येत नाहींत. याचें कारण, पोरापोरींची लग्नाची पद्धतीच विधवा-विवाहास लावली आहे, तिन्हाइतानें जमवून आणल्या-खेरीज विधवाविवाह होत नाहींत, हें होय. याचा परिणाम असा होतो कीं, शीलानें विवाहास योग्य अशा ज्या विधवा असतात त्या आपण होऊन ' माझें लग्न करून द्या ' असें म्हणणार नाहींत. तथापि त्यांचा व पुष्कळ पुरुषांचा परिचय झाला व त्यांपैकीं एखाद्यानें एखादीला जर ' माझ्याशीं लग्न करतां कां ? ' म्हणून विचारलें व त्या पुरुषासंबंधानें तिच्या मनांत अगो-दरच स्नेहभाव उत्पन्न झाला असला म्हणजे ती लग्नाला तयार होण्याचा पुष्कळ संभव आहे. जों-पर्यंत स्त्रीपुरुषांस एकत्र बसण्या-उठण्याची संधि मिळणार नाहीं तोंपर्यंत अविवाहित तरुणीचे समानशील पुरुषांबरोबर संबंध न होतां

> प्रायेण भूमिपतयः प्रमदा लताश्च ।
> यत्पार्श्वतो भवति तत्परिवेष्टयंति ॥

असा प्रकार होईल व होतोच आहे. विधवासंबंधानें हा आपणांस आज दिसत आहे, कुमारीसंबंधानेंहि थोडाबहुत आज दिसत आहे व पुढें जास्त दिसेल. ''

विवाह अनुनयोत्तरच असावा यासंबंधीं डॉ. केतकरांचा केवढा कटाक्ष असे याचा एक लहानसा पुरावा देणारा त्यांच्या आयुष्यांतला एक प्रसंग येथें निर्देशिण्यासारखा आहे. त्रावणकोरच्या बाजूला प्रवासाला गेले असतांना त्यांनीं तेथील समाजाचें जें निरीक्षण केलें त्याचें निवेदन करतांना त्यांनीं लिहिलें आहे : '' ... नंतर २–३ दिवसांनी त्रिवेंद्रम् येथें पोहोचलों. तेथें देखील आणखी एका गोष्टीचें अवलोकन झालें आणि तें म्हटलें म्हणजे तेथें स्त्रियांना स्वातंत्र्य बरेंच आहे. तरी तेथें अनुनयपद्धति उत्पन्न झाली नाहीं.... तेथील मल्याळी लोकांच्या समाजाची माहिती चांगल्या प्रकारें झाली. तेथें दिसून आलें कीं जरी त्यांच्यामध्यें प्रौढविवाह आहे आणि प्रीतिविवाह होतो तरी प्रीतिविवाह ही गोष्ट जनसंमत धरली जात नाहीं. त्रावणकोरचे दिवाण यांनीं तर प्रीतिविवाहाचें अस्तित्व नायर समाजांत नाहीं असें सांगितलें व नायर आणि ब्राह्मण यांच्या विवाहपद्धतींत जणूं काय फरकच नाहीं असें दाखविण्याची त्यांची इच्छा होती. म्हणजे जेथें स्त्रीस्वातंत्र्य आहे व नैतिक विचार अगदीं स्वतंत्र आहेत तेथील हिंदु समाजांत देखील अनुनयपद्धतीची कल्पना रुजत नाहीं. याचें कारण समाजाच्या ब्राह्मण अरिस्टॉक्रसीनें ती मान्य केली नाहीं हें होय असें वाटूं लागलें. '' डॉ. केतकरांच्या या निवेदनाचा रोख हा आहे कीं, हिंदु समाजांत ज्या ठिकाणीं प्रौढविवाह रूढ असेल, स्त्रियांना स्वातंत्र्यहि लाभलें असेल, त्या ठिकाणीं अनुनयाची प्रथा अवश्यंभावी असेलच असें म्हणतां येत नाहीं. म्हणून अनुनयाची प्रथा आपल्या हिंदु समाजांत हेतुपूर्वक आणि प्रयत्नपूर्वक रूढ करण्यावर त्यांनीं विशेष भर दिलेला आहे आणि ही सुधारणा लोकमान्य करण्याकरिता प्रथम ब्राह्मण-समाजानें त्याबाबतींत पुढाकार घ्यावा असें त्यांना सुचवावयाचें आहे.

डॉ. केतकरांच्या मतें, अनुनय हा केवळ बोलका असून भागत नाहीं वा केवळ लिखित असूनहि चालत नाहीं; तो प्रत्यक्ष सक्रिय असल्याशिवाय त्यांत रंग भरत नाहीं; त्याच्याशिवाय, एकाचें दुसऱ्यावर प्रेम आहे हें दाखवितां येत नाहीं. अनुनयाची ही पद्धति बिंबाबाईला समजावून देतांना हरिभय्या तिला सांगत आहे : '' मोठ्या झालेल्या स्त्रीपुरुषांनीं जर लग्नें करावयाचीं तर त्यांचें एकमेकांचें प्रेम तरी एक-मेकांवर असलें पाहिजे. प्रेमनिवेदन हावभावांनीं आणि क्रियांनीं जितक्या स्पष्ट रीतीनें करतां येतें तितकें स्पष्ट दुसऱ्या रीतीनें म्हणजे बोलून करतां येत नाहीं. यासाठीं अयोग्य आणि पापात्मक प्रेमाच्या जुळवाजुळवीसाठीं जो प्रकार करावा लागतो तोच खऱ्या व सद्धेतुयुक्त प्रेमाच्या जुळवणीस लागतो. ''

डॉ. केतकरांना अनुनय पाहिजे, पण त्याचबरोबर त्या अनुनयाची परिणति विवाहांत व्हावी हेंहि पाहिजे. '' समजा, पुरुष अविवाहित अगर विधुर असला आणि त्याच्याशीं एखाद्या बाईचं जुळलं आणि पुढें त्यानें तिला टाकून दिलं म्हणजे मग ?'' या बिंबाबाईच्या रास्त शंकेला उत्तर देतांना हरिभय्या तिला सांगत आहे— '' विधवांनीं पुनर्विवाह केला तर त्यांस सर्व हक्क असावे असा कायदा करण्यापूर्वीं जो विधवांस पळवून नेऊन टाकून देईल त्यास कडक शासन व्हावें. यासाठीं कायदा करावा अगर विधवांस त्यानें पळवून नेऊन पुढें सोडून दिलें तर त्या बाईस त्या पुरुषापासून पोटापाण्यासाठीं पैसा



अनुक्रमणिका








घेण्याचा हक्क शास्त्रीत करण्याचा कायदा करावा. तसा कायदा झाला म्हणजे बायकांस फसविणाऱ्या मनुष्यावर कांहीं तरी जबाबदारी उत्पन्न होईल. दोन दिवस मजा मारण्यासाठी स्त्रियांचें जन्माचें नुकसान करणारे जे सभ्य गृहस्थ समाजांत वावरतांना दृष्टीस पडतात त्यांना थोडा विचार पडेल आणि यासाठीं बायकांना पळवून नेण्यापूर्वी ही पळवून नेण्यालायक विधवा आहे कीं नाहीं हाहि त्यांना विचार पडेल व पुरुषाकडून होणारी लगट अधिक विचारयुक्त होईल आणि ती तशी झाली म्हणजे उभयतांचें प्रेमहि अधिक टिकण्याचा संभव आहे. "

कुमारीशीं किंवा विधवेशीं अनुनय करून तिच्याशीं लग्न न करतां तिला टाकून देणाऱ्या पुरुषाला समाजानें कडक शासन केलें पाहिजे या डॉ. केतकरांच्या उपर्युक्त सूचनेंतून असा स्पष्टार्थ निष्पन्न होतो कीं त्यांना अगदीं उत्तान कोटींतला सुद्धा अनुनय मान्य होता पण स्वैराचार मात्र त्यांना सर्वस्वी अमान्य आणि निषिद्ध होता.

२. पुनर्विवाहासंबंधीच्या सुधारकांच्या भूमिकेबद्दल डॉ. केतकरांनीं जळजळीत त्वेष व्यक्त केलेला आढळून येतो. केवळ पुनर्विवाहाबाबत नव्हे तर एकंदरींत सर्वच सामाजिक सुधारणांबाबत सुधारकांनीं मांडलेल्या मतांबद्दल डॉ. केतकरांनीं आपल्या सर्वच प्रकारच्या लिखाणांतून जहाल विरोध प्रकट केलेला आहे असें दिसून येतें. वस्तुतः, सुधारक हाच खरा सामाजिक सुधारणांचा वाली, अशी महाराष्ट्रांतल्या सर्वसाधारण सुशिक्षितांची समजूत आहे. सुधारकांना सामाजिक सुधारणांचें श्रेय देण्याच्या बाबतींत डॉ. केतकरांचा ठसठशीत नकार आहे. एवढेंच नव्हे तर त्यांची त्यांनीं ' न भूतो न भविष्यति ' अशी नालस्ती केलेली आहे. सुधारक पुनर्विवाहाचा पुरस्कार करतात; पण त्याला आवश्यक असलेलें विवाहपूर्व अनुनयाचें सामाजिक वातावरण उत्पन्न करण्यास मात्र साहाय्य करीत नाहीत, असा त्यांनीं सुधारकांवर ठपका ठेवलेला आहे; एवढेंच नव्हे तर हे सुधारक आधींच बिघडलेल्या किंवा स्वतः बिघडविलेल्या विधवांचें धरून बांधून उभ्या केलेल्या पुरुषांशीं लग्न लावून देतात असा त्यांच्यावर आरोप केलेला आहे. एखाद्या पुनर्विवाह-संचालक संस्थेमार्फत घडून येणाऱ्या विधवाविवाहाबद्दल डॉ. केतकरांनीं हरिभय्याच्या मुखांतून अत्यंत निंदागर्भ असे उद्गार काढलेले आहेत. हरिभय्याचें म्हणणें असें आहे कीं, " पुष्कळदां पुनर्विवाह करणाऱ्या स्त्रीपुरुषांची ओळख देखील नसते; आणि पुनर्विवाहपद्धत म्हटली म्हणजे एखाद्या पुनर्विवाहसंयोजक कंपनीच्या सेक्रेटरीमार्फत लग्न जुळवावयाचें. स्त्रीपुरुषांची लग्नापूर्वी थोडी ओळख होती व दोघांचें प्रेम होतें हें कळलें तर ती गोष्ट जणूं काय मोठी लज्जास्पद झाली ! चांगल्या घराण्यांतील विधवांपर्यंत हे सेक्रेटरी पोंचतच नाहीत. यांचीं कुळें म्हटलीं म्हणजे कांहीं मास्तरणी, कांहीं नर्सा किंवा कांहीं मिडवाईफा – ज्या बहुतकरून एक किंवा अनेक डॉक्टरांनीं पूर्वी प्रेमपात्र केलेल्या असावयाच्या. ज्या बायका पुनर्विवाहास तयार होतात त्या नर्सचें अगर मास्तरणीचें काम करून कंटाळून गेलेल्या असतात आणि दुसरा कोणीतरी पैसे मिळवून आणणारा हवा असें त्यांना वाटूं लागतें. कधीं कित्येक श्रीमंत मतलबी सुधारक आपण खराब केलेल्या स्त्रियांचा मागाहून 'अक्षतयोनि' असें सांगून भोळसर मनुष्य पाहून पुनर्विवाह लावून देतात. " सुधारक हे सामाजिक सुधारणांच्या बाबतींत परप्रत्ययनेयबुद्धि आहेत, मिशनऱ्यांच्या किंवा इंग्रजांच्या चालीनें चालणारे आहेत असा डॉ. केतकरांनी सुधारकांवर जो आरोप ठेवलेला आहे त्याचा बीजरूपानें आविष्कार या कादंबरींत झालेला आहे. हरिभय्या सांगत आहे : " पुनर्विवाहाची चाल अगर त्याची इच्छा लोकांनधूनहि निघाली नाहीं आणि विधवांमधून तर त्याहूनहि नाहीं; तर आपल्या धर्माचा आणि समाजाचा नाश करूं पाहणारे ख्रिस्ती मिशनरी – त्यांना आमच्या बायकांची फार कींव आली. त्यांचे चेले आमचे सुधारक ! " एवढेंच म्हणून न थांबतां त्यांनीं सुधारकांवर आणखी खूपच तोंडसुख घेतलेलें आहे. त्यांचें म्हणणें असें आहे कीं " सुधारकांनीं कांहींच करावयाला नको होतें; त्यांनी मरून जावयाला पाहिजे होतें आणि पाहिजे आहे. जें काय करावयाला पाहिजे तें देशाभिमानी लोकांनीं करावयाला पाहिजे होतें. ! "

डॉ. केतकरांना ' सुधारक ' ही संज्ञासुद्धां सहन होत नाहीं. त्यांना ' देशभक्त ' हीच संज्ञा अभिमानास्पद आणि खऱ्या सामाजिक कार्यकर्त्यांच्या निष्ठेची सूचक










वाटते. सुधारक हा जणूं कांहीं एक समाजद्रोही आणि राष्ट्रद्रोही प्राणी आहे असा भाव त्यांच्या लिखाणांतून प्रकट होतांना दिसून येतो.

३. विधवाविवाहाला निष्ठापूर्ण प्रियाराधनाचें निरामय अधिष्ठान मिळवून देण्यास साहाय्य न करणारे, एवढेंच नव्हे तर या सामाजिक सुधारणेच्या पवित्र प्रवाहांत अनैतिकतेचा गलिच्छ प्रवाह मिसळून देऊन त्याचें पावित्र्य हिरावून घेणारे – असे जे सुधारक त्यांच्या कार्यपद्धतीचें तर डॉ. केतकरांनीं वाभाडे काढलेच; पण त्याचबरोबर, आपल्या समाजांत विधवाविवाहाला विरोध करणारे जे बुद्रुक आणि प्रतिष्ठित लोक जुन्या काळीं होते आणि आजहि आहेत त्यांच्या विरोधांतल्या मतलबी मर्मावर त्यांनीं आपल्या रहस्यभेदी लेखणीचे अचूक पण जबरदस्त प्रहार केले. आपल्या बिंबाताईच्या विवाहालाच तिचे वडील श्री. घरकुट्टे, रिटायर्ड इ. ए. सी. यांनींच विरोध केला; कारण बिंबाबाईच्या इस्टेटीचें व्यवस्थापकत्व त्यांना मिळण्याची जी शक्यता होती ती या विवाहानें कायमची नाहींशी झाली. आपल्या बहिणीच्या म्हणजे बिंबाताईच्या विवाहाला अनुकूल असलेले श्री. बंडुनाना घरकुट्टे यांनीं आपल्या वडिलांच्या म्हणजेच अनंतराव घरकुट्टयांच्या या विवाहाच्या विरोधामागील स्वार्थी भूमिकेचा रहस्यस्फोट उत्तम रीतीनें केला. त्यांनीं आपल्या वडिलांच्या पुनर्विवाहनिषेधाची मोठी मार्मिक मीमांसा केली. त्यांनी सांगितलें : " बाबांना ( म्हणजे अनंतरावांना ) पुनर्विवाह ही गोष्ट धर्मशास्त्राविरुद्ध आहे म्हणून नको आहे अशांतला भाग मुळींच नाहीं. पुनर्विवाह झाला म्हणजे बिंबा ही बाबांच्या तत्रानें न वागतां हरिभय्याच्या तंत्रानें वागूं लागेल म्हणून नको आहे. आमचे बाबा नागपुरांतील एका विद्वान् वकीलाचे अनुयायी आहेत. तो वकील अगदीं वृद्ध आहे. तथापि त्याच्या हातीं चारपांच विधवांच्या इस्टेटी आहेत. त्या वकीलास त्या विधवांनीं नीटपणानें वागावें असें मुळींच वाटत नाही. तरुण विधवा, त्या उनाडकी करणारच; त्यांना जर सच्छीलाचा उपदेश केला तर त्या आपल्या तंत्रानें मुळींच वागणार नाहींत. त्यास जें हवें आहे तेंच आपण सुलभ करून दिलें तरच त्या आपल्या तंत्रानें राहतील. यासाठीं त्यांना देखणे असे कारकून हे वकील पाहून देतात. त्यांचें धोरण असें असतें कीं लग्न झालेला कारकून पाहून द्यावा, त्याला कांहीं दिवस विधवेसह इस्टेटीच्या गांवीं पाठवावें; कांहीं दिवस नागपुरांत ठेवावें. पुनर्विवाहाची कल्पना त्या विधवांच्या आणि कारकुनांच्या मनांत शिरतां कामा नये, दुसरे कांहीं घोटाळे झाले तरी हरकत नाहीं. बाबा त्यांचेच चेले, पण बाबांनीं चूक केली ती ही कीं हरिभय्या लग्न झालेला नव्हता. हरिभय्या लग्न झालेला असून त्यानें दुसरे कांहीं घोटाळे केले असते तर बाबांची हरकत बिलकुल नव्हती. जे घोटाळे होतील ते सर्व 'निंदक लोकांच्या खोट्या अफवा' असें म्हणावें म्हणजे झालें, अशी एकंदर आमच्या बाबांची वृत्ति आहे. "

तात्पर्य काय कीं यशस्वी आणि इष्टफलदायी पुनर्विवाहाला आवश्यक असलेल्या विवाहपूर्व प्रियाराधनाचें महत्त्व न ओळखणारे सुधारक आणि आपल्या नीच स्वार्थाकरितां सच्छील विधवांना अनीतीच्या गर्तेत लोटून देणारे अनंतरावांसारखे व त्यांना गुरुस्थानीं असलेल्या त्या वकीलासारखे समाजकंटक यांच्या विधवाविवाहविषयक भूमिकेची आपणांस ओळख झाली म्हणजे मग डॉ. केतकरांच्या विधवाविवाहविषयक भूमिकेचें स्वरूप समाजस्वास्थ्याच्या आणि समाजविकासाच्या दृष्टीनें कसें निरोगी आणि कल्याणकारी आहे हें आपणांस पटूं लागतें; आणि त्या भूमिकेच्या प्रचाराची आणि पुरस्काराची निकड विशेषच जाणवूं लागते. बिंबाबाईच्या पुनर्विवाहाच्या निमित्तानें त्यांच्या या भूमिकेचें जें आपणांस दर्शन झालें त्यापेक्षां अधिक व्यापक दर्शन याच कादंबरींतल्या दुसऱ्या एका पुनर्विवाहाच्या माध्यमांतून आपणांस व्हावयाचें आहे. तो पुनर्विवाह म्हणजे शारदाबाई नांवाच्या विधवेचा वैजनाथशास्त्री यांच्याशीं झालेला विवाह आहे. त्याच विवाहाच्या रहस्योद्घाटनाकडे आतां आपणांस वळावयाचें आहे.

पुस्तकी विद्येचें संपादन आणि एकंदर शैक्षणिक इयत्ता या दृष्टीनें बिंबाबाई – हरिभय्या हें जोडपें अगदींच सामान्य दर्जाचें होतें; उलट, शारदा-वैजनाथ हें जोडपें असाधारणांच्या कक्षेत सहज सामील होऊं शकेल इतकें तें उच्च कोटींतलें होतें. वयाच्या नवव्या वर्षींच वैधव्यदशा प्राप्त झाली असतांनासुद्धां नाउमेद न होतां शारदाबाईनीं आपल्या तैलबुद्धीच्या बळावर

संस्कृत आणि इंग्रजी विद्येंत पुष्कळच प्रावीण्य संपादन केलेलें होतें. त्यांचें शरीर सुंदर होतेंच. अंगीं रसिकता असल्यामुळें मनहि सुंदर होतें; आणि त्यांची बुद्धि तर मूळचीच सुंदर होती. त्यांच्या ठिकाणीं अशा रीतीनें सौंदर्याचा त्रिवेणीसंगम साधलेला होता. त्यांत पुन्हा त्यांची यौवनदशा असल्यामुळें तर त्या संगमाला एक अलौकिक तेज प्राप्त झालेलें होतें. ' वादविवादांतली वाघीण ' म्हणून सर्वत्र संबोधिली जाण्याइतकें तिचें वादपटुत्व गाजलेलें होतें. त्यांनीं शिक्षिकेचा पेशा पत्करलेला होता, पण त्यांत त्यांना समाधान नव्हतें. आपल्या जीवनहेतूच्या शोधार्थ त्यांची धडपड चाललेली होती. शारदाबाईंचा अखेरीस ज्या विधुर वैजनाथशास्त्र्यांशीं विवाह झाला ते तर महापुरुषच होते. ' महाराष्ट्रीय विद्वानांचा मुकुटमणि ' हें वर्णन सुद्धां त्यांच्या प्रगाढ विद्वत्तेच्या यथार्थ गौरवाच्या दृष्टीनें अपुरेंच पडलें असतें ! देशकल्याणाचा हेतु मनांत बाळगून ते इतिहासाकडे वळले आणि मग कायमचेच इतिहाससंशोधनांत रमले. इतिहासाशीं संबद्ध असलेल्या इतर शास्त्रीय विषयांतहि त्यांनीं खोल अवगाहन केलें. कोमलतेशीं त्यांचें विळयाभोपळयाएवढें सख्य ! डॉ. केतकरांच्या भाषेंत सांगायचें म्हणजे " ज्याच्या चित्तांत मार्दव आहे असा संशय त्यास स्वतःलाच आला असतां स्वतःवरच रागावणारा, स्त्रियांविषयीं दाक्षिण्य आहे असें त्यास कोणी दाखवून दिलें तर जणूं काय त्यानें आपला मोठा अपराधच केला आहे अशी मनाची समजूत करून घेणारा आणि पारद-कणाप्रमाणें आपण आर्द्रतेच्या विकारापासून अत्यंत अलिप्त आहों असें समजणारा, तो मनुष्यरूपी जड पदार्थाचा गोळा; अगर प्रखरता, तेजस्विता, सर्वग्राहकता आणि भयदायकता या बाबतींत साक्षात् वैश्वानराची बरोबरी करणारा असा अरसिक वैजनाथशास्त्री " अखेरीस शारदाबाईंच्या विलोभनीय व्यक्तित्वानें प्रभावित होऊन त्यांच्याशीं विवाहबद्ध झाला. त्याच्या विवाहाची घटना ही समाजशास्त्रीय आशयानें युक्त तर आहेच; पण त्याशिवाय, शारदाबाई आणि वैजनाथशास्त्री हे दोघेहि बुद्धिवंत आणि विचारवंत असल्यामुळें, प्रियंवदेच्या शब्दांत सांगायचें म्हणजे ' ऋषितुल्य ' असल्यामुळें, त्यांचे संवाद सामाजिक प्रश्नांच्या उद्‌बोधनाच्या दृष्टीनें फार संपन्न झालेले आहेत.

शारदाबाई-वैजनाथशास्त्री यांचा विवाह हा समाजशास्त्रीय आशयाच्या दृष्टीनें मोठा क्रान्तिकारी स्वरूपाचा आहे. तो केवळ पुनर्विवाहच नाहीं तर पुढें ' ब्राह्मणकन्या ' कादंबरींत डॉ. केतकरांनीं याच वैजनाथशास्त्र्यांच्या मुखांतून ज्या मातृसत्ताक कुटुंबपद्धतीचा समाजशास्त्रीय दृष्टीनें अत्यंत प्रभावशाली पुरस्कार केलेला आहे तिचें अस्पष्ट आणि पुरुषसापेक्ष प्रात्यक्षिकच या विवाहाच्या रूपानें दाखविण्यांत आलेलें आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. याहि विवाहांत अनुनय नाहीं असें नाहीं; पण त्याची आविष्कारपद्धति मात्र सहज अनुमानतां येईल अशा जातींतली निश्चित नाहीं. शारदाबाई ही वैजनाथशास्त्रींची अज्ञातवासांतली शिष्या. तिला त्यांचें जेव्हां प्रथम दर्शन झालें तेव्हां ते वैजनाथशास्त्री आहेत याचें तिला ज्ञान नव्हतें. रत्नपुरांतील ऐतिहासिक अवशेष बारकाईनें पाहणारा हा सुमारें पस्तिशी उलटलेला गृहस्थ, स्नानसंध्या झाल्यानंतर ' पोह्यांत पाणी घालून आणि त्यांत एक गुळाच्या खड्याचा चूर घालून पोह्यावरच दुपारची भूक शांत करतांना ' तिनें पाहिला. त्यावेळीं ' त्या गृहस्थाला बोलावून कांहींतरी फराळाचें त्यांस द्यावें असें त्यांस वाटलें. तथापि त्यांना एकदम कांहीं खावयास देऊं केल्यास तें बरोबर दिसणार नाहीं असेंहि वाटून त्या स्वस्थ बसल्या. ' पुढें ते वैजनाथशास्त्रीच आहेत हें कळल्यानंतर त्यांना फार आश्चर्य वाटलें, त्यांच्याविषयींच्या आदराची भावना त्यांच्या अंतःकरणांत उत्कट स्वरूपांत जागृत झाली आणि महाराष्ट्राच्या त्या महापुरुषाची खाण्यापिण्याच्या बाबतींत चाललेली ती अक्षम्य आबाळ पाहून त्यांना मनस्वी दुःख झालें. कांहींशा अंतर्मुख होऊन त्या विचारमग्न झाल्या -- " अरेरे ! काय ही स्थिति ! ! ज्याचें खरें संन्यस्तासारखें वर्तन पाहून आपला देश जर स्वतंत्र असता तर शेंकडो राजांनीं ज्यांचें अत्यंत आदरानें स्वागत केलें असतें, तोच काय हा महर्षि ! आजची दुपार यास पोहे आणि गुळाचा खडा एवढ्यावरच काढावी लागली ! सज्जनास कष्टमय स्थितींत पाहून देखील त्याच्या सेवेस न धांवून जाणें हाच का आमचा शिष्टाचार ? कशाला दुपारच्या वेळेस मी लाज धरली ? पुढें त्यास जेवणास आमंत्रण करणें माझें

कर्तव्य नव्हतें काय ?". वैजनाथशास्त्र्यांच्या जेवणाची गैरसोय आपण आपल्या डोळ्यांनीं धडधडीत पाहात असतांना सुद्धां आज आपण दुपारीं सुखानें जेवण केलें ही गोष्ट शारदाबाईंच्या मनाला लागून गेली. त्यामुळें मग त्यांनीं वैजनाथशास्त्र्यांना त्या दिवशीं संध्याकाळीं व दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपल्याकडे जेवावयास बोलाविलें. दुसऱ्या दिवशींचा सकाळचा लाडू, ताजी दशमी आणि तूप हा फराळ 'संन्यास्ताचरणी' वैजनाथशास्त्र्यांस फार आवडला. पोटास देऊन पोटांत शिरण्याच्या आणि मग हलकेंच हृदय काबीज करण्याच्या शारदाबाईंच्या या अनुनयपद्धतीची शिफारस करण्याच्या हेतूनें डॉ. केतकरांनीं लिहिलें आहे कीं, "इंग्लंडमध्यें म्हातारीकडून तरुणीस अशा परंपरेनें हजारों आयुष्यांच्या वर्षांचा एक फारच मौल्यवान् उपदेश आहे. तो आजकालचे पाश्चात्य तत्त्ववेत्ते ज्या स्त्रियांची लग्न होण्याची संधि शिक्षणामुळें कमी होत आहे अशा तरुणींपुढें ठेवतात आणि तो उपदेश अर्वाचीन व स्वतः सुशिक्षित आपण आहोंत म्हणून ज्यांस भास होतो अशा सर्व तरुणींनीं लक्षांत ठेवण्यासारखा आहे, अशी आम्ही शिफारस करतों. तो उपदेश म्हटला म्हणजे, 'पुरुषांच्या अंतःकरणाच्या अगदीं जवळची जागा म्हणजे त्याचें पोट होय. तें संतुष्ट करा म्हणजे अंतःकरण काबीज कराल.' पोटांतून हृदयांत शिरण्याच्या या अनुनयतंत्रानेंच अखेरीस शारदाबाईंनीं बैजनाथशास्त्र्यास जिंकलें असें आपण निदान वरकरणीं तरी म्हटलें पाहिजे; कारण शारदा-वैजनाथ–विवाहावर भाष्य करितांना डॉ. केतकरांनी लिहिलें आहे की, "शारदाबाई आणि वैजनाथशास्त्री यांचा पत्रव्यवहार अनेक वर्षे चालूं होता. शास्त्रीबोवा धुळ्यास होते. हातानें स्वयंपाक करतां करतां कंटाळले. स्टोव्ह, कुकर, केवळ दुधावर राहण्याची पद्धति, केवळ फळें खाऊन राहणें, या सर्व क्रिया करून कंटाळले. त्यांना कधीं स्वयंपाकाला बाईहि ठेवतां येईना; (कारण) बाई सड्या मनुष्याकडे स्वयंपाकास राहिली तर सर्व गांवभर चेष्टा होणार. शेवटीं आपली जेवणाची चांगली सोय असल्याशिवाय इतिहाससंशोधन अशक्य आहे ही गोष्ट त्यांच्या लक्षांत चांगल्या तऱ्हेनें आली;" आणि "अशा रीतीनें, वैजनाथशास्त्र्यांबरोबर आपण स्वच्छंदानें फिरावयास जात आहोंत, ते आजारी आहेत आणि आपण शुश्रूषा करीत आहोंत, ते ग्रंथ सांगत बसले आहेत आणि आपण त्यांचे 'विश्वंभरबोवाप्रमाणें लेखकु' झालों आहोंत अशीं स्वप्नें पाहणारी शारदाबाई अखेरीस वैजनाथशास्त्र्यांची सहधर्म-चारिणी झाली ! वृत्तपत्रांनीं या पुनर्विवाहाचें अभिनंदन केलें.

आम्हीहि या विवाहाचें अभिनंदन करतों. हा विवाह पुनर्विवाह होता म्हणूनच केवळ नव्हे, किंवा 'जेवावयास घातलें आणि जिंकून घेतलें' या अनुनयतंत्राचा विजय झाला यासाठींहि केवळ नव्हे, तर विशिष्ट प्रकारच्या सामाजिक आणि आर्थिक अवस्थेच्या पुरुषांच्या लग्नाचा एक शिष्टसंमत होण्यासारखा मार्ग या विवाहानें दाखवून दिला, या कारणाकरितांच प्रामुख्यानें आम्ही या विवाहाचें अभिनंदन करतों. वैजनाथशास्त्र्यांना उपजीविकेचें निश्चित साधन उपलब्ध नव्हतें; (म्हणूनच तर मुलींच्या बापांनीं त्यांना दुसरें लग्न करण्याचा आग्रह केला नव्हता). उलट, शारदाबाईजवळ मात्र उपजीविकेचें निश्चित साधन उपलब्ध होतें. वैजनाथशास्त्र्यांनीं आपलें सारें जीवनच इतिहाससंशोधनाला आणि त्याला पोषक असलेल्या इतर अनेक शास्त्रांच्या अध्ययनाला सर्वस्वीं वाहिलेलें असल्यामुळें त्यांना अर्थोत्पादनक्षम असा व्यवसाय करण्याकरितां वेळ सांपडणें शक्य नव्हतें. आणि त्यांच्यासारख्या निर्धन पण ध्येयवादी पुरुषाशीं लग्न करायला उपवर मुलींची सहसा तयारी नसते. 'कन्या वरयते रूपं' हें तर खरेंच आहे; पण कन्येला रूपाइतकेंच (किंबहुना रूपापेक्षांहि जास्त) रुपेंहि प्रिय असतें हेंहि खरेंच आहे. त्यामुळें वैजनाथशास्त्र्यासारख्या द्रव्यार्जनाविषयीं उदासीन असलेल्या ध्येयवाद्यांवर नाइलाजानें आजन्म अविवाहित राहण्याची पाळी येते, हें आपणांस नित्य प्रत्ययास येतच आहे. ज्ञानयोग्यांविषयींचें (आणि कर्मयोग्यांविषयीचेंहि) स्त्रियांचें हें औदासीन्य लक्षांत घेऊनच डॉ. केतकरांनीं लिहिलें आहे कीं, "समाजांत ज्याच्यापाशीं दोन पैसे जास्त आहेत अशाच वर्गाशीं स्त्रिया आणि त्यांतल्या त्यांत सुशिक्षित स्त्रिया संबंध ठेवूं इच्छितात. सुशिक्षित आणि त्यांतल्या त्यांत आजकालच्या फ्याशन्सनीं परिवेष्टित झालेली स्त्री, उघडपणें रंडी ठेवणाऱ्या पण पुष्कळ पैसे मिळविणाऱ्या डॉक्टराशीं अगर वकिलाशीं संबंध ठेवूं












इच्छील, पण दारिद्र्यांत दिवस काढणाऱ्या विद्वानाशीं संबंध ठेवूं इच्छिणार नाहीं. संस्कृत-विद्याविभूषित शास्त्री वर्गास आजकाल लग्न करण्याची पंचाइत पडूं लागली आहे". केवळ विद्वानांना आणि संस्कृत-विद्याविभूषित शास्त्री वर्गाला म्हणजे विद्येच्या क्षेत्रांत निःस्पृहपणें कार्य करणाऱ्यांनाच निरुपायास्तव निर्धनतेस्तव अविवाहित रहावें लागतें असें नाहीं; तर लोकसेवेच्या नानाविध क्षेत्रांत निरभिलाष वृत्तीनें अविरत झिजणाऱ्या बहुतांश कार्यकर्त्यांवरहि सक्तीचें ब्रह्मचर्यपालन करण्याचा प्रसंग आलेला आपणांस पाहावा लागत आहे. आर्थिक, राजकीय, सामाजिक, धार्मिक आणि इतर विविध क्षेत्रांत काम करणाऱ्या आजीव व निष्ठावन्त सेवकांना पोसायला समाज तयार नाहीं. त्यांनीं निःस्वार्थपणें म्हणजे उपाशीं पोटीं राबलें पाहिजे अशी समाजाची अपेक्षा आहे; आणि जीवनाच्या निरनिराळ्या क्षेत्रांत लोकसेवा करणाऱ्या आजीव व एकनिष्ठ कार्यकर्त्यांच्या उदरनिर्वाहाची सन्मान्य प्रकारें तरतूद करणें हें आपलें एक परमपवित्र आणि निकडीचें कर्तव्य आहे हें पूर्णपणें समाजाच्या गळीं उतरण्यास आणि तदनुसार त्याच्या आचाराला वळण लागण्यास अजून अनेक वर्षांचा काळ जावा लागणार आहे. अशा स्थितींत, सगळा समाज आजीव ध्येयवादी सेवकांचें ऋण ओळखून तें आपण फेडलें पाहिजे या बुद्धीनें कार्यप्रवृत्त होण्याइतका पुरेसा कृतज्ञ होईपर्यंत, त्या सेवकांच्या पोषणाची आणि त्यांच्या स्वाभाविक कामवासनेच्या यथाप्रमाण परिपूर्तीची सोय लावून दिलीच पाहिजे. या सेवकांची आज जी अवस्था आहे ती अशी: समाज पोसायला तयार नाहीं, ध्येयाचें वेड जात नाहीं, पैसे मिळवायला फुरसत नाहीं आणि साऱ्याच कार्यकर्त्यांना शुकदेव होतां येत नसल्यामुळें सडया फटिंगाचें भकास जिणें व्यतीत करण्याखेरीज गत्यंतर नाहीं. प्रियंवदेनें शारदेला जो सल्ला दिला तो ऐकल्यानंतर या अडचणींवर मात करण्याकरितां तोड नाहीं असें मात्र म्हणतां येत नाही. शारदेला वैजनाथशास्त्र्याशीं लग्न करण्याचा सल्ला देत असतांना प्रियंवदा तिला सांगते – " तुम्ही स्वतःचें उदरपोषण करण्यास समर्थ आहांत आणि कदाचित् त्यांचेंहि उदरपोषण करून त्यांना ऐतिहासिक संशोधन करण्यास त्यांस अधिक समर्थ कराल. आपल्या महाराष्ट्रांत शास्त्रसंवर्धन, इतिहाससंशोधन इत्यादि क्रिया करण्यास द्रव्याचा अभाव आहे. अशा प्रसंगीं असल्या कामांत गुंतलेल्या पुरुषांविषयीं प्रेमादर उत्पन्न होऊन त्यांच्या रक्षणासाठीं मातृत्वाच्या भावानें युक्त असें प्रेम उत्पन्न झालेल्या महाराष्ट्रीय स्त्रिया त्यांच्यापाशीं विवाहास प्रवृत्त होतील तर त्या स्त्रियांविषयीं येथील स्त्रीवर्गास अभिमानच वाटेल. " प्रियंवदेच्या या मौलिक सल्ल्याचा स्वीकार करतांना आपण त्याची भूमिका अधिक व्यापक बनविली पाहिजे; कारण प्रश्न फक्त वैजनाथशास्त्र्यासारख्या शास्त्रसंवर्धन आणि इतिहाससंशोधन करणाऱ्या कार्यकर्त्यापुरताच मर्यादित नसून जीवनाच्या इतर क्षेत्रांत काम करणाऱ्या लोकसेवकांच्या बाबतींतहि तो उपस्थित होत आहे. ' ब्राह्मणकन्या ' कादंबरींतील मजूरपुढारी असलेल्या रामरावाची तक्रार वैजनाथशास्त्र्यासारखीच आहे. तो म्हणतो : "आपण जर इतकें मोठें कार्य हातीं घेत आहों तर आपणांस अविवाहितच राहिलें पाहिजे. कारण ज्या तऱ्हेचा आयुष्यक्रम आपण आचरिला, त्या तऱ्हेचा आयुष्यक्रम चालूं देईल, उलट त्यांत मदत करील, अशी सहचरी आपणांस कोठून लाभणार? स्त्रियांना नवरा हवा असतो तो सुखानें आयुष्यक्रमण करण्यासाठी हवा असतो. ... ध्येयवादी मंडळींना लग्न लावून प्रजोत्पत्ति करण्याचा हक्क नाहीं, असें मीं ठरविलें. ... आम्ही मजुरांचे पुढारी झाल्यामुळें आम्हाला प्राप्तीचा धंदा नाहीं. आम्हां मजुरांच्या पुढाऱ्यांची अशी स्थिति झाल्यामुळें त्यांना लग्न करणें कठीण झालें. " तात्पर्य काय कीं जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रांत काम करणाऱ्या, प्राप्तीचा धंदा नसलेल्या, निष्ठावंत सार्वजनिक कार्यकर्त्याचें लग्न होणें आज कठिण होऊन बसलें आहे. ती कठिणाई दूर झालीच पाहिजे. त्याकरितां कमावत्या, सुशिक्षित आणि अविवाहित वा विधवा स्त्रियांनीं या सावर्जनिक कार्यकर्त्यांशीं, त्यांच्याविषयींच्या आदराच्या आणि आपुलकीच्या भावनेनें प्रेरित होऊन, विवाहबद्ध होण्यास सिद्ध झालें पाहिजे. या विवाहांमुळें, त्या कार्यकर्त्यांच्या मागची पोटाची विवंचना नाहींशी होईल, निर्वेध चित्तानें त्यांना आपलें अंगीकृत कार्य पार पाडतां येईल आणि ध्येयसिद्धीच्या आनंदाबरोबरच सुखी कौटुंबिक जीवनाचा अनुपमेय आनंदहि त्यांना उपभोगतां येईल. त्याचप्रमाणें या कार्यकर्त्यांशीं लग्न करणाऱ्या स्त्रियांना अप्रत्यक्षपणें लोकसेवेच्या कार्याला हातभार लावल्याचें पुण्य पदरांत पाडून घेतां येईल. आमच्या मतें, असे विवाह

फार मोठ्या प्रमाणावर आणि अगदीं प्रतिष्ठित स्वरूपांत आपल्या समाजांत रूढ झाले पाहिजेत. खेदाची गोष्ट ही कीं आपल्या समाजांत आज अशा विवाहांना प्रतिष्ठा नाहीं, एवढेंच नव्हे तर त्यांचा उपहाससुद्धां झाल्याशिवाय राहात नाहीं. पुरुष मिळविणारा आणि गृहिणी राबणारी, असें कुटुंबांचें चित्र दिसल्यास तें सर्वमान्य लोकरीतीस धरून आहे असें समजलें जातें. पण गृहिणी मिळविणारी आणि पुरुष ( समाजाच्या दृष्टीनें निरपवाद उपयुक्ततेचें उत्तम कार्य करणारा पण ) आयतें खाणारा, असा त्या चित्रांत बदल झाल्यास तात्रडतोब त्याच्याबद्दल टवाळी आणि कुत्सापूर्ण टीका सुरूं होते. वस्तुतः स्त्रीला समाजांत पुरुषाच्या बरोबरीचें स्थान मिळवून द्यावयाचें असेल आणि वैजनाथशास्त्र्यांसारख्या किंवा रामरावांसारख्या पुरुषांना गृहसौख्य मिळवून देऊन त्यांच्याकडून त्यांच्या आवडीचें समाजकार्य प्रसन्न मनानें करवून घ्यावयाचें असेल तर आपल्या समाजांत मिळवत्या पुरुषाच्या कुटुंबासारखाच मिळवत्या स्त्रीच्या कुटुंबाला दर्जा मिळाला पाहिजे; दोन्ही प्रकारच्या कुटुंबांच्या सामाजिक प्रतिष्ठेची इयत्ता सारखीच मानण्यांत आली पाहिजे. समाजाच्या निरोगी विकासाच्या दृष्टीनें दोन्ही प्रकारच्या कुटुंब-पद्धती प्रतिष्ठित स्वरूपांत प्रचलित झाल्या पाहिजेत. इंद्रियनिग्रह आणि विषयत्याग हेंच ज्यांचें जीवितध्येय अशा व्यक्तींना आणि कामवासनेवर विजय मिळविणें हा केवळ आपल्या हातचा मळ आहे असें समजणाऱ्या व संसारसौख्याला कःपदार्थ मानणाऱ्या सार्वजनिक कार्यकर्त्यांना अर्थात्च मिळवत्या स्त्रीशीं विवाह करण्याची डॉ. केतकरांची कल्पना पसंत पडणार नाहीं. आमचें तर याबाबत असें म्हणणें आहे कीं त्या इंद्रिय-कठोर कार्यकर्त्यांना, त्यांनीं इंद्रियांवर मिळविलेला विजय, खुशाल लखलाभ होवो आणि वासनाक्षयाच्या बळावर त्यांना शाश्वत सुखाचा मोक्ष अवश्य मिळो ! व्यक्तीच्या आणि राष्ट्राच्या ऐहिक सुखसंवर्धनावरच आपलें लक्ष केंद्रित करणाऱ्या डॉ. केतकरांच्या समाज-शास्त्रीय दृष्टीच्या टप्प्यांत मुमुक्षु, योगी, संन्यासी किंवा यांसारख्या संसारविमुखांचा समावेश झालेला नसल्यामुळें त्यांच्या वागणुकीचा अन्वयार्थ लावून त्याची कारणमीमांसा शोधण्याचा प्रयत्न येथें सर्वस्वीं अप्रस्तुत आहे.

---

## अंकुर — !

मी रोज भटकतों विमनस्कपणें  
नित्य देखतों कितीक मरणें !  
तप्त दुपारीं  
पादपथावर थकुन पेंगतें  
  कुणी भिकारी  
  कवळें पोर  
पसरुन म्हणतें हात फाटका —  
' बाबू, पैसा ! '  
म्हणत राहतें —  
' चीटीके पैरमें घुंगरू बाजे  
वह भी साईं सुनता है । बाबू, पैसा ! ' ...  
कुणी माउली  
घेउनि अवघें कटिखांद्यावर निघे लटांबर  
सांवरीत अन् चड्डुया आंखुड  
बाल्य चाललें भर वाटेंतुन  
  पुशीत शेंबुड !  
आणिक कोणी राजाराणी  
रस्त्याकांठीं उभीं बिलगुनी  
राजा लुकडा अस्थिचर्ममय  
  केवळ पंजर  
राणीचेंहि विरविरीत अन् अपुरें झंपर  
उगिच दावितें  
सपाट सुकल्या लिंबांमधलें  
  थिजलें यौवन !  
खोकत चाले हमाल कोणी  
वृद्ध बिचारा !  
ओझ्याखालीं झुकली मान  
दुपार बसली हुंगित त्याचा  
  चिकचिकीत अन् खारट घाम !  
तप्त दुपारीं  
मी रोज भटकतों विमनस्कपणें  
नित्य देखतों कितीक मरणें !  
विनाश बघतों बघतों मरणें  
आणिक बघतों अजून कोठें  
भर मध्यान्हीं दगडाखालीं  
नवीन इवला अंकुर गातो हिरवें गाणें !

— मधुकर वाबगांवकर.










श्री. विद्याधर जोहरापूरकर

# चार जैन तार्किक

**प्रा**चीन भारतीय तत्त्ववेत्ते तर्कविद्येकडे उपेक्षेच्या दृष्टीनें पाहत असत. त्यांच्या दृष्टीनें निःश्रेयसाची प्राप्ति हा मानवापुढील सर्वांत अधिक महत्त्वाचा प्रश्न होता. अप्रतिष्ठ तर्काच्या मागें लागून वादविवाद करणें म्हणजे आत्मविद्येच्या प्राप्तीच्या मार्गांतील विघ्न होय असें त्यांचें मत होतें. ' हा आत्मा प्रवचनानें, बुद्धीनें अथवा श्रुतानें प्राप्त होत नाहीं' असें **उपनिषदांत** वर्णन आहे. शरीरांत एखादा बाण घुसला असतां तो कुठून आला, कोणी मारला अशी चौकशी करण्यापेक्षां प्रथम तो बाण उपटून टाकणें इष्ट आहे. त्याचप्रमाणें शुष्क तर्कविचार करण्यापेक्षां प्रथम तृष्णाक्षय करणें आवश्यक आहे असें बुद्धाचें सांगणें होतें. उपनिषदें व बुद्ध यांच्या समकालीन जैन परंपरेचाहि दृष्टिकोण प्रायः असाच होता. जैन आगमग्रंथांत तर्कविद्येचे ओझरते उल्लेख असले तरी वस्तुतत्त्वाच्या निर्णयाकरतां तर्कविद्येचा फारसा उपयोग केलेला आढळत नाहीं. खिस्तपूर्व ९ व्या शतकांतील **भगवान् पार्श्वनाथ** यांनीं जैन शासनाचें जें स्वरूप प्रकाशित केलें तें मुख्यतः अहिंसा, सत्य, अस्तेय व अपरिग्रह या चार यमांवरच आधारलेलें होतें. खिस्तपूर्व सहाव्या शतकांतील **भगवान् महावीर** यांच्या उपदेशांत स्याद्वादाचें मूलभूत विवेचन आढळत असलें तरी त्यांनींहि विस्तृत प्रमाणावर त्याचा उपयोग केला नव्हता.

इसवी सनाच्या प्रारंभींच्या शतकांत वेगवेगळे संप्रदाय सुव्यवस्थित रूप धारण करूं लागले त्यावेळीं या प्राचीन दृष्टिकोणांत बरेंच परिवर्तन झालें. न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्त या दर्शनांचे सूत्रग्रन्थ याच युगांत संकलित झाले. ' माध्यमिक कारिका ' आदि बौद्ध मूलग्रन्थांची रचनाहि त्याच सुमारास झाली. आपापल्या परंपरेचा अभिमान सयुक्तिक आहे हें दर्शविणें आणि अन्य परंपरा तर्कनिष्ठ नाहींत हें दर्शविणें असें दुहेरी कार्य या सूत्रग्रन्थांनीं केलें. जैन दर्शनाचा आधारभूत ग्रंन्थ ' तत्त्वार्थसूत्र ' हा **गृध्रपिच्छ उमास्वाति** आचार्यांनी याच काळांत संकलित केला. आचरणाबरोबरच ज्ञानालाहि महत्त्व दिलें पाहिजे आणि ज्ञानप्राप्तीकरतां गुरूपदेशाप्रमाणेंच तर्काधिष्ठित विचारहि उपयुक्त इतकेंच नव्हे तर आवश्यक आहे या जाणिवेनें आपल्या आगमाधिष्ठित ग्रन्थांत त्यांनीं जैन तर्कशास्त्राचे मूलभूत आधार प्रमाण व नय यांचेंहि दिग्दर्शन केलें.

असें असलें तरी **शबर आणि वात्स्यायन, प्रशस्तपाद आणि दिङ्नाग** यांच्या भाष्यांच्या निर्मितीच्या वेळींच तर्कविद्येला सौष्ठव प्राप्त झालें. युक्तिवादालाहि नियम असतात याची जाणीव झाल्यावर त्याचा उपयोग करण्याचें कौशल्य हे समर्थ तत्त्ववेत्ते पूर्णतया प्रदर्शित करूं लागले. प्रत्यक्ष वादविवादांत आणि ग्रन्थद्वारें परस्परांवर जय मिळवून आपआपल्याच परंपरेचें तत्त्वज्ञान तर्कनिष्ठ व युक्तिसंगत आहे हें दर्शविण्याची एक चढाओढच या काळांत सुरूं झाली. इ. सनाच्या तिसऱ्या शतकापासून पांचव्या शतकापर्यंत उत्तरोत्तर अधिकाधिक विचारसंपन्न होत गेलेल्या या भाष्ययुगांतच जैन तर्कशास्त्राचे आद्य प्रतिष्ठापक **स्वामी समन्तभद्र** यांचा अवतार झाला.

**स्वामी समन्तभद्र** यांच्या जीवनाविषयीं अनेक दन्तकथा उपलब्ध आहेत. ते फणिमण्डलांतील उरगपुरचे[1] राजपुत्र होते. **शांतिवर्मा** असें आपलें नांव त्यांनी एका ग्रन्थांत निबद्ध केलें आहे. ते दिगम्बर मुनि होते आणि काञ्ची येथील **शिवकोटि** राजाच्या दरबारापासून प्रारम्भ करून संपूर्ण भारतवर्षांत त्यांनी वादविवादाकरतां भ्रमण केलें होतें. **धूर्जटि** या प्रतिस्पर्धी वादीचा त्यांनीं पराभव केला होता. त्यांच्या चरित्राविषयीं

१. हें उरगपूर म्हणजे सध्यांचें उरैयूर असावें. कावेरीच्या तटावरील हें प्राचीन शहर एके काळीं चोल राजांची राजधानी होतें असा विद्वानांचा अंदाज आहे.








या आणि अन्य कथांचें परीक्षण श्री. पं. जुगलकिशोर मुख्तार यांनी **'स्वामी समन्तभद्र'** या आपल्या ग्रन्थांत केलें आहे.

**समन्तभद्रांचे** पांच ग्रन्थ उपलब्ध आहेत. 'रत्न-करण्ड' या ग्रन्थांत मोक्षमार्गाचीं अंगभूत तीन रत्नें– सम्यक् दृष्टि, सम्यक् ज्ञान व सम्यक् चरित्र यांचें सु-सम्बद्ध विवेचन आहे. 'जिनस्तुतिशतक' या ग्रन्थांत चक्र, पद्म, सर्वतोभद्र, मुरज इत्यादि विविध शब्दा-लंकारांनीं तीर्थंकरांची स्तुति केली आहे. 'युक्त्यनु-शासन' व 'आप्तमीमांसा' या ग्रन्थांत भगवान् महावीरांच्या स्तुतीच्या निमित्तानें त्यांच्या तत्त्वज्ञानाची विशद व्याख्या केली आहे. 'स्वयंभू' हें प्रसादयुक्त व लालित्यपूर्ण संस्कृत स्तोत्र **समन्तभद्रांच्या** कवि-प्रतिभेची साक्ष देतें.

**स्वामी समन्तभद्रांनीं** जैन तर्कशास्त्रांत दोन मूल-भूत सिद्धान्तांची स्थापना केली. त्यांचा पहिला सिद्धान्त आप्तवचनाच्या प्रामाण्याविषयीं आहे. त्यांच्या-पूर्वी जैन आणि जैनेतर अशा उभय तत्त्ववेत्त्यांत 'वक्तृप्रामाण्याद् वचनप्रामाण्यम्' हा सिद्धान्त दृढ-मूल झाला होता. त्याला मूलतः विरोध करून वचन-प्रामाण्यावरून वक्त्याच्या पूज्यतेचा निर्णय करण्याची नवी पद्धति त्यांनी सुरू केली. **भगवान् महावीर** श्रेष्ठ आहेत याचें कारण ते देवपूज्य आहेत, तीर्थंकर आहेत, अद्‌भुत शक्तींनीं युक्त आहेत हें नाहीं, तर महावीरांचे सिद्धान्त युक्तिशास्त्राला अविरोधी आहेत–त्यांचें शासन युक्तीचें अनुशासन आहे हें त्यांच्या श्रेष्ठत्वाचें गमक आहे असा सिद्धान्त त्यांनी प्रस्थापित केला. पूर्वजन्म अथवा पुढील जन्मांचें वर्णन हें **महावीरांच्या** सर्वज्ञतेचें प्रमाण नव्हे तर उत्पाद-व्यय-ध्रौव्यात्मक वस्तुतत्त्वाचें निरूपण हें तें प्रमाण होय असें प्रतिपादन त्यांनीं केलें.

आपल्या या सिद्धान्ताच्या प्रस्थापनेकरतांच त्यांनीं 'स्याद्वाद' या **महावीरांनीं** उपदेशिलेल्या सर्वश्रेष्ठ सिद्धान्ताचें विस्तारानें मंडन केलें. आजच्या प्रमाणेंच त्यावेळींहि स्याद्वादाच्या अर्थाविषयीं उपेक्षेचें आणि गैरसमजाचें वातावरण जैनेतर विद्वानांत पसरलें होतें. कोणी त्याला संशयवाद मानीत, कोणी समन्वय-वाद मानीत तर कोणी सापेक्ष सत्य म्हणून निरपेक्ष सत्यापेक्षां कमी दर्जाचें तें तत्त्व आहे असा निर्णय देत. हा गोंधळ दूर करून वस्तुतत्त्वाच्या निर्णयाकरतां स्याद्वाद अत्यावश्यक आहे हें स्वामींनीं सिद्ध केलें. वस्तुतत्त्वाचें वर्णन शब्दद्वारें केलें जातें. परंतु शब्दाची शक्ति मर्यादित आहे. शब्दानें वस्तूच्या एकांशाचाच बोध एका वेळीं होतो हें अध्याहृत समजलें आणि त्या वेळीं वस्तूंत असलेल्या अन्य अनेक अंशांचें अस्तित्व मान्य केलें तर शब्दानें होणारा वस्तुबोध यथार्थ होतो. परंतु बहुशः शब्दाची ही मर्यादित शक्ति विसरून एकांशाचें विधान करणारा शब्द अन्य अंशांचा निषेध करतो असेंच मानण्याची प्रवृत्ति दिसून येतें. उदाहरण घ्यायचें तर 'आत्मा नित्य आहे' या शब्दात्मक विधानांत 'आत्मा हें द्रव्य नित्य आहे–त्याचा कधींहि नाश होत नाहीं' हा वस्तुस्थितीचा अंश दर्शविण्याची शक्ति आहे. परन्तु **वेदान्तदर्शनांत** या शब्दात्मक विधानाची ही मर्यादा विसरली गेल्यामुळें 'आत्मा नित्य आहे' या विधाना-नेंच 'आत्मा परिवर्तनशील आहे–त्याच्या अवस्था प्रतिसमयीं बदलत असतात' या वस्तुस्थितीच्या अन्य अंशाचा निषेध होतो असें मानण्यांत आलें. आणि असें मानल्यामुळें प्रत्यक्षप्रमाणानें सिद्ध होणाऱ्या पुण्यपाप, बन्धमोक्ष, जन्ममृत्यु इत्यादि अवस्थाद्वैताची भ्रम म्हणून बोळवण करावी लागली. **समन्तभद्रांनीं** या प्रवृत्तीचा निषेध केला. भ्रम म्हणून प्रत्यक्षसिद्ध वस्तूची उपेक्षा करणें योग्य नव्हे. असा सिद्धान्त प्रस्था-पित करून शब्दशक्तीच्या मर्यादेची जाणीव राहावी म्हणून प्रत्येक विधानाबरोबर 'स्यात्' या निपाताचा उपयोग करण्यांत यावा या पुरातन जैन पद्धतीचें त्यांनीं समर्थन केलें. आत्मा द्रव्यदृष्ट्या नित्य आहे व अवस्थादृष्ट्या पर्यायदृष्ट्या परिवर्तनशील–अनित्य आहे. त्याच्या अवस्था उत्पन्न होतात व नष्ट होतात. परंतु तें द्रव्य या उत्पाद-व-व्ययाच्या प्रक्रियेंतहि ध्रुवच राहतें.–याप्रमाणें वस्तुस्थितीच्या उभय अंशांचा स्वीकार केवळ स्याद्वादानेंच करतां येतो. सम्पूर्ण जगतांत स्पष्ट दिसणारा हा उत्पाद-व्यय-ध्रौव्या-त्मक वस्तुस्वभाव **भगवान् महावीरांनीं** प्रतिपादन केला व हेंच त्यांच्या **सर्वज्ञतेचें गमक** होय असा सिद्धान्त मांडून **समन्तभद्रांनीं** जैन तर्कशास्त्राचा पाया घातला. नित्यत्व-अनित्यत्वाच्या या प्रश्ना-प्रमाणेंच आगम व तर्काचें प्रामाण्य, दैव व पुरुषार्था-

चें श्रेष्ठत्व, ब्रह्माद्वैत व शून्याद्वैताचें अस्तित्व, ज्ञानात्मक व अज्ञानात्मक मोक्ष या व अशा अनेक वादग्रस्त प्रश्नांचा निर्णय स्याद्वादाच्या या एकाच निकषानें करतां येतो हें सूत्ररूपानें त्यांनीं आपल्या **आप्तमीमांसेंत** व **युक्त्यनुशासनांत** दर्शविलें आहे.

परीक्षा केल्यानंतरहि **भगवान् महावीरांचें** सर्वज्ञत्व अबाधित आहे हें दर्शविल्यामुळें उद्भवलेल्या प्रसन्न वातावरणांतच दुसरे महान् जैन तार्किक **आचार्य सिद्धसेन** उदयाला आले. **चंद्रगुप्त विक्रमादित्याच्या** अवन्ती येथील दरबाराच्या नवरत्नांत उल्लेखिलेले 'क्षपणक' म्हणजे हे **सिद्धसेन आचार्यच** होत असें विद्वानांचें मत आहे. हे श्वेताम्बर सम्प्रदायाचे मुनि होते तरी त्यांच्या विचारसरणीवर दिगम्बर परम्परेचा बराच प्रभाव पडला होता. त्यामुळें उभय परंपरांत त्यांना आदराचें स्थान प्राप्त झालें आहे. भाष्ययुगाच्या समाप्तीच्या सुमारास, पांचव्या शतकांत ते झाले. त्यामुळें आगामी व्यवस्थापनयुगाचीं बीजेंहि त्यांच्या वाङ्मयांत दृग्गोचर होतात.

'सम्मइ सुत्त' हा **सिद्धसेनांचा** मुख्य प्राकृत ग्रन्थ आहे. 'न्यायावतार' हा संस्कृत ग्रन्थ आणि बत्तीस श्लोकांचीं कांहीं प्रकरणें – 'द्वात्रिंशिका' हें त्यांचें अन्य वाङ्मय होय. अशीं एकवीस प्रकरणें उपलब्ध आहेत. त्यांतील दोन प्रस्तुत **सिद्धसेनांचीं** नव्हेत असें अलीकडे विद्वानांनीं ठरविलें आहे.

प्रमाणांच्या स्वरूपाचें व्यवस्थित विवेचन हें **सिद्धसेनांचें** पहिलें महत्त्वपूर्ण कार्य होय. जैन आगमांत आणि पूर्ववर्ती आचार्यांच्या वाङ्मयांत या विषयासंबंधीं जे विचार व्यक्त झाले होते त्यांचें त्यांनीं तर्कशुद्ध पद्धतीनें संपादन केलें. प्रमाण परप्रकाशक आहे तसेंच स्वप्रकाशकहि आहे ही भूमिका त्यांनीं पुन्हां प्रस्थापित केली. अनुमानाप्रमाणेंच प्रत्यक्ष प्रमाणाचेंहि स्वार्थ व परार्थ हे भेद होतात हें त्यांनीं निर्दिष्ट केलें. बौद्ध पंडित प्रत्यक्षाला प्रमाण मानीत परंतु अनुमान प्रमाण भ्रान्त आहे असें त्यांचें मत होतें. याचें कारण हें कीं अनुमानाच्या प्रामाण्याकरतां चिरकाल अस्तित्वांत राहणाऱ्या नियमाची – व्याप्तीची आवश्यकता असते आणि बौद्ध दर्शनांतील क्षणिकत्वाच्या सिद्धान्तामुळें चिरस्थायी वस्तुतत्त्वाला मान्यता देणें बौद्ध पंडितांना शक्य नव्हतें. **सिद्धसेनांनीं** असें दर्शविलें कीं अनुमानाचें प्रामाण्य प्रत्यहींच्या व्यवहारावरून स्पष्टपणें सिद्ध होतें आणि त्यावरूनच वस्तु द्रव्यदृष्ट्या नित्य आहे हेंहि स्पष्ट होतें. या प्रत्यक्षसिद्ध वस्तुस्थितीची उपेक्षा करून अनुमानाला भ्रान्त समजणें चूक आहे, – तो 'वदतो व्याघात' आहे हें त्यांनीं स्पष्ट केलें. त्याच वेळीं अनुमानाच्या अंगोपांगांचें विशद वर्णन करून त्यांनीं जैन प्रमाणशास्त्राचा पाया घातला. उत्तरकालीन जैन तार्किकांनीं प्रायः याच आधारावर प्रमाणशास्त्राचा सूक्ष्म विचार केला आहे.

जैन तर्कशास्त्राचें हें वैशिष्ट्य नयवादाच्या रूपानें विस्तारानें स्पष्ट करणें हें **आचार्य सिद्धसेनांचें** दुसरें महत्त्वपूर्ण कार्य होय. **भगवान् महावीरांच्या** उपदेशाचा विस्तार द्रव्यार्थिक व पर्यायार्थिक या दोन मूलभूत नयांच्या आधारानें झाला आहे. अनादि, अनंत, सामान्य, नित्य अशा द्रव्याला विषय करणाऱ्या ज्ञानांशाला द्रव्यार्थिक नय म्हणतात. सादि, सांत, विशेष व अनित्य अशा पर्यायाला – द्रव्याच्या तत्कालीन अवस्थेला विषय करणाऱ्या ज्ञानांशाला पर्यायार्थिक नय म्हणतात. हे नय परस्पर अविरोधी असतील तर ते सत्य वस्तुस्थितीचे निर्देशक होतात. पण तो विवेक सोडून दुसऱ्या नयाचा निषेध करणारा नय हा दुर्नय होतो – भ्रमोत्पादक ठरतो हा विवेक सोडल्यामुळेंच सांख्यांच्या सद्वादांत बौद्धांनीं दाखविलेले दोष योग्य आहेत व बौद्धांच्या असद्वादांत सांख्यांनीं दाखविलेले दोषहि योग्य आहेत. क्षणवर्ती द्रव्यावस्थेला विषय करणारा नय त्रिकालवर्ती द्रव्याला विषय करणाऱ्या नयाचा निषेध करतो असें मानल्यामुळेंच बौद्धांना क्षणिकवाद स्वीकारून सामान्याच्या प्रत्यक्षसिद्ध अनुभूतीला 'भ्रम' ही संज्ञा द्यावी लागली. उलट पक्षीं, सर्वतः प्रत्ययाला येणारे भेद आभासमात्र आहेत असा सिद्धान्त ब्रह्मवादी वेदान्त्यांना स्वीकारावा लागला. **सिद्धसेनांनीं** असें प्रतिपादन केलें कीं प्रत्यक्षाची उपेक्षा करून नय परस्परविरोधी मानण्याची ही प्रवृत्ति चुकीची आहे. वस्तुतः नय परस्परपोषक आहेत व असें मानलें तरच ते प्रमाणज्ञानाचे अंश होऊं शकतात. क्षणिकवाद व ब्रह्मवाद हे जसे दुर्नय आहेत.








तसे इतर दुर्नय असंख्य आहेत. प्रत्येक वाक्य हें ज्ञानाचा अंश असतें म्हणून तें एका विशिष्ट नयाचें द्योतक असतें. त्यामुळें वचनांचे जितके प्रकार आहेत तितकेच नयवाद होतात. ते सर्व परस्परपोषक असले तर सन्नय होऊन जैन सिद्धान्ताला मान्य होतात. तेच परस्परविरोधी असले तर दुर्नय होऊन परसमय, जैन सिद्धान्ताला अमान्य ठरतात.

**सिद्धसेनांचा** तिसरा महत्त्वाचा विचार सर्वज्ञाच्या ज्ञानाविषयीं होता. श्वेताम्बर–परंपरेंत असा वाद रूढ झाला होता कीं सर्वज्ञाच्या ज्ञान व दर्शन या गुणांचा उपयोग क्रमवर्ती असतो, ज्या क्षणीं ज्ञानोपयोग असतो त्याक्षणीं दर्शनोपयोग नसतो. या विचाराचें खंडन करून ज्ञान व दर्शन या दोन्ही उपयोगांचें सर्व क्षणीं युगपत् अस्तित्व सर्वज्ञांत असतें या दिगम्बर–परम्परेच्या विचाराचा त्यांनीं स्वीकार केला. त्यामुळेंच परंपराभिमानी श्वेतांबर-आचार्यांत ते कांहींसे अप्रिय झाले आहेत.

भाष्ययुगांतील ग्रंथकर्त्यांचा भर परपक्षाच्या खण्डनावर होता. परंतु स्वपक्षाच्या व्यवस्थित रचनेचीहि तितकीच आवश्यकता आहे हें लक्षांत यायला कांहीं काळ लोटावा लागला. सातव्या शतकांत **उद्योतकर, गौडपाद आणि धर्मकीर्ति** यांनीं आपल्या ग्रन्थांतून क्रमशः न्याय, वेदान्त व बौद्ध दर्शनांचें नव्यानें प्रतिपादन केलें व आपापलें तत्त्वज्ञान अधिक व्यवस्थित स्वरूपांत मांडण्याचा प्रयत्न केला. या व्यवस्थापनयुगाचें प्रवर्तन जैन तर्कशास्त्रांत **भट्ट अकलंकदेव** यांनीं याच सुमारास केलें.

**अ**कलंक हे लघुहव्व राजाचे पुत्र होते. दिगम्बर सम्प्रदायाचे आचार्य म्हणून राष्ट्रकूट राजा साहसतुङ्ग[२] याच्या दरबारापासून आरम्भ करून त्यांनीं अनेक वादविवाद केलें. सन ६०० ते ६६० या काळांत त्यांनीं आपलें कार्य केलें. दक्षिण भारतांतील बौद्ध संप्रदायाच्या प्रभावापासून जैन दर्शनाचें रक्षण करून त्यांनीं जैन तर्कशास्त्रांत मोलाची भर घातली. गृध्रपिच्छविरचित ‘ तत्त्वार्थसूत्रां ’वर ‘ तत्त्वार्थवार्तिक ’ हा ग्रन्थ लिहून त्यांनीं जैन सिद्धान्तांवरील उक्त, अनुक्त व दुरुक्त अशा त्रिविध आक्षेपांचें निराकरण केलें. **समन्तभद्रकृत** ‘ आप्तमीमांसा ’ ग्रन्थावर ‘ अष्टशती ’ हें स्वल्पाक्षर पण अर्थगम्भीर भाष्य लिहून स्याद्वादाचें प्रभावी समर्थन केलें, आणि ‘ प्रमाणसंग्रह ’, ‘ न्यायविनिश्चय ’, ‘ सिद्धिविनिश्चय ’ व ‘ लघीयस्त्रय ’ हे चार प्रकरणग्रन्थ लिहून जैन प्रमाणशास्त्राची सुव्यवस्थित पुनर्रचना केली.

**गृध्रपिच्छ आचार्यांनीं** प्रत्यक्ष व परोक्ष असे प्रमाणाचे दोन प्रकार केले होते. अकलंकदेवांनीं या दोनहि प्रकारांचें विस्तृत विवरण केलें. इंद्रियजन्य ज्ञान हें परोक्ष आहे, असें पूर्ववर्ती जैन आचार्यांचें मत होतें. कारण इंद्रियजन्य ज्ञान साक्षात् आत्म्याला होत नाहीं तर इंद्रियद्वारें होतें. **अकलंकांनीं** असें प्रतिपादन केलें कीं इंद्रियजन्य ज्ञान हें इंद्रियद्वारें होत असल्यामुळें साक्षात् नसलें तरी व्यवहारतः तें ज्ञान प्रत्यक्षाइतकेंच विशद असतें व म्हणून त्यालाहि सांव्यवहारिक प्रत्यक्ष मानलें पाहिजे. मुख्य प्रत्यक्षज्ञान मात्र त्यांनींहि अतींद्रियच मानलें आहे. परोक्षज्ञानाचे पांच भेद स्मृति, प्रत्यभिज्ञान, तर्क ( व्याप्तिज्ञान ), अनुमान व आगम हे आहेत असें दर्शवून त्यांनी प्रमाणविचारांत पूर्णता आणली. व्याप्तीचें ग्रहण करणारें प्रमाण अनुमान नाहीं कारण अनुमानाच्या उपयोगाकरतां व्याप्तिज्ञान अगोदरच अस्तित्वांत असावें लागतें म्हणून या अनुमानपूर्व स्वतंत्र प्रमाणाला त्यांनी तर्क ही संज्ञा दिली व परोक्ष प्रमाणाचा तो एक स्वतंत्र भेद आहे हें निर्दिष्ट केलें. **न्यायदर्शनाचें** उपमानप्रमाण केवळ सादृश्याचें ग्रहण करतें परंतु प्रत्यभिज्ञान-प्रमाणानें सादृश्याप्रमाणेंच वैसादृश्याचेंहि ग्रहण होतें हें त्यांनीं प्रथम निर्दिष्ट केलें. **भट्ट अकलंकदेवांच्या** या विवेचनाचें सार काढूनच पुढें **आचार्य माणिक्यनंदि** यांनीं ‘ परीक्षामुख ’ या सूत्रग्रंथाची रचना केली. हा ग्रंथ आजहि जैन प्रमाणशास्त्राचा प्रमाणभूत ग्रंथ मानला जातो.

तत्त्वज्ञानाच्या सर्वंकष अभ्यासाला प्रोत्साहन देणें हें **अकलंकदेवांचें** दुसरें महान् कार्य होय. ‘ सिद्धि-

२. या राजाची राजधानी मान्यखेट ( सध्यांचें हैद्राबाद संस्थांनांतील मलखेड) येथें होती असा विद्वानांचा अंदाज आहे.












विनिश्चय' या आपल्या ग्रंथांत जीवसिद्धि, सर्वज्ञसिद्धि, स्याद्वादसिद्धि इत्यादि सोळा विषयांचा त्यांनीं जो ऊहापोह केला आहे त्यावरून हें स्पष्ट होतें. आपल्या वेळीं उपलब्ध व प्रचलित असलेल्या सर्व तत्त्वज्ञान-प्रवाहांचा अभ्यास करून त्यावर तत्त्वज्ञानकोशाच्या स्वरूपाचे व्यापक ग्रंथ लिहिण्याची जी पद्धति पुढें **वाचस्पतिमिश्र, उदयन, जयन्तभट्ट, विद्यानन्द, शान्तरक्षित** इत्यादि प्रायः सर्व दर्शनांच्या तत्त्ववेत्त्यांत आढळते, तिचा प्रारंभ जैन संप्रदायांत **अकलंकदेवांच्या** ग्रन्थापासून झाला आहे. 'तत्त्वार्थवार्तिका'च्या चवथ्या अध्यायाच्या समारोपांत जीवतत्त्वाविषयीं त्यांनीं जें विवेचन केलें आहे त्यावरून समकालीन व पूर्ववर्ती भारतीय तत्त्वज्ञानप्रवाहांचें त्यांचें ज्ञान किती वस्तुनिष्ठ, गंभीर, निःपक्षपाती आणि निर्णायक होतें याची चांगली कल्पना येते. त्यांचे ग्रंथ सागरोपम आहेत ही ख्याति दुर्गमतेप्रमाणेंच विशालता व गंभीरता या गुणांमुळेंहि प्रतिष्ठित झाली आहे.

**स**र्वंकष अभ्यासाच्या वातावरणाला पुढल्याच शतकांत झालेल्या **हरिभद्रसूरि** या महान् आचार्यांनीं अधिकच प्रभावी केलें. सन ७०० ते ७७५ मध्यें झालेले हे आचार्य प्रथम चतुर्वेदपारंगत ब्राह्मण विद्वान् होते. परन्तु **याकिनी महत्तरा** या साध्वीच्या प्रभावानें ते जैन भिक्षु झाले व **जिनभटसूरींचे** युगप्रधान शिष्य म्हणून श्वेताम्बर-सम्प्रदायाचे आचार्य झाले. प्राकृत व संस्कृत या उभय भाषांवर त्यांचें प्रभुत्व होतें. त्यांच्या लेखनांत विषयांची विविधताहि खूप आढळते. त्यांच्या ७६ उपलब्ध ग्रन्थांत 'समराइच्चकहा', 'धूर्ताख्यान', 'शास्त्रवार्तासमुच्चय', 'षड्दर्शनसमुच्चय', 'अनेकान्त-जयपताका', 'विशेषावश्यकभाष्य', 'नंदिसूत्रवृत्ति', 'योग-बिन्दु' व 'सम्बोधपंचाशक' हे नऊ ग्रंन्थ प्रमुख आहेत.

अन्य दर्शनांचा अभ्यास सहाभूतीनें करण्याची प्रवृत्ति हा **हरिभद्रसूरींचा** विशेष होय. 'षड्दर्शन-समुच्चय' या ग्रंन्थांत त्यांनी बौद्ध, सांख्य, न्याय वैशेषिक, मीमांसा व चार्वाक या जैनेतर दर्शनांचे मूलभूत सिद्धान्त संकलित केले आहेत. या संकलनाची या दर्शनांच्या सूत्रग्रंन्थांशीं तुलना केली तर **हरिभद्रांनीं** हें कार्य किती प्रामाणिक व निःपक्षपाती धोरणानें केलें आहे, त्याची स्पष्ट कल्पना येते. **दिङ्नागाच्या** 'न्याय-प्रवेशा'वर टीका लिहून तर त्यांनी एका नवीनच परंपरेला प्रारंभ केला. प्रतिपक्षाच्या वादींचा उल्लेख त्यांनीं सर्वत्र अत्यंत आदरानें केला आहे. **कपिल, बुद्ध** इत्यादि प्रवर्तक तत्त्ववेत्ते मोक्षप्राप्तीच्या एकाच इच्छेनें प्रेरित झाले होते. म्हणून त्यांचे सिद्धान्त आपणांस पटत नसतील तरी त्यांच्यावर हेत्वारोप करून त्यांचा अधिक्षेप करणें योग्य नव्हें असें प्रतिपादन करून 'जो दुसऱ्या धर्माची निन्दा करतो तो स्वतःच्या धर्माची अवनति करतो' या **सम्राट् अशोकाच्या** सिद्धान्ताचें त्यांनीं प्रभावी समर्थन केलें. 'अनेकान्तजयपताका' या ग्रन्थांत जैनेतर सिद्धान्तांचें विस्तृत खण्डन करूनहि त्यांनीं त्या सिद्धान्तांच्या प्रवर्तकांचा कुठेंच अधिक्षेप केलेला नाहीं.

असें असलें तरी सर्वधर्मसमन्वयाच्या नांवानें अज्ञानाला प्रोत्साहन देण्याचें धोरण **हरिभद्रांना** मुळींच संमत नव्हतें. विभिन्न दर्शनांचे सिद्धान्त परस्परविरोधी आहेत. म्हणून तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत सर्वधर्म शेवटीं एकच तत्त्व सांगतात असें म्हणणें म्हणजे त्या दर्शनांचें आकलनच आपणांस झालें नाहीं हें मान्य करणें होय याची त्यांना स्पष्ट जाणीव होती. त्यामुळें **बुद्ध, कपिल** इत्यादि व्यक्तींविषयीं आदर असूनहि त्यांच्या तर्क-विसंगत सिद्धान्तांचें त्यांनी विस्तारानें खण्डन केलें आहे. तत्त्वज्ञानकोशासारखे ग्रन्थ लिहिण्याची अकलंकदेवांची पद्धति स्वीकारून त्यांनी अनेक प्रकरणग्रन्थ लिहिले. परंपरेनुसार त्यांच्या ग्रन्थांची संख्या १४४४ सांगितली जाते.

आगमयुगांत तर्कविद्येविषयीं असलेली उपेक्षा दूर होऊन सूत्रयुगांत **गृध्रपिच्छ आचार्यांनीं** ज्या प्रमाण व नयांच्या शास्त्राचा निर्देश केला त्याचें समर्थन व प्रतिपादन भाष्ययुगांत **स्वामी समन्तभद्र** व **आचार्य सिद्धसेन** यांनी केलें आणि व्यवस्थापन-युगांत त्याच आधारावर सर्वंकष अभ्यासाच्या आधारानें **भट्ट अकलंकदेव** व **हरिभद्रसूरि** यांनीं जैन तर्क व प्रमाण-शास्त्राचा विस्तार केला. त्यामुळें हे चार जैन तार्किक जैनपरंपरेंत महान् प्रवर्तक आचार्य व युगकर्ते म्हणून प्रख्यात झाले आहेत.









अनुक्रमणिका

प्रा. दे. द. वाडेकर

# संमेलनाध्यक्ष डॉ. शंकरराव पेंडसे

## अभिनंदनीय निवड

मित्रवर्य डॉ शंकरराव पेंडसे हे यंदाच्या पंढरपुरीं भरणाऱ्या मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष निवडून आले या घटनेनें त्यांच्या मित्रवर्गास विशेष आनंद होणें साहजिक आहे. पंढरपूरच्या संमेलनाच्या स्वागत-समितीनें साहित्य परिषदेकडून बिनविरोध संमत होऊन पुढील शेवटच्या निवडीसाठीं आलेल्या तीन नांवांतून डॉक्टर पेंडशांचें नांव खूपच मोठ्या बहु-मतानें आपल्या अध्यक्षपदासाठीं स्वीकारलें आहे. ही एकंदरीनें इष्ट अशीच घटना घडली. –' एकंदरीनें ' म्हणण्याचें कारण असें कीं या निवडीपूर्वीं थोडा वाद उत्पन्न होऊन त्यांत साहित्य संमेलनाध्यक्षांच्या निवड-णुकींत निर्भेळ साहित्यदृष्टि ठेवावी कीं तींत थोडी राजकारणी दृष्टीची सरमिसळ होऊं द्यावी असा प्रश्न उपस्थित करण्यांत आला होता, व त्यामुळें वातावरण थोडें धूसर झालें होतें. शिवाय, या निवडणुकींतील इतर उमेदवार म्हणजे प्रो. रा. श्री. जोग व श्री. चिं. ग. कर्वे हेहि आपापल्यापरीनें श्रेष्ठ साहित्यसेवक असून हे तिघेहि एकमेकांचे ( व प्रस्तुत लेखकाचे ) निकट स्नेही होत. आपलीं नांवें एकमेकांविरुद्ध निवडणुकीस घालण्यासाठीं संमति देतांना तिघांनाहि थोडें चमत्का-रिक वाटल्यास नवल नाहीं. परंतु समाधानाची गोष्ट अशीं कीं त्यांची एकमेकांतील समजूत इतकी निर्मळ आहे कीं त्यांनीं या निवडणुकीच्या धुरोळ्यानें आपला वैयक्तिक स्नेह मलिन होऊं द्यावयाचा नाहीं अशी खूणगांठ बांधून ठेविली होती व त्याबरहुकूम आचरणहि केलें ! सार्वजनिक रीत्या संयुक्त महाराष्ट्राच्या आजच्या राजकारणाच्या दृष्टीनें या वर्षी तरी विदर्भांतीलच अध्यक्ष ( म्हणजे डॉ. पेंडसे ) निवडणें युक्त होय असा युक्तिवाद केला गेला; तर या निवडींत राजकार-णाची दृष्टि न आणतां शुद्ध साहित्याच्या दृष्टीनेंच सन्माननीय अध्यक्षाची निवड करणें युक्त होईल अशीहि भलावणी करण्यांत आली ! समाधानाची गोष्ट अशी कीं कोठलीहि दृष्टि ठेवली तरी डॉ. शंकररावांस वगळणें कठीणच होतें ! उलट, हेंहि खरें कीं शंकररावां-च्या मानानें इतर उमेदवारांस अगदींच कमीं मतें पडलीं तरी, व त्यांतल्या त्यांत जोगांना तर फारच कमी पडलीं तरी, त्यावरुन त्यांच्या साहित्याचें मोल इतरांपेक्षां कमी होतें असा बिलकूल भाग नाहीं. तिघांनींहि आपापल्या क्षेत्रांत विशाल स्वरूपाचीं कार्यें केलीं आहेत, व तीं आपल्या भाषेस सारखींच भूषण-भूत ठरलीं आहेत. परंतु निवड म्हटली कीं एकच उमेदवार निवडून येऊं शकतो ही एक जीवनांतील अटळ घटना आहे, आणि तिचा योग्य तोच अर्थ घेतला पाहिजे. निवडणूक म्हणजे मूल्यमापन नाहीं. खऱ्या मूल्यमापनाला निवडणुकीची मर्यादा लावितां येत नाहीं. पण निवडणुकीशिवाय व्यवहारहि चालत नाहीं; व व्यवहारांतील निवडणुकींत एकाचा विजय किंवा स्वीकार म्हणजे इतरांचा पराभव किंवा अस्वीकार असा अर्थ होत असल्यानें या निवडणुकीनें या तीनहि उमेदवारांस साधारण अशा मित्रांच्या मनांत थोडी संमिश्र भावना उद्‌भूत होणें अपरिहार्य होतें. म्हणूनच ही निवड ' एकंदरीनें ' इष्ट अशीच घटना घडली असें वर म्हटलें. डॉ. पेंडसे यांचें या निवडणुकीबद्दल हार्दिक अभिनंदन करतों.

## तिचें इष्टत्व

प्रत्यक्ष घडलेल्या या घटनेचें इष्टत्व अनेक रीतींनीं पटवून देतां येईल. डॉ. पेंडसे हे एक गाढे व विवेचक साहित्याभ्यासी असून त्यांनीं आपल्या विषयांत अनेक उच्च विश्वविद्यालयीन पदव्या संपादन केल्या आहेत व अनेक ग्रंथहि लिहिले आहेत. ही एकच गोष्ट त्यांचा संमेलनाध्यक्षपदावरील निर्विवाद अधिकार सिद्ध कर-ण्यास पुरेशी आहे. परंतु याशिवाय इतरहि दृष्टींनीं त्यांच्या निवडीचें औचित्य लक्षांत येण्यासारखें आहे. डॉ. पेंडसे आतां आपल्या प्राध्यापकव्यवसायांतून निवृत्त होण्याच्या मार्गावर आहेत. तसेंच, जेथें



अनुक्रमणिका






संमेलन भरणार त्या पंढरपूर क्षेत्राच्या दृष्टीनें त्याशीं निगडित असणाऱ्या भागवत धर्मसंप्रदायाच्या साहित्याचा डॉ. पेंडसे यांच्याइतका विवेचक, निःपक्षपाती व संप्रदायनिर्विशेष दीर्घाभ्यासंगी विरळा. तसेंच, डॉ. पेंडसे हे एका विशिष्ट अर्थानें बृहन्महाराष्ट्रीय किंवा सार्वमहाराष्ट्रीय आहेत. या अर्थानें कीं विद्यार्थिदशेंत ते बृहन्महाराष्ट्रांत पुष्कळ फिरले-राहिले आहेत. ( पुढील जीवनांत ते १९३७ सालीं पुण्यास भरलेल्या बृहन्महाराष्ट्र संमेलनाचे अध्यक्षहि झाले. ) इतकेंच काय, ते मूळचे इकडच्या पुणें - मुंबई भागांतले असून त्यांनीं आपलें लहानपण व नंतरची ऐन कर्तबगारीचीं गेलीं तीस वर्षें विदर्भांत — नागपूरांत घालविलीं आहेत. यामुळें पुण्या — मुंबईचा महाराष्ट्रीयांचा दृष्टिकोण व मनोगत ते ज्या प्रमाणें विदर्भीय महाराष्ट्रीयांस आपुलकीच्या जवळिकीनें समजावून सांगूं शकतात व सांगतात, त्याचप्रमाणें विदर्भीयांच्या मानस— प्रकृतीचें वर्णन व समर्थन ते जातीच्या प्रतीतींतून उत्पन्न झालेल्या सहानुभूतीनें ते इकडील महाराष्ट्रीयांजवळ करूं शकतात व करतात. आणि या दृष्टीनें डॉ. शंकरराव हे पुण्यांत — मुंबईत नागपूरचे प्रतिनिधित्व करण्यास जसे अत्यंत लायक, तसेंच ते नागपुरांत पुण्याचें प्रतिनिधित्व करण्यास अत्यंत लायक ठरले आहेत. आणि म्हणूनच या संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीच्या वेळीं त्यांचेसारखा महाराष्ट्र-समन्वयवादी दृष्टीच्या प्रखर संयुक्तमहाराष्ट्रवादी सार्वमहाराष्ट्रीय प्रतीकरूप असलेल्या अधिकारी साहित्यिकानें संमेलनाध्यक्ष होणें हें अत्यंत उचित ठरेल यांत शंका नाहीं.

## वणवणींतील शिक्षण व दृष्टिकोण

माझ्यासारख्या त्यांच्या (साहित्यक्षेत्रांतील नव्हे, तर खासगी जीवनांतील ) मित्रास हें त्यांचें भारतीय पार्श्वभूमीवरील सार्वमहाराष्ट्रीय प्रतीकत्व हेंच त्यांच्या जीवनक्रमाचें प्रधानसूत्र दिसतें. त्यांनीं जन्मभर जो अध्ययन-अध्यापन हा ब्राह्मण्याचा व्यवसाय केला, त्या व्यवसायांत उभ्या भारताच्या पोटांतील बृहन्महाराष्ट्र हेंच त्यांनीं आपलें विशेषत्वानें कार्यक्षेत्र मानलें असें दिसतें. एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीस ( इ. स. १८९७ ) कोंकणांतील रत्नागिरी जिल्ह्यांतील खेड या गांवी जन्मलेला हा मूळचाच अति हुशार मुलगा वयाच्या ७।८ व्या वर्षीच वऱ्हाडांतल्या वाशीम या गांवीं आपल्या आजोळीं दुय्यम शिक्षणासाठीं गेला. ते दिवस राष्ट्रीय आंदोलनाचे होते, व १९०८ सालीं टिळकांना शिक्षा झाल्यावेळीं शाळेंतील गैरहजेरी व त्याच वेळीं बाहेरच्या जाहीर सभेंतील भाषण या त्यांच्या गुन्ह्यांमुळें सरकारी हुकुमावरून त्यांस त्यांच्या शालेय जीवनांतून कायमचें हद्दपार करण्यांत आलें! यानंतर ज्ञानार्जनासाठीं शंकररावांनीं केलेली पायपिटी व वणवण काय विचारावी ? सरकारमान्य शिक्षणसंस्थांत प्रवेश नाहीं, पण ज्ञानोपासना करावयाचा कृतनिश्चय होता. घरचा आर्थिक पुरवठा अल्पल्प, किंबहुना नाहींच. अशा परिस्थितींत सरकारमान्य शिक्षणाकडे कांहीं काळ तरी पाठ फिरवून त्यांनीं खासगी गुरु व पाठशाळा यांचा आश्रय करण्याचें ठरविलें व उभा महाराष्ट्र व 'हिंदोस्तान' त्यासाठीं पालथा घातला. महाराष्ट्रांत जळगांवास ते शिंत्रेशास्त्रींजवळ व अमळनेरास तत्त्वज्ञानमंदिरांत शिकले. ( जळगांवास प्रो. श्री. ना. बनहट्टी त्यांचे सहाध्यायी होते. ) हिंदोस्तानांत त्यांनीं काशी, कलकत्ता, लाहोर, इत्यादि ठिकाणीं लोकाश्रयानें वसती करून तेथील पाठशाळांतून वैराग्यशील तापसवृत्तीनें अनेक प्राच्यविद्याविषयांचें सखोल अध्ययन केलें आणि या अध्ययनाच्या जोरावर त्यांनीं कलकत्त्यास "वेदान्ततीर्थ" ( १९२० ) व लाहोरास "शास्त्री" ( १९२१ ) या पदव्या उत्कृष्ट दर्जानें मिळविल्या. पंजाब विश्वविद्यापीठाच्या 'शास्त्री' पदवीधराला मॅट्रिक, इंटर, व बी. ए. परीक्षांना खाजगी रीतीनें बसतां येत असल्यामुळें पुनश्च सरकारमान्य विद्यापीठाचा मार्ग मोकळा झाला. दिल्लीच्या हिंदु कॉलेजांतून बी. ए. ( १९२३ ) झाल्यानंतर त्यांना लाहोरच्या सनातनधर्म कॉलेजांतून पंजाब विश्वविद्यापीठाच्या एम्. ए. (१९२४) व एम्. ओ. एल्. (मास्टर ऑफ ओरिएंटल लर्निंग) (१९२४) या संस्कृत व प्राच्यविद्या या विषयांतील सर्वोच्च पदव्या त्यांनीं मिळविल्या. परंतु एवढ्यानें त्यांचें अध्ययन व पदवीसंपादन त्यांनीं संपविलें नाहीं. तर यानंतर त्यांनीं पुण्यास येऊन कायद्याची एल्‌एल्. बी. परीक्षा द्यावयाच्या उद्देशानें येथील लॉ कॉलेजांतहि नांव घातलें होतें; व त्याच सुमारास म्हणजे १९२५ सालीं त्यांचा विवाहहि झाला. या काळापूर्वीच त्यांनीं मराठींत वक्तृत्व व लेखनासहि सुरवात केली होती व








त्यांत त्यांनीं चांगलेंच नांव मिळविलें होतें. या कीर्तीवर त्यांना नागपूरच्या हिस्लॉप कॉलेजमधील मराठीच्या प्राध्यापकाची जागा १९२७ सालींच मिळाली हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. मूळचें त्यांचें पाठशालेय व विद्यापीठीय विद्वत्त्व संस्कृतचें होतें— व मिळालेलें प्राध्यापक पद मराठीचें होतें. परंतु तो व्यवसाय एकदां ठरविल्यानंतर ते त्यासाठीं लौकिकदृष्ट्या आवश्यक असणाऱ्या मराठींतील विद्यापीठीय बिरुदांच्या संपादनासहि मोठ्या उत्साहानें लागले; व प्राध्यापकी करीत असतांच त्यांनीं नागपूर विद्यापीठाची मराठींतील एम्. ए. ची पदवी ( १९३० ) पहिल्या श्रेणींत मिळविली; आणि त्यानंतर अनेक वर्षांच्या दार्घ परिश्रमांनीं ज्ञानेश्वरांच्या तत्त्वज्ञानासंबंधीं भरींव प्रबंध लिहून पीएच्. डी. ची पदवीहि ( १९३९ ) त्यांनीं मिळविली ! ज्ञानसंपादनासाठीं एवढी दीर्घ, चिकाटीची व खडतर तपश्चर्या फार थोड्यांच्या हातून घडेल यांत शंका नाहीं. आपल्या मराठी विद्वत्तेस संस्कृत विद्वत्तेचा एवढा भरभक्कम पाया पुरविणारे व तिला मौलिक संशोधनांचा कळस चढविणारे मराठीचे प्राध्यापक विरळाच असणार हें उघड आहे ! प्राध्यापनाचा व्यवसायधर्म आचरण्यासाठीं ही शंकररावांनीं जी दीर्घ तपस्या केली, तिच्यासाठीं ते बृहन्महाराष्ट्रभर व हिंदोस्तानभर हिंडले – फिरले व मध्यमहाराष्ट्रांतला मूळचा रहिवास असणारे शंकरराव महाराष्ट्राच्या उत्तर सीमाप्रांतांत जाऊन त्याचीच आपल्या धर्माचरणाचें क्षेत्र म्हणून निवड करते झाले. आणि अशा तऱ्हेनें त्यांनीं आपल्या जीवनास खऱ्या खुऱ्या अर्थानें भारतीय व महाराष्ट्रीय अनुभूतीचा दृष्टिकोण प्राप्त करून दिला.

### अध्यापन

शंकररावाचा पिंड व प्रवृत्ति जात्याच कुशाग्रबुद्धि विद्वानाची आहे. विद्यार्थिदशेंत त्यांनीं विद्वत्तासंपादनासाठीं जसे अपरंपार परिश्रम केले तसे त्यांनीं अध्यापन व लेखनव्यवसायांतहि विपुल कष्ट केले आहेत. अध्यापनविषयाचा ते सांगोपांग, कसून व मूलगामी अभ्यास करतात – तसा त्यांचा स्वभावच आहे. त्या कारणानें त्यांचें अध्यापन भरींव असल्याची त्यांची ख्याति आहे. त्यांचें अध्यापन केवळ तास भरून काढण्यासाठीं नसून त्यांत कांहीं योजना व आंखणी असावयाची. आणि त्यांत फुटकळ व बारकाव्याच्या तपशिलाच्या मांडणीबरोबर एकाद्या विशाल सिद्धान्ताची मांडणी असावयाची. आणि हें जसें त्यांच्या अध्यापनासंबंधीं खरें आहे, तसें तें त्यांच्या भाषण-लेखनासंबंधींहि खरें आहे.

### " ज्ञानेश्वरावर आतां लिहिण्याचें कांहीं राहिलें नाहीं "

त्यांचे जे चार-पांच ग्रंथ प्रसिद्ध आहेत, त्यांतील मुकुटमणि म्हणजे त्यांचा पीएच्. डी. परीक्षेचा संशोधनप्रबंध " ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान " ( १९४१ ) हा होय. या ग्रन्थासाठीं त्यांनीं शब्दशः अपरिमित परिश्रम केले. कित्येक जुने व दुर्मिळ ग्रंथ, हस्तलिखितें, लेख, वगैरेंचे त्यांनीं बारकाईनें अवलोकन केलें, – प्रवासहि केला त्यांत नेवाशासहि. " भाष्यकारातें वाट पूसतु " या ज्ञानेश्वरांच्या विख्यात उद्गारांतील भाष्यकार कोण या प्रश्नाचा छडा लावण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रदीर्घ परिश्रम प्रस्तुत लेखकानें जवळून पाहिले आहेत. गीतेवरील अनेक भाष्यांचें अवलोकन व त्यांतील गीतार्थ विवरणाशीं ज्ञानेशांच्या गीतार्थविवरणाची तुलना – हा त्यांचा उद्योग कित्येक सुट्टयांमधून पुण्यास परिषदेच्या कचेरींतील त्यांचा मुक्कामांत अखंड चाललेला असे. या किचकट संशोधनाचें फळ पहावें तों केवळ एक लहान विधान कीं त्या उद्गारांतील भाष्यकार शंकराचार्यच होत ! पण तो प्रश्न त्यासंबंधीं पेंडशांनीं पुराव्याचा डोंगरच उभा केल्यामुळें एकदांचा निकालांत निघाला ! अशाच प्रकारें ज्ञानेश्वर, त्यांचे ग्रंथ व तत्त्वज्ञान, इत्यादि संबंधींच्या अनेक प्रश्नांसंबंधीं त्यांनीं आपल्या ग्रंथांत विपुल व निर्णायक पुरावे मांडून त्यांची तड लावण्याचा प्रयत्न केला आहे. "आतां या विषयावर लिहिण्याचें कांहीं राहिलें नाहीं, " असे उद्गार या ग्रंथाचे परीक्षक कै. पांगारकर यांनीं म्हटलें आहे ! ही स्तुति संपादन करणारी शंकररावांची कर्तबगारी मोठीच म्हटली पाहिजे यांत शंका नाहीं.

### विद्वत्त्व व सिद्धान्तित्व

" ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान " हा ग्रंथ त्यांच्या ग्रंथांचा मेरुमणि हें खरें; पण त्यांतील वर उल्लेखिलेले गुण त्यांच्या इतरहि लेखनांत कमीअधिक अंशांत आढळतातच. त्यांनीं लिहिलेली " कर्मयोग कीं कर्मसंन्यास ? " या टिळकांनीं पाहिलेल्या 'गीतारहस्य' व








गीताभाष्य यांच्या तुलनेवर आधारलेली त्यांची १९२१ सालीं प्रसिद्ध झालेली लेखमाला हें त्यांचें पहिलें महत्त्वाचें लिखाण होय. तेथपासून तों एक वर्षापूर्वी (१९५४) त्यांची 'ज्ञानेश्वरीचा अभ्यास' ही कौशिक– व्याख्यानमालेंतील त्यांची व्याख्यानमाला प्रसिद्ध झाली तेथपर्यंतच्या त्यांच्या सर्वच लिखाणांत विद्वत्त्व व सिद्धान्तित्व हे गुण प्रकर्षानें दिसून येतात हें आतां सवमान्य झालें आहे. प्रथमतः विषयाची संपूर्ण व अद्ययावत् माहिती मिळवावयाची, व नंतर तिची सामग्र्यानें चिकित्सक तपासणी व विचार करून तीवरून निष्पन्न होणारी उपपत्ति संबद्ध पुराव्यासह आपल्या सिद्धान्ताच्या रूपानें मांडावयाची हा त्यांच्या लेखनाचा विशेष आहे. ' राजगुरु श्रीसमर्थ रामदास व त्यांचे आक्षेपक' या त्यांचा बऱ्याच वर्षांपूर्वीच्या जांभेकरांच्या लोकशिक्षणांतील लेखमालेंतहि (१९३०) हेच त्यांचे गुण प्रत्ययास आले. त्यावेळीं येथील भारत-इतिहाससंशोधकमंडळांत त्यांनीं तळ ठोकून तेथील एतद्विषयक समग्र सामग्रीचा धांडोळा घेतला आणि मगच ते लिहिण्यास बसले. फार काय, परवांच्या ' ज्ञानेश्वरीचा अभ्यास ' या कौशिकव्याख्यानमालेच्या वेळींहि त्यांनीं ' डेक्कन कॉलेजां'त कांहीं आठवडे मुक्काम करून त्यांच्या ज्ञानेश्वरांवरील ग्रंथराजानंतर प्रसिद्ध झालेल्या सर्व संबद्ध साहित्याचा त्यांनीं परामर्श घेतला व त्यावरून आपल्या सिद्धान्तांची फेरतपासणी व पुनः-सिद्धान्तन केलें.

**वक्तृत्व**

लेखनांतील त्यांचे हे सर्व गुण त्यांच्या सभासंमेलनांतील प्रत्यक्ष भाषणांत श्रोतृगणाच्या दर्जास व स्वरूपास अनुसरून त्या त्या प्रमाणांत असावयाचेच. परंतु लेखनांत ज्या गुणास तितका वाव देणें शक्य व इष्ट नसतें त्या वक्तृत्वगुणाचा विकास व अभिव्यक्ति शंकररावांच्या प्रत्यक्ष तोंडीं दिलेल्या व्याख्यानां-भाषणांतून अत्यंत जोरदार व प्रभावीपणानें होत असते. आणि हा त्यांचा प्रभावी वक्तृत्वाचा गुण त्यांच्या फार लहानपणापासून त्यांच्या जीवनांत उमटलेला आहे. किंबहुना, लहानपणीं वाशीमला केलेल्या वक्तृत्वानेंच त्यांच्या जीवनास विशिष्ट वळणहि दिलें. त्यावेळच्या त्या विशिष्ट वक्तृत्वानें त्यांना गोत्यांतच आणलें हें खरें. पण हा गुण पुढें त्यांना विद्यार्थिदशेंतील जीवनार्थ कलहांत प्रत्यक्ष व्यावहारिक दृष्टयाहि फार उपयोगी पडला. कारण त्यांना त्यांच्या प्रवचन – भाषणांतील वक्तृत्वाबद्दल अनेक बक्षिसें मिळालीं व त्यांचा त्यांना त्यांच्या शिक्षणक्रमांत कांहीं उपयोग झाला. शंकरराव पूर्ववयांत ज्या वेळीं गांवोगांव प्रवचनें करीत, व्याख्यानें देत, त्या वेळीं श्रोत्यांवर त्यांच्या तेजस्वी दर्शनानें व प्रभावी वक्तृत्वानें त्यांची फार छाप पडे व 'हा कोण संप्रति नवा' अशी त्यांच्याबद्दल साभिमान कौतुकवृत्ति उत्पन्न होत असे. श्री. ना. गो. चापेकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या बडोद्याच्या साहित्यसंमेलनांत श्री. कृष्णराव मराठ्यांच्या अश्लीलतानिषेधक ठरावावर अनुकूल भाषण करतांना शंकररावांनीं फार उत्कृष्ट आणि अमोघ असें वक्तृत्व केलें तें माझ्या डोळ्यांपुढें अजूनहि उभें आहे व कानांत घुमत आहे. जितराष्ट्रांतील पराक्रमहीनांचा म्हणजेच ' हिजड्यां'चा घृणास्पद शृंगार व विजिगीषु ' शूरवीरां'चा पराक्रमोत्तर वैभवाचा शृंगार यांत त्यांनीं भेद करून, त्यांचीं ऐतिहासिक उदाहरणें देऊन, त्यांचीं कल्पनामूर्त चित्रें त्यांनीं आपल्या अमोघ वक्तृत्वानें श्रोत्यांच्या मनश्चक्षूंपुढें उभीं करून शवटीं " हें चित्र पहा व तें चित्र पहा " अशी जेव्हां श्रोत्यांपुढें आवेशपूर्ण व अंगुलिनिर्देशपूर्वक गर्जना केली तेव्हां त्या न्यायमंदिरांतील सभागृहांत झालेला दीर्घकालीन टाळ्यांचा कडकडाट अजूनहि मला ऐकूं येत आहे ! त्यांच्या वक्तृत्वांतील अनेक गुण प्रत्ययास येतात. त्यांतील मुख्य म्हणजे त्यांचा विशिष्ट परिणामकारक सान्द्र आवाज, शुद्ध, अस्खलित व प्रवाही वाणी; तेजस्वी व आशयानुकूल मुद्रा आवेश व अंगचेष्टित, श्रोत्यांच्या स्वाभिमानस्थानांची पूर्ण माहिती, पकड व उपयोग; वर्ण्यविषयांची उत्कृष्ट माहिती व सुबोध मांडणी इत्यादि – होत. हे गुण त्यांनीं निसर्गदत्त शक्तींची अभ्यासानें जोपासना करून संवर्धिले आहेत. यांशिवाय त्यांच्या वक्तृत्वाचा आणखी एक महत्त्वाचा विशेष म्हणजे त्यांतील (१) स्वधर्म (२) स्वदेश – विशेषतः महाराष्ट्र व ( ३ ) स्वभाषा यासंबंधींचा अपरंपार व सर्वंकष अभिमान ! ही त्रयी त्यांच्या वक्तृत्वांत बहुशः नेहमीं तळपत असते. त्यांच्या वक्तृत्वाच्या इतिहासांत एक मोठी विलक्षण गोष्ट घडली. ती ही कीं, ज्या वाशिमच्या शाळेंतून त्यांच्या बाल्यावस्थेंतील राष्ट्रीय वक्तृत्वाबद्दल त्यांस शैक्षणिक हद्दपारीची








शिक्षा झाली होती, त्याच शाळेनें पुढें पस्तीस वर्षांनंतर त्याच वक्तृत्वासाठीं त्यांना आपल्या वार्षिक स्नेहसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून निमंत्रिलें व माजी विद्यार्थी म्हणून गौरव केला ! हें सर्व खरें. परंतु अलीकडे वक्तृत्वाबाबतचा त्यांचा उत्साह थोडा कमी झाल्यासारखा दिसतो. पूर्वी त्यांनीं हौशी कलाकाराच्या उत्साहानें अमूप वक्तृत्व केलें व श्रोत्यांस डोलविलें. परंतु अलीकडे व्याख्यानांचीं निमंत्रणें ते टाळतात किंवा फार थोडीं स्वीकारतात असें दिसतें. 'आतां पुष्कळ झालें' असं बोलून ते निमंत्रणें टाळतात किंवा त्यांस नकार देतात असें मीं पाहिलें आहे.

त्यांच्या अध्यापकीय व एकंदर शैक्षणिक जीवनांतील अलीकडील चरित्रांतहि अशींच कांहीं निवृत्तीचीं पावलें उमटूं लागलीं असल्याचा त्यांच्या मित्रांस भास होऊं लागला आहे. उणींपुरीं तीस वर्षें ते नागपूर-वऱ्हाडच्या शैक्षणिक जगतांत वावरत आहेत. या कालांत त्यांनीं पदवीपूर्व व पदव्युत्तर आणि संशोधकीय असें दोन्ही-तिन्ही दर्जाचें अध्यापन अत्यंत विपुल प्रमाणांत व उच्च दर्जानें करून विद्यार्थ्यांच्या अनेक पिढ्या तयार केल्या. याच त्यांच्या अध्यापनानें या काळांत नागपूरचें त्यांचें हिस्लॉप कॉलेज हें तिकडील भागांत विद्यापीठीय मराठी अध्ययनाचें एक आकर्षक केंद्र बनून राहिलें आहे. परंतु याशिवाय दुय्यम शाळांतील व महाविद्यालयांतील मराठी विषयाच्या अभ्यासक्रमाची संघटना करण्याचेंहि मोठें कार्य तेथील मध्यप्रदेश हायस्कूल बोर्ड व नागपूर विद्यापीठ यांच्या द्वारां कित्येक वर्षें ते करीत आले आहेत. हायस्कूल बोर्डाच्या मराठी समितीचे १५ वर्षें आमंत्रक, विद्यापीठाच्या मराठी अभ्यासक्रममंडळाचे २८ वर्षें सदस्य व 12 वर्षें अध्यक्ष इत्यादि आपल्या विषयांतील अनेक उच्चोच्च पदें त्यांनीं आजवर भूषविलीं आहेत. या स्थानांवरून कार्य करतांना त्यांनीं सदैव अखिलमहाराष्ट्रीय दृष्टि ठेवून आपल्या कार्यांत अखिलमहाराष्ट्रीय गुणिजनांचा संग्रह व गोंवणूक केली आहे. अशा स्थितींत विद्यापीठांत कुलगुरु व राज्यशासनांत प्रधान मंत्री अशासारखे उच्चपदस्थ अधिकारी मराठीविषयक बाबतींत त्यांच्या सल्लामसलतीचें मोल विशेष मानीत असल्यास नवल तें काय ? मध्यप्रदेश—सरकारनें आपल्या शासन-साहित्य-परिषदेंत त्यांचा सभासद नेमून गौरव केला हेंहि क्रमप्राप्तच होय. तसेंच विदर्भ-साहित्य-संघानेंहि त्यांस आपले अध्यक्ष निवडून त्यांस गौरविलें आहे. अशा तऱ्हेनें तिकडील शैक्षणिक व साहित्यिक जीवनांत त्यांनीं आपल्या स्वतःच्या कर्तबगारीनें आपणांभोंवतीं मोठेंच वैभव निर्माण केलें व उपभोगिलें. परंतु त्याहि क्षेत्रांत अलीकडे त्यांनीं क्रमानें निवृत्तीचें धोरण आंखल्याचें दिसतें. हायस्कूल बोर्ड त्यांनीं मागेंच सोडलें व आतां विद्यापीठांतील आपलीं अधिकारपदें हळू हळू सहकाऱ्यांच्या हवालीं करून, त्यांच्या सदिच्छ सल्लागाराची भूमिकाच स्वतःकडे ठेवण्याचा त्यांचा अलीकडे स्पष्ट कल दिसतो. योग्य कालीं निवृत्त होण्याची बुद्धि होणारे व ती बुद्धि स्थिर राखूं इच्छिणारे व शकणारे ज्येष्ठ जन धन्य होत !

## हिस्लॉपचे एकाकी ख्रिस्तीतर प्राचार्य

त्यांच्या अध्यापकीय व शैक्षणिक जीवनांतील एका घटनेचा विशेष उल्लेख केला पाहिजे; व ती घटना म्हणजे त्यांचें हिस्लॉप कॉलेजांतील प्राचार्यपद. हिस्लॉप-कॉलेज हें ख्रिस्ती मिशनऱ्यांचें कॉलेज आहे; व तेथील कायमचें प्राचार्यपद ख्रिस्तीतरांस मिळणें हें अर्थात्च अपेक्षितहि नाहीं. तरी परंतु कॉलेजचे कायमचे ख्रिस्ती प्राचार्य डॉ. डेव्हिड मोझेस् हे वर्षावर्षाच्या रजेवर अमेरिकेस गेल्यानंतर त्यांच्या जागीं कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं दोन वेळां डॉ. शंकररावांचीच हंगामी प्राचार्य म्हणून नेमणूक केली ही गोष्ट जशी त्या अधिकाऱ्यांच्या गुणग्राहक विश्वासाची व सहिष्णु वृत्तीची द्योतक आहे, तशीच ती डॉ. शंकररावांच्या विश्वास उत्पन्न करणाऱ्या कर्तबगारीचीहि द्योतक आहे, यांत शंका नाहीं. शंकरराव ख्रिस्ती तर नव्हतेच, परंतु ते दुर्दम्य हिंदुत्वाभिमानी असूनहि त्यांनीं आपल्या कर्तबगारीनें कॉलेजच्या व्यवस्थापकांत एवढा विश्वास उत्पन्न केला कीं त्यांनीं एखाद्या समधर्मीयाची नेमणूक करण्याचा अट्टाहास न धरतां शंकररावांचीच त्यास पूर्णाधिकार देऊन नेमणूक केली ! कॉलेजचे हितसंबंध शंकररावांच्या हातांत सुरक्षित राहतील अशी खात्री वाटल्या शिवाय ही नेमणूक कशी झाली असती ? आणि ही खात्री मुद्दाम होऊन मागण्यांतहि आली नव्हती व देण्यांतहि आली नव्हती. शंकररावांचें हिस्लॉप कॉलेजमधील पंचवीस वर्षांचें जीवन हीच एक मूर्तिमंत खात्री











होती व तीमुळेंच ती त्यांची नेमणूक झाली यांत शंका नाहीं. आणि ही नेमणूक झाल्यानंतर शंकररावांनींहि जिवापाड उद्योग करून त्यांच्याकडे दिलेला प्राचार्यपदाचा न्यास उत्कृष्ट रीतीनें सांभाळला यांतहि शंका नाहीं. कॉलेजांत तर ते विद्यार्थ्यांचे अत्यंत आदरणीय प्राध्यापक आहेत. चार-पांच वर्षांपूर्वी मी त्यांच्या कॉलेजांत त्यांच्या मार्फतच आलेल्या डॉ. मोझेसच्या निमंत्रणावरून एका व्याख्यानासाठीं गेलों असतांना त्या कॉलेजच्या सर्व विद्यार्थ्यांच्या व प्राध्यापकांच्या सभेंत त्यांजविषयींचा मला जो आदर दिसला तो पाहून मला त्यांचेबद्दल फार धन्य वाटलें.

महाराष्ट्र-साहित्यपरिषदेशीं त्यांचा असलेला जुना व घनिष्ठ संबंध येथें थोडा उल्लेखिला पाहिजे. १९३१-३२ सालच्या सुमारास श्री. नानासाहेब चापेकर यांच्या नेतृत्वाखालीं श्री. गणपतराव जांभेकर, श्री. कृ. पां. कुलकर्णी इत्यादि मंडळींनीं परिषदेची कचेरी मुंबईहून पुण्यास आणण्याची जी घटना घडवून आणली त्यांत चापेकरांच्या भोंवतीं जी अनेक मंडळी गोळा झाली होती त्यांत शंकरराव (व प्रस्तुत लेखकहि) होते. तेव्हांपासून शंकरराव परिषदेच्या कार्यांशीं निकट संबद्ध राहिले आहेत. अनेक वर्षें ते नियामक-मंडळाचे सभासद होते. कांहीं काळ आम्ही दोघेहि कार्यकारी मंडळांत व थोडावेळ तर एकत्र चिटणिसहि होतों व त्या पदावरून कित्येक बऱ्यावाईट प्रसंगांस एकत्र तोंड देत होतों. त्यावेळच्या त्यांच्या कार्यांतहि अखिल-महाराष्ट्रीय दृष्टि व वृत्ति वारंवार दिसून येत असे. याच परिषदेच्या कार्यांतून पुढें बदलापूरचें 'चापेकर-मित्रमंडळ' अस्तित्वांत आलें व त्या मंडळाच्या वर्षांतून एकदोन बैठकी बदलापुरास नित्य भरूं लागल्या. या मंडळाचेहि शंकरराव हे एक अत्यंत उत्साही व मुखर सभासद असत. बदलापुरांतील चर्चा त्यावेळीं कित्येक वर्षें गाजल्या होत्या. त्यांत शंकररावांचा मोठाच भाग असे, व त्या सर्व चर्चांतून शंकररावांच्या भाषणांत 'स्वधर्म, स्वदेश व स्वभाषा' ह्या त्रयीचा जोरदार पुरस्कार व्हावयाचा हें ठरलेलें. त्यांनीं 'महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासा'वर एक वेगळें पुस्तक (-पहिली आवृत्ति १९३१. तिसरी आवृत्ति अलीकडे-) लिहिलें आहे ही गोष्ट अत्यंत सूचक आहे. तो विषय त्यांच्या मनाचा गाभा होय.

## कौटुंबिक जीवन

त्यांच्या खासगी कौटुंबिक जीवनाचाहि थोडा उल्लेख करण्यास हरकत नसावी. लहानपणीं त्यांना कौटुंबिक जीवन फारच अल्पकाळ व अल्पप्रमाणांत लाभलें. त्यांची वणवण लवकरच सुरूं झाली, व ती दीर्घकाळ टिकली. १९२५ सालच्या सुमारास या तेजस्वी व कर्तबगार, परंतु अकिंचन तरुणाला लोकमान्य टिळकांचे भाचे कै. धोंडोपंत विद्वांस यांनीं आपली कन्या दिली. तेव्हांपासूनच त्यांच्या जीवनांत खरा वैयक्तिक कौटुंबिक जीवनाचा जिव्हाळा उत्पन्न झाला. (कै. विद्वांसांचे थोरले चिरंजीव प्रा. म. धों. विद्वांस हे माझे निकटचे महाविद्यालयीन स्नेही असल्यानें माझा शंकररावांशीं परिचय व स्नेह त्या वेळेपासूनच सुरू झाला). लोकमान्य टिळकांची नात त्यांची पत्नी म्हणून त्यांच्या जीवनांत प्रवेश करती झाली या घटनेनें शंकररावांच्या मूळच्याच निष्ठावान् टिळकभक्तीला त्यांच्या जीवनस्फूर्तीचेंच स्वरूप प्राप्त करून दिलें यांत शंका नाहीं. आमच्या भगिनी सौ चंद्राताईनीं (-सासरच्या सौ. मालतीबाई-) शंकररावांचें जीवन सौख्य व समाधान यांनीं समृद्ध करून टाकलें आहे, ही गोष्ट त्यांचे सर्व निकटवर्ती स्नेही जाणतातच. तीच गोष्ट या प्रसंगानें जाहीर रीतीनें हि नमूद करण्यास हरकत दिसत नाहीं. शंकररावांच्या निरामय जीवनाचें व स्वस्थ वृत्तीनें त्यांनीं केलेल्या सारस्वतभक्तीचें फार मोठें श्रेय सौ. चंद्राताईंना आहे. आणि ही गोष्ट शंकरराव पूर्णपणें व कृतज्ञतेनें जाणून आहेत. आपल्या पत्नीचा 'जन्माची सोबतीण' असा गौरवानें ते उल्लेख करितात व त्यांचें एकमेकांशीं तसेंच नातें व वर्तन आहे हें त्यांच्या निकटच्या मित्रांच्या निरीक्षणांतून सुटत नाहीं. शंकररावांच्या फुरसतीच्या वेळीं शंकररावांस भेटावयास गेलेल्या त्यांच्या मित्राच्या दारांतून दिलेल्या हांकेस, शंकररावांची 'ओ' घराच्या अगदीं खोलांतून, मागच्या स्वयंपाकघरांतून यावयाची, हें ठरलेलें आहे असें जें त्यांचें वर्णन त्यांचे नागपूरचे निकटचे स्नेही डॉ. म. आ. मोघे (-हे शंकररावांस नेहमीं 'शास्त्रीबोवा' म्हणतात-) करतात त्यांत थट्टा असली तरी तें व्यंग्यार्थानें खरें आहे असें मला वाटतें. या दंपतीस दोनच अपत्यें व तेहि पुत्र. हे दोन्ही पुत्र








सुपुत्र या पदवीस अत्यंत योग्य असे आहेत. दोघेहि वडिलांप्रमाणेंच अत्यंत सुशील, बुद्धिमान् व कर्तबगार – आणि महाराष्ट्रप्रेमी. थोरले चिरंजीव श्री. बलवंतराव हे पदार्थविज्ञानाचे उच्चश्रेणीपदवीधर असून त्यांनीं रेल्वे बोर्डाच्या निवडीनंतर रेल्वेंतील कांहीं तांत्रिक विषयांत ( 'Power' ) अत्युच्च शिक्षण संपादन केलें आहे व रेल्वेंत ते आतां मोठ्या हुद्यावर असून हल्लीं इटलीमध्यें भारतीय रेल्वे इन्स्पेक्टोरेट खात्यांत काम करीत आहेत. धाकटे चिरंजीव श्री. केशवराव हे डेहराडून येथून लष्करी शिक्षणक्रम उत्कृष्ट रीतीनें पुरा करून व कमिशन मिळवून हल्लीं पुण्याच्या मिलिटरी एंजिनिअरिंग कॉलेजमध्यें पुढील उच्च शिक्षण घेत आहेत. पेंडसे–पति-पत्नींनीं आपल्या संसाराचें सर्वोच्च ध्येय म्हणजे या दोन एकाहून एक कर्तबगार पुत्रांस सुशिक्षणानें सुसज्ज करून राष्ट्रसंसारास अर्पण करणें हेंच ठेविलें होतें. व त्याच ध्येयाच्या सिद्धीसाठीं आपणांस उपलब्ध त्या सर्व धनादि साधनांचा त्यांनीं सदुपयोग केला. ते ध्येय त्यांच्या परिश्रमांनीं व सुदैवानें साकार होण्याचें भाग्य त्यांना लाभलें आहे. ही धन्यतेची गोष्ट होय. पेंडसे–दंपती हीं आदर्श पति-पत्नी व आदर्श माता-पितरें होत यांत बिलकूल अतिशयोक्ति नाहीं. आणि उत्तम संसार व उत्तम स्वधर्मसाधन करीत असतांना त्या उभयतांनीं विपुल स्नेहसंपादनहि केलें आहे. नागपुरांतील पेंडश्यांचें घर म्हणजे स्नेह्यांचे मीलनस्थान असें ठरलेलें आहे. आम्ही बाहेरची मित्रमंडळीहि अनेक प्रसंगांनीं त्यांजकडे नागपुरास जातों. त्यांचेकडे केव्हांहि जा — " या, महाराजा " असें म्हणत शंकररावांची मूर्ति स्वागतासाठीं दारांत हजर! आणि मग सौ. चंद्राताईंनीं 'जेवणांपूर्वी काय पाहिजे ?' असें विचारीत बाहेर यावें. प्रा. रामभाऊ जोग व मी विशेषतः गेल्या कांहीं वर्षांत नागपुरास युनिव्हर्सिटीच्या कामांसाठीं त्यांचे घरीं कितीतरी वेळां राहिलों आहों. त्या प्रत्येक वेळीं त्यांचें उत्फुल्ल आतिथ्य हा एक अविस्मरणीय अनुभव असत आला आहे. १९३३–३४ सालच्या सुमारास नागपूरच्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे वेळीं शंकरराव संमेलनाचे कार्याध्यक्ष होते. त्यावेळीं त्यांनीं बाहेरच्या पाहुणे-मंडळीस आपल्या घरीं भोजनास बोलावण्याच्या निमित्तानें आपल्या नागपूरच्या व बाहेरच्या स्नेह्यांचा एक मेळावाच भरविला! त्यावेळीं कै. कृ. प्र. ऊर्फ काकासाहेब खाडिलकर संमेलनाध्यक्ष होते. कै. बाबा विद्वांसहि आले होते. त्या वेळच्या आमच्या पंक्तींत सासरे-जांवई अतिथींचा समाचार घेत हिंडत होते तें दृश्यहि मला आज आठवत आहे! असो.

शेवटीं, आपल्या अडचणींच्या काळीं ज्यांनीं आपणांस ज्ञान दिलें, आपला परामर्श घेतला, साहाय्य केलें, उत्तेजन दिलें त्यांच्याबद्दलच्या शंकररावांच्या, त्यांनीं आपल्या उत्कर्षाच्या व वैभवाच्या काळींहि जतन करून ठेवलेल्या मृदु कृतज्ञताभावनेचाहि उल्लेख केल्यावांचून राहवत नाहीं. ते पुण्यांत येतात किंवा इतरत्र कोठें जातात. तेव्हां अशा जुन्या ऋणानुबंधांचें त्यांना स्मरण होतें व ते त्या त्या व्यक्तींस जाऊन भेटतात व जुन्या स्मृतींना कृतज्ञतापूर्वक उजळा देतात व अंजलि वाहतात. गेल्याच वर्षी ते पुण्यास आले होते त्या वेळीं त्यांनीं मुद्दाम एक दिवस तळेगांवास जाऊन तेथें वृद्धावस्थेंतील दिवस कंठीत असलेल्या आपल्या पूज्य गुरूंची – विद्वद्वर्य शिंत्रे-शास्त्रींची – भेट घेऊन त्यांची पूजा केली!

आगामी संमेलनांतील त्यांचें कर्तृत्व त्यांच्या आजवरच्या कर्तबगारीस व कीर्तीस साजेसेंच ठरेल यांत कसलाहि संशय नाहीं. त्यांच्या भाषणांत काय काय विषय येतील त्यासंबंधीं तर्कवितर्क न करतां त्यांत मुंबईसह संयुक्त महाराष्ट्राचा अत्यंत जोरदार पुरस्कार असेलच असेल हें भविष्य वर्तविण्यास कांहींच हरकत नाहीं. कारण महाराष्ट्राच्या वैभवाचें स्वप्नरंजन हें स्फुटास्फुट रीतीनें त्यांचें जीवनसूत्रच आहे. किंबहुना, ही गोष्ट त्यांच्या या वेळच्या संमेलनाध्यक्षत्वाचें निर्विवाद औचित्य सिद्ध करणारीच आहे यांत शंका नाहीं. आणि संमेलनानंतर ते पदतः महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचेहि अध्यक्ष होतील. त्या त्यांच्या कारकीर्दींत त्यांनींच आग्रहपूर्वक व यशस्वी रीतीनें पुरस्कारलेली मराठी भाषा व साहित्य यांच्या विशाल इतिहासाची योजनाहि त्यांचे हातून भरघोंस रीतीनें मार्गास लागो एवढीच इच्छा व प्रार्थना करितों.

---










श्री. नारायण य. डोळे

# पंचशील: पांच नीतिनियम

भारतानें उद्घोषिलेल्या **पंचशीलांना** जागतिक राजकारणांत मान्यता मिळूं लागली आहे. चीन, इंडोनेशिया, रशिया, बर्मा, युगोस्लाव्हिया, सौदी अरेबिया आणि इतर अनेक राष्ट्रांनीं ' **पंचशीलां** 'ना आपला पाठिंबा असल्याचें जाहीर केलें आहे. इतकें असूनहि पंचशील म्हणजे नक्की काय, पंचशील या शब्दाची उत्पत्ति कशी झाली याबद्दल सामान्य लोकांना फारशी माहिती नाहीं.

इंग्रजी वृत्तपत्रांनीं या शब्दाचें स्पेलिंग ' पंचशिला ' ( Panchashila ) असें केलें आहे. बरींचशीं मराठी वृत्तपत्रें इंग्रजी वृत्तपत्रांचें अनुकरण करणारीं असल्यानें त्यांनीं मराठींत पंचशिला असेंच लिहिण्यास सुरुवात केली. त्यामुळें पंचशिला म्हणजे शांततेकडे नेणाऱ्या पांच पायऱ्या किंवा पांच दगड ( शिला = मोठा दगड ) असा गैरसमज होण्यास मदत झाली. वास्तविक **पंचशील** ( Pancha-Sheel ) याचा अर्थ पांच नीतिनियम ( शील = नीति; वागणूक) किंवा वर्तणुकीसंबंधीं पांच नियम असा आहे. शील याचा अर्थ चांगली वर्तणूक. पंचशील हें आंतरराष्ट्रीय राजकारणासंबंधी तत्त्व असल्यानें राष्ट्राराष्ट्रांनीं आपापसांत कसें वागावें हें सांगणारीं पांच तत्त्वें किंवा पांच नीतिनियम ' हा ' **पंचशील** ' या शब्दाचा अर्थ आहे.

आंतरराष्ट्रीय राजकारणांत **पंचशील** हें सर्वांत नवीन तत्त्व आहे. आजपर्यंत अनेक तत्त्वांनीं जागतिक राजकारणांत फार महत्त्वाचें स्थान भूषविलें आहे. गेल्या शतकांत अमेरिकेनें 'मन्रो डॉक्टरिन'-ची घोषणा केली. दक्षिण अमेरिकेच्या किंबहुना सबंध अमेरिका-खंडाच्या राजकारणांत अमेरिकेशिवाय बाकी कोणत्याहि राष्ट्रानें हस्तक्षेप वा ढवळाढवळ करतां कामा नये असें हें तत्त्व होतें. अमेरिकेच्या वाढत्या शक्तीमुळें या तत्त्वाचा अद्यापहि पाठपुरावा करतांना अमेरिकेचे राज्यकर्ते आपणाला दिसतात. ( उदा. ग्वाटेमाला, ब्रिटिश गियाना इत्यादि. ) दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं हिट्लरनें आपलें वंशश्रेष्ठत्वाचें तत्त्व मांडलें. जर्मन वंश हा जगज्जेत्यांचा वंश आहे, म्हणून सर्व जगावर अधिराज्य करण्याचा जर्मनीला जन्मसिद्ध हक्क आहे अशी त्याची घोषणा होती. जपान्यांनीं सुद्धां ' आशियाई लोकांसाठीं ( म्हणजे जपान्यांसाठीं ) आशिया ' अशी घोषणा केली होती, जागतिक राजकारणासंबंधी कम्युनिस्टांचाहि एक सिद्धान्त आहे. भांडवलशाही राष्ट्रांनीं वेढिलेलें एकादें कम्युनिस्ट राष्ट्र सुखासमाधानानें जगूं शकत नाहीं, अतएव आजूबाजूचीं राष्ट्रेंहि कम्युनिस्ट झालीं पाहिजेत हा त्यांचा सिद्धान्त. कॉमिन्टर्न वा कॉमिन्फॉर्म यासाठींच. आज मार्ग बदलल्याचीं चिन्हें दिसत असलीं तरी त्यांचा मूळ सिद्धान्त मात्र कायम आहे.

**पंतप्रधान नेहरू** गेलीं नऊ वर्षें परराष्ट्रीय खात्याचे मंत्री आहेत. त्यांच्या नेतृत्वाखालीं जागतिक शांतता व स्वास्थ्य यांसाठीं भारत प्रयत्न करीत आहे. श्री. नेहरूंच्या परराष्ट्रीय धोरणाचें पहिलें व महत्त्वाचें असें सैद्धान्तिक रूप ( ideological formulation ) म्हणजेच **पंचशील**. जागतिक शांतता आज प्रत्येक राष्ट्राला हवी आहे पण प्रत्येकाचे मार्ग भिन्न आहेत. भारतानें आंतरराष्ट्रीय राजकारणासाठीं पंचशील हा नवा मार्ग सादर केला आहे. या मार्गानें गेल्यास जागतिक शांतता प्रस्थापित होईल असा भारताचा विश्वास आहे. ' जगा आणि जगूं द्या ' हा पंचशीलचा पाया.

आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत पंचशील अगदीं नवीन असलें तरी इतर क्षेत्रांत त्याला किमान २५००



अनुक्रमणिका





वर्षांचा इतिहास आहे. गौतम जेव्हां बुद्ध झाला तेव्हां तो धर्मप्रसारार्थ बाहेर पडला. त्या वेळीं त्यानें पंचशीलांची पहिली घोषणा केली. जन्ममृत्यूच्या फेऱ्यापासून मुक्ति मिळविण्यासाठीं प्रत्येक माणसानें कांहीं नीतिनियमांचें पालन केलें पाहिजे असें त्याचें सांगणें होतें. खालील पांच नीतिनियम त्यानें सांगितलें:— (१) अहिंसा पाळावी. (२) चोरी करूं नये. (३) साधी राहणी व पवित्र आचरण ठेवावें. (४) खोटें बोलूं नये. (५) दारू किंवा तत्सम द्रव्य घेऊं नये. —हीं बुद्धाचीं पंचशीलें. याशिवाय आणखी पांच नीतिनियम त्यानें सांगितले : (६) ठराविक वेळेशिवाय आहार वर्ज्य करावा. (७) नाच, गाणीं, नाटकें यांत भाग घेऊं नये, तीं पाहूं नयेत. (८) फुलें, सुवास व दागिने इत्यादि चैनीच्या वस्तूंपासून अलिप्त राहावें. (९) शय्येसाठीं उच्चासन वापरूं नये. (१०) सोन्याचांदीपासून दूर रहावें.

बुद्धाचीं हीं दशशीलें म्हणजे बुद्धाची 'टेन कमांड्मेंट्स्च' ! या नीतिनियमांचें पालन करणारा माणूस निश्चित निर्वाण मिळवील असें त्यानें सांगितलें. हीं दशशीलें सबंध आशिया-खंडांत दाही दिशांना पसरलीं. इंडोनेशिया म्हणजे तर बृहत् हिंदुस्थान किंवा बेटांचा हिंदुस्थान. [Indo=India; nesos=islands. (Greek word.) Indonesia=India of the islands or extension of India] त्यांत या दोन पंचशीलांना विशेष महत्त्वपूर्ण स्थान मिळालें.

दुसऱ्या महायुद्धाच्या सुरुवातीला इंडोनेशियावर डचांचें साम्राज्य होतें. जपान्यांनीं इंडोनेशियावर चढाई करतांच डच आपला जीव वांचवून पळून गेले. कांहीं वर्षें इंडोनेशिया जपानच्या आधिपत्याखालीं होता. इंडोनेशियन राष्ट्रवाद्यांनीं गनिमी काव्यानें व अमेरिकन फौजांच्या मदतीनें जपान्यांना घालवून दिलें. जपानी गेल्याबरोबर डच आपला हक्क सांगण्यास पुढें आले. इंडोनेशियन जनता डॉ. सोकार्नो यांच्या नेतृत्वाखालीं डचांशीं स्वातंत्र्ययुद्ध लढण्यास सज्ज झाली. १ जून १९४५ रोजीं स्वातंत्र्ययुद्धाचें रणशिंग फुंकतांना डॉ. सोकार्नो यांनीं एक ऐतिहासिक भाषण केलें. या भाषणांत त्यांनीं पंचशीलची घोषणा केली. पंचशील हा शब्दप्रयोग [Panchjt-Sila-(Indonesian)] आधुनिक राजकारणांत प्रथम त्यांनींच केला. दहा वर्षांनंतर आपण योजलेल्या या शब्दप्रयोगाला इतकें महत्त्व मिळेल अशी त्यांना त्यावेळीं कल्पनाहि नसेल. त्यांनीं घोषिलेलीं पंचशीलें अशीं : (१) राष्ट्रवाद, (२) मानवता, (३) स्वातंत्र्य, (४) सामाजिक न्याय, (५) परमेश्वर यांच्यावर श्रद्धा ठेवून स्वातंत्र्य मिळविणें. राष्ट्रीय दृष्ट्या त्यांनीं उद्घोषिलेलीं पंचशीलें योग्य अशींच आहेत.

पांच या संख्येला अतिशय महत्त्वाचें स्थान आहे असें आपणांस आढळून येईल. पांडव पांच, आदर्श पतिव्रता पांच, हातांपायांची बोटें पांच किंवा five elements of physical world. मुसलमान धर्माप्रमाणें हातपाय धुणें, नमाज पढणें, उपास करणें, दान देणें व मक्केची यात्रा करणें हीं पंचशीलें. पांच या संख्येच्या अशा अनेक गोष्टीं सांगता येतील.

आंतरराष्ट्रीय क्षेत्रांतील पंचशीलांची घोषणा जून १९५४ मध्यें झाली. चीनचे पंतप्रधान चाऊ अेन् लाय् व श्री. नेहरू यांची दिल्लींत भेट होऊन तिबेट व अन्य प्रश्नांवर चर्चा झाली. यानंतर जें संयुक्त पत्रक निघालें त्या पत्रकांत श्री. नेहरूंनीं प्रथमच 'पंचशील'चा उपयोग केला. तेव्हांपासून जवळजवळ तीस राष्ट्रांनीं **पंचशील** मान्य केलें आहे.

जागतिक शांतता ज्यांना प्रामाणिकपणें हवी आहे, ज्यांना युद्ध अजिबात होऊं द्यावयाचें नाहीं अशा राष्ट्रांनीं आपापसांत वागतांना खालील नीतिनियमांचा अवलंब करावा. हे पांच नीतिनियम म्हणजेच पंचशील :

(१) परस्परांच्या प्रादेशिक एकात्मतेचा व सार्वभौमत्वाचा परस्परांनीं मान ठेवावा.

(२) एकमेकांवर आक्रमण करूं नये.










(३) एकमेकांच्या अंतर्गत घडामोडींत ढवळा-ढवळ करूं नये.

(४) परस्परांची समानता व हित सांभाळावें.

(५) शांततायुक्त सहजीवन उपभोगावें.

पांचवें शील किंवा पांचवा नियम सर्वांत महत्त्वाचा आहे. शांततायुक्त सहजीवनावर ज्यांचा विश्वास असेल त्यांनाच पंचशीलांचा उपयोग होईल. तो पंचशीलांचा पाया आहे. लष्करी सामर्थ्यानें आपण शांतता प्रस्थापित करूं असा ज्यांचा विश्वास आहे त्यांचा पंचशीलांवर विश्वास बसणें कठिण आहे. पंचशील हें सद्भावनेला आवाहन आहे. सुदैवानें पंचशीलांचें स्वागत करणारीं राष्ट्रें दिवसेंदिवस वाढतच आहेत. अर्थात् आपण हें मान्य केलें पाहिजे कीं ज्या अनेक राष्ट्रांनीं **पंचशीलवर** सह्या केल्या आहेत तीं सर्व राष्ट्रें अगदीं पूर्णपणें शांततावादी आहेतच असें नाहीं. कदाचित् आज पंचशील मान्य करणें हा त्यांच्या दूरच्या परराष्ट्रीय धोरणांतील एक डावपेंच असेल. पंचशील ही फक्त सुरुवात आहे. पंचशीलवर सर्व राष्ट्रांनीं सह्या केल्या म्हणजे युद्धाचा धोका पूर्णपणें संपला असेंहि नाहीं. पण पंचशील हा शांततेच्या दृष्टीनें चाललेला एक चांगला प्रयोग आहे हें मात्र निश्चित. कोणतेहि आंतरराष्ट्रीय करार वेळ येतांच फाडले जातात म्हणून कोणतेंहि राष्ट्र आंतरराष्ट्रीय करार करण्याचें थांबत नाहीं. पंचशील सर्वांनीं मान्य केल्यावर किंवा बऱ्याच राष्ट्रांनीं त्याला संमति दिल्यानंतर शांततेला पोषक असें वातावरण उत्पन्न होईल.

दुसरी एक अडचण अशी कीं पंचशीलमधील 'शांततायुक्त सहजीवन' किंवा 'आक्रमण' किंवा 'अन्तर्गत घडामोड' या शब्दांच्या आंतरराष्ट्रीय कायद्यांत व्याख्या झालेल्या नाहींत. त्यामुळें एका राष्ट्राला जो प्रश्न वसाहतवाद वाटतो तोच प्रश्न दुसऱ्या राष्ट्राला अन्तर्गत वाटतो. याहि बाबतींत पंचशील-घोषणेला स्पष्टता यावी लागेल. आज एवढेंच आपल्या पदरांत पडलें आहे कीं जीं राष्ट्रें कालपरवापर्यंत सहजीवन अशक्य असें म्हणत होतीं तीं आज जाहीरपणें शांततायुक्त सहजीवन मान्य करूं लागलीं आहेत.

पंचशील हा अखेरचा शब्द नाहीं, ती एक सुरुवात आहे किंवा शांतता चिरस्थायी व्हावी यासाठीं पोषक वातावरण निर्माण करणें एवढीच पंचशीलची मर्यादित अपेक्षा आहे असें ध्यानीं घेतलें म्हणजे पंचशीलांबद्दल होणारे बरेचसे गैरसमज दूर होतील. पंचशील हा भारताच्या परराष्ट्रीय धोरणाचा विजय आहे असें म्हणण्यापेक्षां जागतिक शांतता टिकविण्याचा संभव अधिक वाढल्याचें तें एक लक्षण आहे असें म्हणणें अधिक सयुक्तिक ठरेल.

वैयक्तिक जीवनांत **बुद्ध-पंचशील**, राष्ट्रीय जीवनांत **सोकार्नो–पंचशील** व आंतरराष्ट्रीय राजकारणांत **नेहरू-पंचशील** या तिहींनाहि आपापल्या क्षेत्रांत फार महत्त्वाचें स्थान आहे.

## पंचशील व रशिया

रशियन नेत्यांच्या भारतीय दौऱ्याच्या अखेरीस, भारत–रशियांच्या नेत्यांचें एक संयुक्त पत्रक १३।१२।५५ ला निघालें. त्या पत्रकावर लिहिलेल्या अग्रलेखांत मुंबईच्या 'लोकमान्या'नें (१५।१२।५५) म्हटलें आहे : "पंचशीलचा जो सन्मानपूर्वक आणि संमतिपूर्वक उल्लेख या पत्रकांत आहे तो मात्र निवळ औपचारिक इतकेंच नव्हे तर निरर्थक ठरूं लागणार अशी भीति वाटते. कारण परराष्ट्रांत हस्तक्षेप न करणें, परराष्ट्रांवर सत्ता न गाजविणें इत्यादि जीं महत्त्वाचीं शीलें पंचशीलमध्यें ग्रथित आहेत ती स्वतः रशिया निदान पूर्वयुरोपांतील कम्युनिस्ट राष्ट्रांच्या बाबतींत तरी मुळीच पाळत नाहीं. सदर संयुक्त पत्रकांत शस्त्रास्त्रसाहाय्याच्या आंतरराष्ट्रीय करारांचाहि निषेध करण्यांत आला असून तोहि रशियाचे बाबतींत तरी वस्तुस्थितीस अगदींच सोडून आहे. कारण लालचीन व रशिया यांचा शस्त्रास्त्रसाहाय्याचा करार झालेला असून पूर्व युरोपीय कम्युनिस्ट राष्ट्रें व रशिया यांचीं युद्धदळें कोणत्याहि क्षणीं एकनेतृत्वाखालीं येऊं शकतील इतकी दृढ व्यवस्था करून ठेवण्यांत आली आहे. कदाचित् रशियाचा यांत दोष नाहीं असें कोणी म्हणून शकेल. नाटोसंघटना ही रशियाविरोधी आहे असें रशियानें मानल्यास त्यांत कांहीं चूक नाहीं. पण रशियानें आंतरराष्ट्रीय शस्त्रास्त्रसाहाय्याचे करार केले आहेत ही गोष्ट दुर्लक्षिण्यांत अर्थ नाहीं."



अनुक्रमणिका







श्री. ख्वाजा अहंमद अब्बास. अनुवादक : प्रा. वि. ग. जोशी

# "....आणि याला म्हणतात प्रेम!"

: १ :

टाळी नेहमींच दोन हातांनीं वाजते. त्याचप्रमाणें प्रेम आणि प्रेम करणेसाठीं एक प्रियकर आणि एक प्रेयसीची आवश्यकता असते. प्रेयसी सुंदर असणें जरूर असते आणि प्रियकर कवि असावयास पाहिजे...

म्हणूनच प्रेमकथा लिहिण्यापूर्वीं मी माझ्या नायकाची आणि नायिकेची निर्मिति केली. नायिकेचें डौलदार शरीर जगांतल्या सर्वांत नाजुक मातीनें बनविलें. तिच्या डोळयांना बंगालची मोहकता दिली, रंग काश्मीरपासून घेतला आणि अंगाचा ताठरपणा महाराष्ट्रापासून घेतला. तिला पंजाबचें आरोग्य देऊन टाकलें, आणि तिच्या देहाला मुंबईच्या कोळणीसारखा लुसलुशीतपणा दिला. केंस कुरळे बनविले, भिवया कमानदार केल्या, ओठावर मधुरता ओतली आणि गालावर एक मनमोहक तीळ ठेवून दिला. डोळयांत मस्ती, छातीवर तारुण्याची उभारी आणि चालीमध्यें अल्लडपणा — आणि या पूर्ण सौंदर्याला आशा असें काव्यमय नांव देऊन साहित्यिक रचनेच्या चमत्कारानें आपल्या नायिकेला जीवन दिलें आणि तिला लैला-मजनूं, रोमिओ-ज्यूलिएट, हीर-रांझा, सोहनी-महिवाल, आणि देवदास-पार्वती यांचीं प्रेमकाव्यें ऐकविलीं.

आशेच्या प्रियकराचें काम करण्यासाठीं मी एका तरुणाची — निर्मलकुमाराची निर्मिति केली. त्याच्या शरीराला स्वास्थ्य आणि आरोग्य दिलें. एखाद्या सुंदरीला उचलण्यासाठीं आणि आपल्या भरदार छातीजवळ घेण्यासाठीं त्याच्या हातांना शक्ति दिली. त्या छातीमध्यें एक धडधडणारें हृदय ठेवून दिलें आणि त्याच्या डोक्यांत आशेची आणि मनोरथांची गर्दी उडवून दिली. त्याच्या हातांत एक बांसरी दिली आणि बांसरीला संगीतानें भारून टाकलें.

आशा आणि निर्मल.

निर्मल आणि आशा.

जगांतल्या प्रेम करणाऱ्या ऐतिहासिक जोड्यांमध्यें ही एक माझ्या कल्पनेची प्रसूति होती. या प्रेम करणाऱ्या दोन हृदयांतील प्रत्येक हालचाल मी आपल्या शब्दांत गुंफून त्यांच्या कथेला अमर करून टाकण्याचें ठरविलें.

पौर्णिमेच्या रात्रीं मी त्यांची पहिलीवहिली भेट घडवून आणली. पौर्णिमेची रात्र — त्या वेळीं चांदणें संवेदनशील मनांत झोंपलेल्या प्रेमाला गुदगुल्या करून जाग आणते, तारुण्याच्या मुखावर प्रकाशाची पावडर लावते, सुंदरतेला अधिकच सुंदर बनविते आणि प्रेमाला वेडें आणि मस्त बनविते. त्या वेळीं हवेंत कविता मिसळलेली असते, जीवनांतील कटु सत्यावर चांदण्याची पातळ चादर अंथरली जाते आणि प्रत्येक दिशेकडून प्रेमाचीं गाणीं ऐकावयास येऊं लागतात.

आणि जेव्हां त्या रात्रीं माझ्या निर्मलच्या बांसरीचा स्वर हवेंत पसरला आणि आशा त्यांतील जादूनें भारलेल्या, न दिसणाऱ्या तारांनीं ओढली जाऊन आपल्या घरांतून बाहेर पडली तेव्हां माझ्या कलेचा क्रियात्मक उद्देश पूर्ण झाला असें मला वाटलें. वाटलें कीं, आतां ही कथा ते दोघेजण स्वतःच लिहितील. आतां आशा निर्मलला विचारील — "तुमची बांसरी कुणाला बोलाविते आहे ?" आणि निर्मल म्हणेल — 'तुलाच, सुंदरी ! दुसऱ्या कुणाला ?' आणि या परिचयानंतर मग प्रेमाचे करार होतील, एकमेक शपथा घेतील, जीवनभर प्रेम करण्याची शपथ घेतील आणि पौर्णिमेची रात्र संपत जाईल आणि या दोघांची अमर प्रीति तरुण होईल......

परंतु आशानें विचारलें —, 'अरे ए, उगीच अपरात्रीं कां वाजवीत बसला आहेस ? झोंप घेऊं देणार आहेस का रात्रभर अशीच बांसरी वाजवीत बसणार आहेस ?'

आणि निर्मलनें उत्तर दिलें — 'चल जा ! मोठी

मूळ हिंदींतील या कथेचे लेखक श्री. ख्वाजा अ॰ अब्बास यांनीं प्रस्तुत मराठी अनुवाद प्रसिद्ध करण्यास परवानगी दिली आहे त्याबद्दल आभार.








महाराणीच लागून गेलीस कीं नाहीं ! प्रॅक्टिस करतोय, माहिती आहे ! '

' प्रॅक्टिस ? ' आशानें इंग्रजीची थट्टा उडवीत म्हटलें– ' ही काय भानगड आहे रे ? '

' अग, अभ्यास करतोय, बांसरी वाजवायचा ! नाहींतर मग बॅंडमध्यें काम कसें मिळेल ? '

बॅंडचें नांव ऐकल्यावर आशेची उत्सुकता वाढली; ' तुम्ही बॅंड वाजवतां ? खरं ? '

' बॅंड नाहीं वाजवत. बॅंडमध्यें बांसरी वाजवतो. '

' कां ? '

' कां म्हणजे ? पैसे मिळतात. दररोज सव्वा रुपाया.'

' ढोल कां नाहीं वाजवीत ? '

' ढोल वाजविणाऱ्याला दररोज दोन रुपये मिळतात म्हणून बॅंडमास्तरचा मेहुणा ढोल वाजवतो. '

मला राग येत होता.– ही चांदणी रात्र फुकट निघून चालली आहे आणि हे लोक प्रेमाच्या गोष्टी बोलायच्या ऐवजीं पैशांचे हिशोब करीत बसले आहेत. संगीताच्या जादूनें रोमॅंटिक वातावरण निर्माण करण्यासाठीं मी पुन्हां एकदां निर्मलच्या ओठाला बांसरी लावली आणि एक नवीन सिनेमांतलें गाणें हवेंत तरंगलें.

आशा म्हणाली– ' मला ही बांसरीची री-री अगदीं आवडत नाहीं. '

' मग तुला वाद्य आवडतें तरी कोणतें ? हार्मोनियम ? '

' ऊं हूं ! '

' मग काय, सारंगी ? ... सतार ? '

' ऊं हूं ! मला आपला ग्रामोफोनच आवडतो. आमच्या शेजारच्या फौजदारांच्या घरीं आहे ना तसा. रेकॉर्ड वाजविण्याची इच्छा झाली कीं लगेच रेकॉर्ड वाजवितां येते.'

' हा नवीन फौजदार कसा काय आहे ? '

' चांगला आहे बिचारा. जेव्हां मागेल तेव्हां आम्हांला ग्रामोफोन वाजवायला देतो. त्याच्यापाशीं रेडिओसुद्धां आहे.'

' पण फौजदाराजवळ एवढे रुपये कुठून आले ? पगार तर शेंसव्वाशेंच मिळत असणार ! '

' पण ईश्वर वरची मिळकत देतोच कीं ! तुझ्या बॅंडमध्यें वरची मिळकत नसते वाटतं ? '

" असते. एखादे वेळीं लग्नाला गेलों तर मग कधीं-कधीं प्रत्येकाला चवली-पावली बक्षिसी मिळते ... तुझं लग्न झालंय ? "

' ......... ' आशानें उत्तर दिलें नाहीं. तिनें लाजून मान खालीं वळविली. पण तिच्यावर चांदण्याची जादू परिणाम करीत होती आणि कां कुणास ठाऊक तिचें हृदय उगीचच धडधडत होतें.

' नाहीं ? तर मग ठीक आहे ! '

आशानें मान वर करून रागानें निर्मलच्या नजरेला नजर भिडवीत म्हटलें – 'कां ? ठीक काय आहे त्यांत ?'

आणि माझ्या मनांत विचार आला – आतां आपलें प्रेम व्यक्त करण्याला निर्मलला ही चांगली संधि मिळाली आहे.

परंतु त्यानें उत्तर दिलें– ' जेव्हां तुझें लग्न होईल तेव्हां वरातीला आमचा बॅंड असणार, तेव्हां मग तुझा नवरा मला बक्षिसी देईल. याच्यापेक्षां आणखी चांगली गोष्ट ती काय असणार ? '

' इश्श, चावट कुठले ! ' आशानें म्हटलें आणि ती पळतच घरीं गेली.

जेव्हां निर्मलनें आपल्या मित्रांपाशीं आशेसंबंधीं बोलायला सुरुवात केली तेव्हां ते म्हणाले – ' अरे, डोकं फिरलय काय तुझं ? त्या पोरीचा बाप कधीं पाहिला आहेस कां ? तांदळाच्या काळ्या बाजारांत हजारों रुपये मिळवतोय. तो एखाद्या बॅंडवाल्याशीं आशेचें लग्न लावील होय ? '

' शिवाय जातीचा प्रश्न आहेच ! तूं रजपूत आणि तो आहे बनिया – आणि त्यांत पुन्हां जैन ! '

' आणि खरं म्हणजे त्या म्हाताऱ्यानें पोरीचें लग्न केव्हांच ठरवून टाकलें आहे. पुढल्या महिन्यांत लग्न होणार असल्याचें माझ्या कानांवर आलें आहे ! '

' कुणाबरोबर ? '

' हा नवीन फौजदार आला आहे ना, त्याच्याबरोबर. '

' पण तो तर विधुर आहे आणि केंसांना कलप लावीत असतो ! '

' मग त्याला काय झालें ! फौजदार आहे ना ! '

निर्मलनें एक उसासा टाकला आणि बांसरी ओठावर ठेवून ' जिया बेकरार है, आयी बहार है ' हें गाणें तो वाजवूं लागला. मला वाटलें-चला, ठीक आहे. लैला-मजनूं आणि हीर-रांझाप्रमाणें माझ्या








या प्रेमकथेचा शेवट दुःखांतच होणार !

पुढल्या महिन्यांत आपल्या केसांना आणि मिशाला कलप लावून फौजदार नवरदेव बनला आणि घोड्यावर बसून वरात घेऊन आला त्यावेळीं वरातीपुढें बँड ' चल चल रे नौजवान ' गाणें वाजवीत होता आणि निर्मल नेहमींप्रमाणेंच बांसरी वाजविण्यांत रंगून गेला होता. त्याच्या चेहऱ्यावर निराशेचे ढग पसरले होते आणि तो आपल्याच विचारांत इतका गढून गेला होता कीं ' चल चल रे नौजवान ' च्या ऐवजीं त्याच्या बांसरीतून ' आंधिया गम की यूं चली, बाग उजडके रह गया' या गाण्याचे स्वर बाहेर पडूं लागले. जेव्हां झांज वाजविणाऱ्यानें त्याला डिवचलें आणि विचारलें – ' अरे, निर्मल, काय झालंय काय तुला आज ? ' तेव्हां तो म्हणाला – ' मला फार काळजी लागलीय् रे. आई आजारी आहे आणि डॉक्टरांनीं महाग औषध आणायला सांगितलें आहे. औषध पावणेदोन रुपयाला मिळते आणि संध्याकाळीं मिळणार फक्त सव्वा रुपाया. बाकीचे आठ आणे कुठून मिळणार याचाच विचार करीत होतों. '

पण मला विश्वास वाटत होता कीं केवळ टाळण्यासाठींच ही गोष्ट तो बोलत होता. खरं म्हणजे त्याचें हृदय आशेच्या लग्नामुळें भग्न झालें असणार. आणि जेव्हां बँडमास्तरनें पद बदललें तेव्हां मला वाटलें, 'वाहवा, काय क्लास ट्रॅजेडी आहे. प्रियेची वरात चालली आहे आणि प्रियकर त्या वरातींत ' झूम-झूमके नाचो आज, गाओ खुशीके गीत' बांसरीवर वाजवीत आहे.'

सप्तपदीच्या वेळीं आशा जेव्हां लाल रेशमी साडी नेसून खूप दागिने घालून मंडपांत होमाजवळ बसली तेव्हां मला वाटत होतें कीं निर्मलच्या विफल प्रेमाच्या आठवणीनें ती रडत असेल. कदाचित् कुणास ठाऊक, विषहि खाणार असेल ! पदर घेतल्यामुळें चेहरा तर नीट दिसत नव्हता खरा, परंतु तिच्या मेंदी लावलेल्या पायांवर जेव्हां कांहीं थेंब पडलेले दिसले, तेव्हां हे भग्न झालेल्या हृदयाचे तुकडे आहेत आणि ते आंसवांच्या रूपानें पडत आहेत याशिवाय दुसरें काय वाटणार ? परंतु तिच्या एका मैत्रिणीनें थट्टा करतांना तिच्या चेहऱ्यांवरचा पदर वर उचलला तेव्हां समजलें कीं कपडे आणि दागिन्यांच्या उबेनेंच आशेला फार घाम आला होता. आणि तिच्या कपाळावरून आणि गालावरून ओघळणारे ते घामाचे थेंब होते. आणि तेव्हां तिनें आपल्या मैत्रिणीच्या कानांत सांगितलें–' अग माझी ही अंगठी खऱ्या हिऱ्याची आहे, खऱ्या हिऱ्याची ! ' तेव्हां तर अगदीं कळसच झाला !

माझ्या मनांत विचार आला, स्त्रिया तर नेहमींच कृतघ्न असतात. या आशेकडेच पहा ना. तिकडे तो बिचारा निर्मल आपल्या भग्न हृदयाला सांवरण्याचा प्रयत्न करीत रडत बसला आहे आणि इकडे हिऱ्याची अंगठी मिळाली म्हणून हिचा आनंद गगनांत मावेनासा झाला आहे आणि केवळ कांहीं रुपये घेऊन त्या म्हाताऱ्या कुरूप माणसाला तिला विकण्यांत आलें आहे याचीहि तिला जाणीव नाहीं.

नंतर बाहेर जाऊन पाहिलें तर जे लाडू आशा आणि फौजदारांच्या लग्नानिमित्तच वांटण्यांत आले होते आणि ज्या लाडूच्या गोडींत निर्मलच्या प्रेमासाठीं विष भरलेलें होतें तेच लाडू दुसऱ्या बँडवाल्यांबरोबर निर्मलहि आरामांत खात बसला होता. तेव्हां मात्र माझ्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं ! एवढेंच नाहीं तर तो आणखी वर सांगत होता–' अरे वा, लाडू किती चांगले आहेत, वा, वा. ' मग मला वाटलें हें विषानें भरलेलें हास्य असणार–' हृदय रडतें आहे, पण ओठावर मात्र हास्य आहे. यासारखीच क्लासिक, दुःखमय कथा होणार आहे. पण पुढल्याच क्षणीं फौजदार सगळया जंजाळांतून बाहेर पडून आपल्या कलप लावलेल्या मिशांवर ताव देत बाहेर पडला आणि बँडवाल्यांना आठ आठ आणे इनाम देवूं लागला. जेव्हां निर्मलची पाळी आली तेव्हां मला खात्री वाटत होती कीं तो आपल्या प्रेमाचा खून करणाऱ्या त्या हातांकडून कधींच भीक स्वीकारणार नाहीं. कदाचित् ते पैसे त्याच्या तोंडांवर फेकून देईल. किंवा कडक शब्दांत ते पैसे तो परत करील : 'आपण जगांतली एवढी मोठी संपत्ति घेऊन निघाला आहांत, तर मग आठ आणेहि आपल्याजवळ ठेवा. ' परंतु एक सेकंद थोडीशी कुरकुर करीत निर्मलनें फौजदारानें दिलेले आठ आणे घेतले आणि सलाम करीत म्हटलें– ' ईश्वर, आपलें भलें करो, फौजदारसाहेब ! ' आणि जेव्हां तो तेथून जायला निघाला तेव्हां आपल्या मित्राला म्हणाला– ' चला, आतां आईसाठीं बाजारांतून औषध तरी विकत आणतां येईल. '












माझ्या मनांत विचार आला: – खड्ड्यांत जाऊं द्यात हे असले निकृष्ट प्रेमिक ! रोमिओ – ज्युलिएट आणि सोहनी-महिवाल यांच्या मार्गानें जायचें तर राहूंच द्या, पण देवदास आणि पार्वतीच्या पावलावर पाऊल-सुद्धां यांनीं टाकलें नाहीं ! आणि त्याचक्षणीं मी माझ्या कल्पनेच्या तलवारीनें त्या दोघांना खलास करुन टाकलें आणि एका नवीन निर्मल आणि आशेला जन्म दिला.

**: २ :**

यावेळीं मी निर्मल आणि आशेला बंगालमध्यें जन्म दिला. – सोनेरी बंगाल – टागोरांची जन्मभूमि, संस्कृति, कला आणि साहित्याचा हिंदोला ! ज्या ठिकाणीं बालपणींच मुलांना काव्याचा रस प्यायला मिळतो, जेथें धान्याच्या हिरव्यागार शेतांतून, लांबरुंद विशाल समुद्राच्या किनाऱ्यावर आणि ताडांच्या गर्दीमध्यें प्रणय निर्माण होतो आणि तरुण बनतो ! – एका प्रेम-कथेसाठीं यापेक्षां आणखी चांगलें वातावरण कुठलें असणार ?

निर्मल आणि आशा एकाच गांवीं जन्मले. गांवां-तल्या गल्लींत खेळत, बागडत मोठे झाले. गांवांतल्या दुसऱ्या मुलामुलींबरोबर ते जमिनदाराच्या बागेंतले अर्धवट पिकलेले आंबे तोडायचे आणि मग शेवाळानें आणि कमलांच्या फुलांनीं झांकलेल्या तलावांत ते आंबे त्यांनीं धुवायचे आणि मोठ्या आनंदानें खायचे. कधीं कधीं निर्मल आशेच्या हातांतला निम्माशिम्मा चोख-लेला आंबा हिसकवून घ्यायचा आणि स्वतः चोखायला लागायचा. नंतर मग त्या आंब्याच्या आंबटपणांतहि एक प्रकारचा विचित्र आनंद मिळायचा. आशेचें सगळें माधुर्य जसें कांहीं ओठांच्या द्वारें त्या आंब्याच्या रसांत मिसळलें होतें आणि खोडकरपणानें तो तिरप्या नजरेनें आशेकडे पहात म्हणायचा – ' आशा, आंबा फार गोड आहे, नाहीं ? '

आणि आशा रागावून एक कच्ची कैरी निर्मलकडे फेंकून म्हणायची– ' जारे, जारे, आमि कि जानि ? ' ( ' जा, मला नाहीं ठाऊक ! ' ) पण आशेच्या लाजऱ्या नजरेंत निर्मलला प्रेमाचा संदेश मिळायचा.

फार काळजीपूर्वक मी त्यांच्या निष्कपट प्रेमाला पाणी दिलें, वाढविलें आणि तरुण केलें. या वेळीं मी त्यांना एकाच जातीच्या घराण्यांत जन्म दिला होता. गोत्रसुद्धां वेगळें ठेवलें होतें. त्यांच्या प्रेमाला विवाहा-च्या सीमेपर्यंत पोंचण्यासाठीं कोणतीहि सामाजिक अडचण येवूं नये म्हणून सर्व काळजी घेतली होती. आशेच्या आईवडिलांना निर्मल आवडत होता. आणि निर्मलच्या आईवडिलांना आशा आवडत होती. लग्नाची गोष्ट निघाली होती इतक्यांत ...

पाऊस न पडल्यामुळें पीक जळून गेलें. उरलेसुरलेलें धान्य काळयाबाजारांत शेठजींच्या गुदामांत पोंचलें. शेतकऱ्यांचे दागदागिने, भांडींकुंडीं, एवढेंच काय पण त्यांच्या जमिनीहि जमिनदाराकडे गहाण पडल्या. जेव्हां खायला धान्य उरलें नाहीं, तेव्हां पानें, गवत कंद-मुळें खाऊन लोक जगायला लागले. आणि जेव्हां कांहींच शिल्लक उरलें नाहीं, तेव्हां सर्वांनीं गांव सोडून शहरांत जाण्याचें ठरविलें.

माझ्या मनांत विचार आला : संकटांतच प्रेम कळ-साला पोंचत असतें. या अशा वाईट वेळींच निर्मल आणि आशेला त्यांचें प्रेम सहाय्य करील. भूक, तहान, अनोळखी प्रदेश – कुठेंहि आणि कोणत्याहि स्थितींत ते असले तरी प्रेमाचा दीपक त्यांच्या जीवनाला प्रकाश देईल.

पण दुष्काळ पडला त्या वेळेपासून निर्मल आणि आशा आणि त्यांच्या घरचीं माणसें आतां पहिल्या-सारखीं एकमेकांना भेटत नव्हतीं. प्रथम तर दिवसभर बिचाऱ्या निर्मलला आपल्या घरच्या माणसांसाठीं गवत, पानें आणि रानांतलीं बोरें जमा करण्यासाठीं रानोमाळ भटकावें लागत होतें. संध्याकाळीं परत यायचा तेव्हां भुकेमुळें आणि श्रमामुळें इतका दमून जायचा कीं पड-ल्याबरोबर झोंपायचा. पण झोंपहि नीट लागत नसे. उपाशी पोटांतली आंतड्यांची ओढ झोंपहि येऊं देत नसे. तरीपण अशक्तपणामुळें एकप्रकारची धुंदी असा-यची. विचित्र स्वप्नें पडायचीं. स्वप्नें पूर्वीहि पडत असत– आशेचीं स्वप्नें. पण आतां त्याच्या स्वप्नांत ऊन ऊन भाताचे डोंगर दिसत; दुधाच्या नद्या आणि रसगुल्ल्यांचे मनोरे दिसत. आशा दिसत नसे.

अशा समयीं ते एखादे वेळीं भेटलेच, तरी कांहीं ' चांगल्या ' गोष्टी बोलूं शकत नसत.

' काय आशा, कसें काय ? '

' ठीक आहे. '

' तुझ्या घरचीं माणसें आजकाल काय खातात









अनुक्रमणिका

ग ?'

'काय मिळेल तें!'

'तूं ऐकलेंस कां? सगळेजण शहरांत जायचें म्हणत आहेत.'

'होय, नाहींतर मग दुसरा उपाय तरी काय आहे रे?'

निर्मलच्या थकलेल्या डोळ्यांत पुन्हां एकदां क्षणभर पूर्वीची चमक दिसूं लागली आणि तो आशेला म्हणाला – 'शहरांत बरोबरच जावूं या. तूं थकलीस, दमलीस तर मग मी तुला खांद्यावर घेईन!'

आणि आशेनें उत्तर म्हणून तेंच वाक्य पुन्हां उच्चारलें – 'जारे, जारे, आमि कि जानि'!

परंतु यावेळीं त्या शब्दांत प्रेमाची कुठलीच खूण नव्हती, फक्त एक विचित्र थकून गेलेली निराशा होती. तिला आपण केव्हां, कुठें जाणार आणि कुणाबरोबर जाणार यासंबंधीं विचार करण्याची शक्तीच उरली नव्हती.

आणि दुसऱ्याच क्षणीं निर्मलच्या थकलेल्या डोळ्यांतली ती पूर्वीची चमक झोंपीं गेली आणि त्याच्या पोटांतली वेदना निर्माण करणारी भूक जागी झाली.

भुकेचा तांडा निघाला शहराकडे!

गांव सोडल्यावर तिसऱ्याच दिवशीं निर्मलची आई वारली. वडील म्हातारे आणि आजारी होते. ते गांववाल्यांच्या पाठीमागें राहिले आणि त्यांच्याच-बरोबर निर्मलहि पाठीमागें राहिला. निर्मल कितीतरी मैल वडिलांना पाठीवर घेऊन गेला. परंतु एकदां रात्रीं-च्या वेळीं जेव्हां त्यांनीं मुक्काम केला आणि झोंपण्या-साठीं धरणीवर अंग टाकलें तेव्हां निर्मलच्या भुकेल्या पोटांत अजब, विचित्र, भयानक विचार निर्माण होऊन डोक्यांत गिरक्या घ्यायला लागले: त्याच्या मनांत विचार येत होते – 'वडील आजारी आहेत आज नाहीं तर उद्यां ते नक्की मरणारच. मी यांना घेऊन कुठें कुठें फिरणार? यांच्यामुळें मी तांडयापासून पाठीमागें पडलों तर मीहि निश्चित मरेन. हे झोंपल्यावर लगेच निघून जावें आणि सरळ त्या तांड्याला जाऊन मिळावें. आशेची काय स्थिति झाली असेल कुणास ठाऊक! कदाचित् तिच्या बापाजवळ धान्याचे कांहीं दाणे असतीलहि. धान्य – भात – भूक – बाप – धान्य-भात...!

सकाळीं तो जागा झाला तेव्हां वडील मरून पडले होते. डोळे अजूनहि उघडेच होते, आश्चर्यानें उघडे राहिल्यासारखे. आणि आतां ते मेलेले डोळे आकाशा-कडे पहात होते. पण निर्मलला वाटलें कीं तें डोळे आपल्याकडेच रोखून पहात आहेत – आश्चर्यानें, रागानें, तिरस्कारानें आणि...प्रेमानें! आणि मग तो तेथून जायला निघाला. उपाशी पोटीं जेवढ्या वेगानें जातां येईल तेवढ्या वेगानें. आणि त्यानें एकदांहि पाठीमागें वळून पाहिलें नाहीं. भय आणि अशक्तपणा-मुळें त्याचे पाय डगमगत होते.

तांड्यांपर्यंत पोंचायला त्याला दोन दिवस लागले. एवढ्या वेळांत तो एक भुकेचा मूर्तिमंत पुतळा बनला होता. सगळी जमीन त्या कल्पनेच्या जगांत एक सुरेख गोल पोळी दिसत होती. अशक्तता इतकी वाढली होती कीं रखडत रखडतच तो चालूं शकत होता. तिसऱ्या दिवशीं जेव्हां तांडा समोर सडकेच्या वळणा-वर जातांना दिसला, त्या वेळीं सडकेच्या कडेला एक तरुण पोरगी मातीनें आणि धुळीनें माखलेल्या स्थितींत पडलेली त्याला दिसली. तो थांबला. कारण कदाचित् जर ती पोरगी मेली असेल, निदान बेशुद्ध पडली असेल तर तिच्या फाटलेल्या साडीच्या पदरांत कदाचित् कांहीं तांदळाचे दाणे बांधलेले सांपडतीलहि...!

पोरगी बहुतेक मेलेली नव्हती, कारण तिच्या सपाट छातीमध्यें अधून मधून श्वासाची लहानशी लाट उठत होती–तलावाच्या शांत पृष्ठभागावर हवेच्या झोक्यानें एखादी बारीक लाट उठावी ना तशी–! ... त्या पोरीचें तोंड एका बाजूला कलंडलें होतें. तिच्या मुठी वात झाल्याप्रमाणें जोरांत आवळलेल्या होत्या. निर्मलनें झटकन् तिच्या साडीच्या पदराचा झाडा घेतला, खाण्या-ची कोणतीच वस्तू बांधलेली मिळाली नाहीं. मग कदा-चित् जवळपास कांहीं पडलें असेल म्हणून आजूबाजूला पाहिलें. परंतु तेथें सडकेच्या कडेला धुळीशिवाय दुसरें कांहींच नव्हतें – मऊ मऊ धूळ त्या पोरीच्या विसकटलेल्या केंसांत अडकली होती आणि त्या धुळीची पावडर तिच्या पिवळ्या, सुकलेल्या, पिचलेल्या गालांवर माखलेली होती. 'हूं, मरूं दे हिला, आपण जावें पुढें–' निर्मलच्या मनांत विचार आला आणि त्याच्या भुकेनें वखवखलेल्या आंतड्यांनीं आठवण करून दिली कीं








कांहीं ना कांहीं तरी खाण्याच्या पदार्थाचा तपास केलाच पाहिजे – एखाद्या झाडाचीं पानें – गवत, नाहीं-तर एखादा मेलेला पक्षी असला तरी चालेल. पण जातां जातां त्यानें वळून त्या बेशुद्ध पडलेल्या पोरीकडे पाहिलें. ह्या पोरीला आपण पूर्वी कधीं तरी पाहिलें असावें असें त्याला वाटूं लागलें होतें. पण कुठें ? आपण यापूर्वी एखादी पोरगी पाहिली असेल हेंहि त्याला या वेळीं आठवत नव्हतें ...... मग आपल्या हृदयाच्या पडद्यावर एक अंधुक असें चित्र कां दिसतें आहे ? इतकें अस्पष्ट ... कीं तो ओळखूं शकत नव्हता ! त्याच्या कानांत लांबून एका ओळखीच्या नांवाचा अगदीं लहान – बारीक आवाज कुठून ऐका-यला येतो आहे ? एखाद्या दुसऱ्या जगांतून कोणीतरी हांक मारावी ना, तसें वाटत होतें ! आणि त्याच्या हृदयाची धडधड कां वाढली होती ? भयानक भुके-मुळें हृदयाचा एखादा रोग तर जडला नाहीं ना ? का या पोरीशीं आपला कांहीं तरी संबंध आहे ? ही मुलगी कोण आहे ? ही मुलगी कोण आहे ? मी हिला पूर्वी कधीं पाहिलें आहे ? कुठें ? केव्हां ? कधीं ? अस्पष्ट – अस्पष्ट प्रश्न त्याच्या डोक्यांत निर्माण होत होते, वाढत होते, नष्ट होत होते ! ... ... परंतु लवकर-च उपाशी पोटाचें प्रश्नचिन्ह इतर सर्व प्रश्नांना बाजूस सारून त्याच्या बुद्धीवर, त्याच्या हृदयावर आणि त्याच्या आत्म्यावर पसरलें आणि त्या क्षणीं त्याला ती सडकेच्या कडेला पडलेली पोरगी रस्त्याच्या कडेला पडलेल्या दगडाप्रमाणें किंवा शेवटच्या फांद्या-वरून शेवटचे हिरवे हिरवे अंकुरहि ओरबाडून गेलेल्या वृक्षाप्रमाणेंच भिकार, अनोळखी, लागाबांधा नसलेली वाटली ! आपलें शरीर ढकलत ढकलत निर्मल पुन्हां चालायला लागला. ... . . ... ...

आणि मी ओरडायला लागलों,– "अरे ए निर्मल, तूं कुठें निघाला आहेस ! ही तुझी आशा आहे ! तुझी आशा, प्रियतमा, जिच्याबरोबर जमिनदाराच्या बागेतून तूं कच्चे आंबे तोडून आणीत होतास आणि मग तुम्ही दोघे ते आंबे कमळाच्या फुलांनीं झांकलेल्या तळ्यांत धुवायचे आणि तूं आशेच्या हातांतून अर्धा चोखलेला आंबा हिसकावून घेऊन स्वतः चोखूं लागायचास आणि मग त्या आंब्याच्या आंबटपणा-मध्येंहि तुला एक विचित्र गोडी वाटायची– जसा कांहीं आशेचा सर्व गोडवा ओठाच्या द्वारें त्या आंब्या-च्या रसांत मिसळला होता.... काय तूं हिला ओळ-खत नाहींस ? तूं आपलें प्रेम, आपलें तारुण्य बालपण – सर्व विसरलास काय ? "

पण निर्मलनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. तो साव-काश सरळ निघून गेला. मी हांक मारली तरी तो थांबला नाहीं. मी ओरडलों, पण त्यानें मागें वळून-सुद्धां पाहिलें नाहीं. मी ओरडून म्हणालों, – " मी तुला हुकूम देतों आहे – थांब. आपल्या प्रियतमेला जवळ घे. तिच्या सुकलेल्या ओठांत तुझ्या प्रेमानें भर-लेल्या शब्दांनीं जीव ओत. तिला खांद्यावर घेऊन चल. हिच्याशिवाय तुझें जीवन व्यर्थ आहे. कारण ती तुझी प्रियतमा आहे, तुझा प्राण आहे, तुझ्या जिवाची धडधड आहे, तुझ्या स्वप्नांची राणी आहे ... आणि जर मरायचें आहे तर मग दोघांना एकमेकांच्या कुशींत एकदम मरायला पाहिजे, मग तुमचें मरणहि अमर होईल ! लैला-मजनूं शीरीं-फरहाद, सोहनी-महवाल आणि हीर-रांझाप्रमाणें ... "

पण निर्मलनें माझें कांहींच ऐकलें नाहीं. तांदळा-च्या कांहीं दाण्यांसाठीं आपल्या प्रियतमेला सोडून, तिला विसरून तो निघून गेला.

मी पुन्हां ओरडलों-रागानें माझा आवाज कांपत होता,– "निर्मल, मी तुला निर्माण केलें आहे, मी तुझा ईश्वर आहे. मी तुला माझ्या कल्पनेनें जन्म दिला आहे. तूं माझा हुकूम मोडूं शकत नाहींस. "

परंतु निर्मलनें आपल्या ईश्वराचाहि आवाज ऐकला नाहीं आणि त्याला थांबविण्यासाठीं मला त्याच्या पाठीमागें धांवावें लागलें.

जेव्हां मी धांवत धांवत, धापा टाकीत त्याच्या-पाशीं पोहोंचलों तेव्हां निर्मल मोटारमध्यें बसलेल्या पांढरपेशा माणसाजवळ भीक मागत होता –

' बाबूजी थोडासा भात देता कां ? नाहींतर मी मरून जाईन ! '

हें दृश्य पाहिल्यावर मी रागानें, तिरस्कारानें, लज्जेनें लाल झालों. मी निर्माण केलेला मनुष्य आणि त्यानें दुसऱ्यांच्या समोर हात पसरावेत ! मी त्याच्या हृदयांत स्वाभिमान ठेवलाच नव्हता कीं काय ! मी चिडून म्हणालों–, ' निर्मल, तुला लाज कशी वाटत नाहीं ? तांदळाच्या कांहीं दाण्यासाठीं भीक मागतो आहेस !





अनुक्रमणिका

कुठें आहे तुझा तो आत्माभिमान ? '

निर्मलनें माझ्याकडे वळूनहि पाहिलें नाहीं. परंतु त्याच्या गयावया करण्यांतच माझ्या प्रश्नाचें उत्तर सामावलेलें होतें.

' बाबा ! दया करा, पांच दिवस उपाशी आहे ' आणि मी चिडून म्हणालों–, " उपाशी आहेस ! तर मग एवढें झालें काय ! एका बहादुर आणि स्वाभिमानी माणसाप्रमाणें जीव दे. पण भीक मागूं नकोस. भूक तुझा आत्माभिमान, तुझी अब्रू, तुझी महान् मनुष्यता नष्ट करूं शकणार नाहीं. "

आणि पुन्हां त्याचा गयावया केल्याचा आवाज हेंच माझ्या प्रश्नाचें उत्तर होतें – ' भूक फार वाईट आहे, बाबा ! '

मोटारींत बसलेल्या माणसानें एका पिशवींतून एक वाळलेला पावाचा तुकडा काढला आणि निर्मलला दिला. तो मिळतांच निर्मलच्या निवालेल्या डोळ्यांत जिवंतपणा आला. त्यानें तो पाव कितीतरी वेळां दाबून, वास घेऊन, इकडे तिकडे हातांत घेऊन पाहिला. हा खरोखरींच खाण्याचा पाव आहे कीं आपल्याच भुकेलेल्या कल्पनेनें रस्त्यावरच्या एखाद्या दगडाला पावाचें रूप तर दिलें नाहीं ना – याची तो खात्री करून घेत होता. परंतु तरीहि त्याचा विश्वास बसेना तेव्हां भुकेलेल्या कुत्र्याप्रमाणें त्यानें पावाचा मोठा तुकडा तोडला आणि तो लगेच झटपट खाऊन पाहिला. तेव्हां त्याला तो पावच असल्याची खात्री पटली आणि मग एकदम तो जमिनीवर आडवा पडला. त्याला नमस्कार करतांना पाहिल्यावर मोटारवाले खदखदां हसायला लागले आणि शरमेनें माझें पाणी पाणी झालें ! कारण माझा माणूस, ईश्वराशीं टक्कर देण्यासाठीं ज्याला मी जन्म दिला होता, तोच आज दुसऱ्या एका माणसासमोर किड्याप्रमाणें सरपटत होता !

आणि मग देवीचे वण तोंडावर पडलेल्या मोटारमधल्या एका माणसाच्या नशेबाज डोळ्यांत एक विचित्र चमक निर्माण झाली आणि त्यानें निर्मलला खुणेनें आपल्याकडे बोलावून तो म्हणाला – ' अरे, जरा माहिती सांग बरं ! '

निर्मल पाव खात खात म्हणाला – ' काय सांगूं, महाराज ! तुम्हीं माझा जीव वांचविला आहे. मी तुमची कोणती सेवा करूं ? '

नशेबाज डोळेवाल्यानें इकडेतिकडे पाहिलें आणि रस्ता मोकळा आहे असें पाहून निर्मलला विचारलें – ' एखादी चांगली कामाची पोरगी पाहिली आहेस का जवळपास ? जरा तरणीबांड ... ' आणि मी ओरडून त्याला सावध करण्यापूर्वींच निर्मलच्या तोंडांतून त्या प्रश्नाचें उत्तरहि निघून गेलें होतें – ' होय बाबूजी, एक पाहिली आहे खरी ... पाठीमागें कांहीं मैलावर सडकेच्या कडेला बेशुद्ध पडली आहे. पण लवकर जा, नाहींतर मरून जाईल ! '

आणि एका क्षणांतच ती मोटार धूळ उडवीत नाहींशी झाली.

आतां मात्र मी रागानें अगदीं लाल झालों – ' अरे नीच माणसा ! तूं माझ्या कल्पनेनें निर्माण झाला आहेस याचीच मला लाज वाटते आहे. हे लोक कोण आहेत आणि तरुण पोरीच्या तपासासाठीं कां हिंडत आहेत ? तुला माहिती आहे का ? तूं काय केलें आहेस, याची तुला जाणीव तरी आहे का ? एका वाळलेल्या पावाच्या मोबदल्यांत तूं आपली इज्जत, अब्रू आणि माणुसकी विकली आहेस. . . . . . . ' !

परंतु निर्मल वाळलेला पाव खाण्यांत इतका गुंग होऊन गेला होता कीं त्यानें माझ्या बोलण्याकडे अजिबात लक्ष दिलें नाहीं. हो, मला एवढें मात्र समजलें कीं जेव्हां पाव त्याच्या पोटांत जायला लागला आणि त्याचीं अशक्त सुकलेलीं, झोंपलेलीं आंतडीं पुन्हां काम करूं लागलीं तेव्हां निर्मलची डोळयांतली राक्षसी पशुता दूर व्हायला लागली. एखादी सुंदर तरुणी आळस झाडीत घाबरून उठावी ना त्याप्रमाणें त्याची स्मृति डोकें वर काढूं लागली होती, त्याची आशा ... !

आशा !

आशा ?

हे परमेश्वरा ! ... आशा ! . . .

पावाच्या शेवटच्या तुकड्याबरोबरच एक भयानक विचार विजेसारखा त्याच्या डोक्यांत चमकला. ' नाहीं, नाहीं ! ' –त्याच्या हृदयानें आवाज दिला, ' असें होऊं शकणार नाहीं. कधींच होऊं शकणार नाहीं ! कधींच नाहीं ... कधींच नाहीं ... '

तो वळून पाठीमागें धांवत सुटणार होता, इतक्यांत तीच मोटार परत येतांना दिसली.–चार पांढरपेशीं












माणसें आणि त्यांच्याबरोबर एक धुळीनें माखलेली, फाटक्या कपड्यांत लपेटलेली तरुण मुलगी.

'आशा ! आशा !' ती मोटार त्याच्याजवळून गेली तेव्हां तो ओरडला आणि तो त्या मोटारीमागें धांवूं लागला.

'काय रे ?' धापा टाकीत ज्यावेळीं तो मोटारीपाशीं पोंचला तेव्हां मोटारीमधल्या एकानें विचारलें आणि एक क्षणभर निर्मल कांहींच उत्तर देऊं शकला नाहीं.

ती पोरगी शुद्धीवर आली होती. ती एक वाळलेला पावाचा तुकडा खाण्यांत गुंतली होती. तिचें सर्व लक्ष त्या पावावर होतें, तिनें नजर वर करूनसुद्धां त्या भीक मागणाऱ्या, 'आशा ! आशा !' ओरडत मोटारीमागून धांवणाऱ्या माणसाकडे पाहिलें नाहीं. आणि ती पाहील तरी कशासाठीं ? तिचें नांव आशा होतें तरी का ? तिला कांहींच आठवत नव्हतें ... आणि तिला त्याची पर्वाहि नव्हती. त्या वेळीं त्या पावाशिवाय तिला जगांतल्या कोणत्याहि वस्तूची पर्वा नव्हती.

'आशा !' निर्मल ओरडला–'मोटारींतून खालीं उतर. हे लोक वाईट आहेत. हे तुला विकून टाकतील– ये, आशा ! माझ्याबरोबर चल. आपण दोघे मिळून जाऊं या.'

पोरीनें एक क्षणभर निर्मलकडे पाहिलें. परंतु तिच्या निवालेल्या, विझलेल्या डोळयांमध्यें ओळखीची चमक निर्माण झाली नाहीं. मग ती आपल्याबरोबरच्या माणसाकडे वळली आणि तिनें विचारलें–, 'हा कोण आहे ?'

'तूं मला ओळखत नाहींस ! आशा, तुला काय झालें आहे ? मी निर्मल आहे, निर्मल ! आठवत नाहीं का तुला, आपण दोघे एकाच गांवांत जन्मलों आहोत. आपण बरोबर खेळलों आहोत. आठवत नाहीं का ? आपण मिळूनच जमिनदाराच्या बागेंतून आंबे तोडून आणीत असूं आणि मग ते तळ्यांत धुवून खात असूं. जेव्हां मी तुझ्या हातांतला अर्धा चोखलेला आंबा हिसकावून घेऊन चोखूं लागत असे तेव्हां....?'

पोरगी म्हणाली–एका विचित्र आवाजांत–जसा कांहीं तो तिचा आवाजच नव्हता–, 'जा रे... जा रे ... आमि कि जानि ?' आणि मोटार धूळ उडवीत निघून गेली.

एका क्षणांत माझ्या कल्पनेनें त्या दोघांना नष्ट करून टाकलें. हें काय प्रेम झालें काय ? मी ठरविलें कीं आतां निर्मल आणि आशा यांना अशा कांहीं वातावरणांत जन्म द्यायचा कीं त्यांचें प्रेम नीट पार पडलें पाहिजे.

**: ३ :**

भूक म्हणजे प्रेमाचा मृत्यु होय. आणि पैशाशिवाय प्रेमाचा जीव कासावीस होतो. म्हणून मग या वेळीं निर्मल आणि आशा दोघांनाहि त्यांचें प्रेम गरिबी आणि दुष्काळामुळें नष्ट होणार नाहीं अशा घराण्यांत निर्माण करावयाचें असें मी ठरविलें. याच्या उलट त्यांचें प्रेम वाढीस लागावें म्हणून सर्व प्रकारची सोय होईल आणि आराम मिळेल अशी काळजी घेतली. कोणत्याहि प्रकारच्या आर्थिक अडचणीपासून दूर ठेवून फक्त आपल्या प्रेमावरच ते आपलें सर्व लक्ष देतील याचीहि काळजी घेतली.

मी आशेला एका लाखोपति शेटजींच्या घरीं जन्म दिला आणि निर्मलला दुसऱ्या एका लाखोपतीच्या घरीं. निर्मलला ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी, पॅरिसमधील नृत्यालयें आणि न्यूयार्कमधील नाइट-क्लबांमधून शिक्षण दिलें. आशेला नैनितालच्या एका इंग्रजी शाळेमध्यें, टागोरांच्या शांतिनिकेतनमध्यें आणि मुंबईच्या ताजमहाल हॉटेलच्या बॉलरूममध्यें आपलें शिक्षण आणि व्यक्तित्व वाढविण्यास पूर्ण संधि दिली. मग 'उत्तम शिक्षणा'साठीं आशेला फ्रान्स, स्विट्झर्लंड आणि इंग्लंडचा प्रवास करण्यासाठीं पाठविलें आणि परत येतांना एअर-इंडिया-इंटरनॅशनलच्या एका विमानांत त्या दोघांची भेट घडवून आणली.

लंडनवरून विमान सुटल्यावर एक सुंदर तरुणी एकटीच बसलेली पाहून निर्मल हंसला आणि दुसरी कोणतीच सीट मोकळी नसल्याचा बहाणा करून अर्ध्या ऑक्सफर्ड आणि अर्ध्या अमेरिकन पद्धतीनें आशेला म्हणाला–'जर आपली कांहीं हरकत नसेल, तर मी या शेजारच्या मोकळया सीटवर बसूं काय ?'

आशेनें निर्मलच्या पन्नास पौंडवाल्या उंची सूटवर दृष्टि टाकली आणि म्हटलें : 'हं, हो ना ! अवश्य.'

'माझें नांव निर्मलकुमार काराभाई,' निर्मल लॅप स्ट्रॅप बांधीत म्हणाला.












'आणि माझें नांव आशा आलूवाला.'

'हाऊ डु यू डू, मिस् आलूवाला! प्लीज्ड् टु मीट यू!'

शेकहॅन्ड करतांना आशेचीं नाजुक, लाल, कोमल, पॉलिश केलेल्या नखांचीं बोटें निर्मलच्या हाताला नेहमीपेक्षां जास्त गरम आणि निःसंकोच वाटलीं. पण 'सोसायटी'मध्यें असल्या गोष्टी 'नोटीस' करीत नाहींत. असल्याच गोष्टी शिकण्यासाठीं तर ती विलायतेला गेली होती.

'आपण काराभाई कॉटन मिल्स्चे काराभाई वाटतं?'

'हो, मी त्यांचा धाकटा मुलगा आहे. आपण शेट आलूवाल्यांच्याच कन्या ना?'

'आपण वडिलांना ओळखतां वाटतं?'

'वाहवा, अहो हिंदुस्थानांत पोटॅटो किंग हें नांव कुणाला माहिती नाहीं असें होईल तरी कसें?'

कांहीं वेळ शांतता पसरली. विमानानें लंडनच्या विमानतळालाच काय पण इंग्लंडच्या खाडीलाहि पाठी-मागें टाकलें होतें आणि आतां फ्रान्समधील हिरवींगार शेतें दिसायला लागलीं होतीं. मग निर्मल म्हणाला—'आपण इंडिया हाऊसमधल्या पार्टीला आला नव्हता वाटतं. नाहींतर या पूर्वींच आपली भेट झाली असती.'

'हो. मी त्यावेळीं स्विट्झरलंडला गेल्यें होतें.'

'कुठें? जिनेव्हा?'

'अं हं, इंटरकोलोन.'

'फार सुंदर आहे. मला तर फारच आवडते. मी वर्षांतून कमींत कमी दोन आठवडे तरी इंटरकोलोन-मध्यें घालवतोंच.'

'या वर्षीं आपण आला नाहींत वाटतं?'

'हो. मला खरंच वाईट वाटतें आहे. खरं म्हणजे मी त्या वेळीं अमेरिकेला गेलों होतों तीन आठवड्यां-साठीं. पण तेथें आणखी दोन आठवडे रहावें लागलें...'

जिनेव्हा आणि रोमच्यामध्यें त्यांचें विमान जेव्हां इटलीमधील आल्प्स पर्वताच्या वरून जाऊं लागलें तेव्हां निर्मल म्हणाला—'थंडी फार पडली आहे, नाहीं? आपण हा रग पायावर घ्या.'

'आपल्यालाहि थंडी वाजत असेल. आपणहि घ्या.'

गरम रगाच्या आंत त्यांचे गुडघे आपोआपच जवळ आले आणि मग अलग झाले नाहींत.

'आपल्याला ह्या लाईटचा त्रास होत असेल, तर मालवतों!'

विमानाच्या केबिनमध्यें एक गोड अंधार पसरला आणि दूर खालीं बर्फ पांघरलेल्या टेंकड्या चांदण्या रात्रीं फिरणाऱ्या ढगांशी आंधळी कोशिंबीर खेळूं लागल्या.

आशेचा मऊ आणि नाजुक हात निर्मलच्या हातांत कसा काय पोंचला कुणास ठाऊक!

'किती गोड वास येतोय! आपण केंसांना कोणतें तेल लावलें आहे?' निर्मलनें आशेच्या कानांत म्हटलें.

'मी आज केंसांना तेल लावलेलें नाहीं आणि कोणता सेंटहि लावलेला नाहीं!'

'तरीच इतका मस्त वास येतोय बरं कां!'

'तर मग आपण प्यायल्याशिवायच मस्त होता वाटतं!'

'हो, ईश्वराची कृपा आहे. मोरारजी देसाईंच्या या दारूबंदीच्या काळांत कमींत कमी, प्रेमाच्या धुंदीवर अजून तरी बंदी घातलेली नाहीं.'

'......... ... ... ...'

'चला, चावट कुठले!'

'अं हं! मी अगदीं सभ्य आहे बरं का. पण काय करणार? आपण फार सुंदर आहांत.'

जेव्हां विमान रोमला पोंचलें आणि केबिनमध्यें दिवे लागले, तेव्हां इतर प्रवाश्यांना आशा पुनश्च लिप्स्टिक् लावीत असलेली दिसली.

प्रवासी खालीं उतरून कॉफी घेण्यासाठीं हॉटेलमध्यें गेले आणि मग समजलें कीं हवा वाईट असल्यामुळें विमान पुढें जाणार नाहीं. ही रात्र रोममध्यें एखाद्या हॉटेलमध्येंच घालवावी लागणार!

निर्मल यापूर्वींहि कित्येकदां या हॉटेलमध्यें उतरला होता. मॅनेजर त्याला ओळखीत होता. डोळ्याचा एक इषारा उपयोगी पडला आणि निर्मल-आशेला शेजारच्या खोल्या देण्यांत आल्या. त्या खोल्यांमधील दरवाजाची कडी निर्मलच्या बाजूला होती. अजून आशेनें रात्रीं नेसायचे कपडेहि घातले नव्हते. तेवढ्यांत दरवाजा उघडला आणि हातांत शॅम्पेनचे दोन ग्लास घेऊन निर्मल आंत आला.

'हॅलो, डॉर्लिंग!' — फक्त दहा तासांत मिस् आलू-वालापासून 'आशा' आणि 'आशे 'पासून 'डॉर्लिंग'!

'हॅलो!'



अनुक्रमणिका







'एकदां झोंपण्यापूर्वी एक शेवटचा ग्लास प्यावा म्हटलं. उद्यां मुंबईला पोंचल्यावर समुद्राचें पाणीच प्यावें लागणार आहे.'

'पण फक्त एकच ग्लास बरं कां ! मी जास्त घेत नाहीं.'

'तुझ्यासाठीं !'

'आणि हा तुझ्यासाठीं !

'आणि हा प्रेमाच्या रात्रीच्या स्मृतीसाठीं !'

आणि दुसऱ्या रात्रीं मुंबईला पोंचण्यापूर्वी ते दोघे प्रेमाच्या सर्व पायऱ्या चढले होते. पूर्वीच्या काळीं याच पायऱ्या प्रियकर-प्रेयसीला चढायला कित्येक वर्षे लागायची. विमानतळावर जेव्हां आपापल्या मोटारींत बसायला लागले तेव्हां निर्मल म्हणाला – 'चीरियो' आशा ! पुन्हां लवकर भेटूं या !'

आणि आशा म्हणाली – 'जरूर, जरूर. चीरियो, निर्मल, फोन कर !'

मोटारी निघून गेल्या आणि मला वाटलें, हेंच तें खरें प्रेम ! कसली बकबक नाहीं कीं झकझक नाहीं. फक्त प्रेम. आतां ते दोघेजण एकमेकं ताजमध्यें, ग्रीन-मध्यें, चांदण्या रात्रीं जुहूच्या कांठी भेटतील, प्रेमाच्या–प्रीतीच्या गोष्टी बोलतील. त्यांच्यामध्यें समाज एखादी भिंत उभी करूं शकणार नाहीं आणि गरिबी किंवा भूकहि त्यांना अलग करणार नाहीं. त्यांचें प्रेम स्वतंत्र आहे आणि म्हणून अटळ आणि अमर आहे. ही प्रेमकथा नक्कीच सफल होणार !

परंतु आशा घरीं पोंचली तेव्हां तिचें स्वागत करण्यासाठीं आईवडील, भाऊ-बहिणीशिवाय मध्यम वयाचे आणि टक्कल पडलेले 'पोटॅटो किंग 'चे भागी-दार शेट लालचंद कमालचंदहि आले होते. त्यांनीं मोठ्या उत्साहानें आशेशीं हस्तांदोलन केलें आणि त्या हात-मिळवणींतहि आशेला निर्मलच्या शेकहँडमध्यें अनुभवायला मिळालेला मनमोकळेपणा याहि जागीं कांहीं मर्यादेपर्यंत अनुभवायला मिळाला. परंतु लालचंद कमालचंदचे हात जन्मभर रुपये मोजतां मोजतां टणक आणि खरखरीत झाले होते आणि त्यांच्या बोचणाऱ्या हाडांच्या दडपणामागें तारुण्याचा इशारा नव्हता, म्हातारपणींची प्रार्थना होती.

दुसऱ्या दिवशीं आशा निर्मलच्या टेलिफोनची वाट पहात होती आणि त्याच वेळीं स्टॉक एक्सचेंजला जातांजातां तिच्या वडिलांनीं तिला सांगितलें कीं ती सुखरूप परत आली म्हणून त्या आनंदाप्रीत्यर्थ लालचंद कमालचंद ताजमध्यें सर्व मंडळींना मेजवानी देणार आहेत.

'त्याला तूं फार आवडतेस, आशा ! वयहि कांहीं तसं फार नाहीं. मला वाटतें कीं, तूं त्यांच्या सूचनेचा अवश्य विचार करावास.'

आशा वडिलांसमोर गप्प बसली. पण तिनें विचार केला. 'हूं, बुवड नाहीं तर ! चेहरा तर पहा. कुठें तो आणि कुठें निर्मल !'

रात्रीं ताजमध्यें जेवणाचे वेळीं केवळ आपल्या वडिलांच्या आनंदासाठीं लालचंद कमालचंदाबरोबर नाचतांना, तिला खिमा झाल्यासारखें वाटत होतें ! त्याचवेळीं निर्मलला येतांना पाहून तिचा चेहरा खुलला.

'माफ करा. एका मित्राची गांठ घेतें' असें म्हणून नाच संपण्यापूर्वीच आपल्या पार्टनरच्या तावडींतून निसटून, गर्दीतून वाट काढीत ती निघून गेली.

परंतु ... परंतु ... निर्मलच्या बरोबर ही कोण आहे ? 'हो ... हॅलोऽ ... आशा ! यांची ओळख करून देतों.'

एक मध्यम वयाची स्त्री पेस्ट, पावडर, लिप-स्टिक, तंग चोळी आणि रंगवलेल्या केसांच्या मदतीनें तरुण असल्याचा देखावा निर्माण करण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत होती आणि तिनें निर्मलच्या कमरेभोंवती इतक्या मोकळेपणानें आणि अधिकारानें हात टाकला होता कीं एक भयानक संदेह आशेच्या मनांत विजे-सारखा चमकला.

फीफीशीं हस्तांदोलन करीत ती म्हणाली – 'आपल्याला भेटून फार आनंद झाला, मिसेस् काराभाई.'

फीफी हें ऐकून हंसली – असभ्यपणें, खदखदा ! दांत किती बेढब होते तिचे ! 'आपल्या मैत्रिणीची चूक तरी पहा ना, डार्लिंग !' ती निर्मलला म्हणाली.

'डार्लिंग !' तिच्या तोंडचा शब्द ऐकून आशा जळफळली.

'आशा, तुझी चूक झाली. ही फीफी आहे. मिसेस् फटाका. माझी पत्नी नव्हे.'

आशानें फीफी फटाकाविषयीं खूप ऐकलें होतें.








पण तिची प्रत्यक्ष भेट घेण्याची संधि मात्र मिळालेली नव्हती. तिचें लग्न तरुणपणीं एका मध्यम वयाच्या श्रीमंत माणसाबरोबर झालें होतें. तिचा नवरा अजूनहि जिवत होता आणि पत्नीचा खर्च भागवीत होता. परंतु कित्येक वर्षें झालीं त्यांचा शरीरसंबंध तुटला होता. दोघेहि वेगवेगळ्या बंगल्यांत रहात होते. शेट फटाका आपलें उरलेलें आयुष्य अफू-गांजा खाण्यांत घालवीत होते आणि फीफी आपल्या हरवलेल्या यौवनाच्या शोधांत सोसायटीमधील तरुणांचा पाठलाग करीत होती. त्या दोघांना एकत्र पाहिल्यावर निर्मल फीफीची नवीन शिकार आहे यांत शंकाच नव्हती. या क्षणीं आशेच्या किती आशा आणि आकांक्षांचा चक्काचूर झाला कुणास ठाऊक! आणि आपल्या सर्व आयुष्यांत ती प्रथमच असभ्यपणें म्हणाली – माफ करा, 'मि. काराभाई, परंतु मी यांना आपली पत्नी नाहीं, आई समजत होतें ' आणि फीफी या हल्ल्याचें कांहीं उत्तर देण्यापूर्वीच, आशा आपल्या टेबलाकडे निघून गेली. ऑर्केस्ट्रानें एक नवीन राग वाजविण्यास सुरुवात केली होती ' ओ माय डार्लिंग! ओ माय डार्लिंग!' फीफी आणि निर्मल रंगांत येऊन नाचत होते. निर्मलच्या चेहऱ्यावर चिंता पसरली होती. पण फीफी त्याला अगदीं खेटून नाचत होती. निर्मलला जसें कांहीं कोणी तरी पळवून नेईल अशी भीति तिला वाटत होती.

' निर्मल काराभाईला तूं ओळखतेस वाटतं ? ' आशेच्या वडिलांनीं विचारलें.

' होय, विमानांत गांठ पडली होती. फार चांगले आहेत. खूप गप्पा मारतात. '

' हं, आतां तर नुसत्याच गप्पा मारील ? ' लालचंद म्हणाले.

' अं, काय म्हणतां ? माझ्या नाहीं लक्षांत आलं ? '

तेव्हां तिच्या वडिलांनी सांगितलें कीं शेट काराभाईनें आपल्या धाकट्या पोराच्या उधळपट्टीला आणि बरखर्चीला कंटाळून त्याला आपल्या इस्टेटीचा वारसा दिलेला नाहीं. वडील मेल्यावरहि त्याला एक फुटकी कवडीसुद्धां मिळणार नाहीं.

' नाहीं. असं कसं होईल ? ' आशा म्हणाली, 'तो राहतो तर मोठ्या रुबाबांत. प्रत्येक वर्षी विलायतेला जातो. हे उंची कपडे, मोटार, मग हें सर्व कुठलें ? '

' कुठलें ? ' लालचंद कमालचंदानें आपले पिवळे दांत दाखवीत हेच शब्द पुन्हां उच्चारले आणि मग जरूरीपेक्षां जास्त खाली वांकून आशेच्या कानांत सांगितलें, 'खूप मार्ग असतात : ब्रिज, फ्लॅश, पोकर आणि फीफी फटाका ! ' आणि असें म्हणून त्यानें आपल्या टक्कल पडलेल्या डोक्याच्या साहाय्यानें खूण केली. तिकडे निर्मल फीफीला रुंबाच्या गिरक्या देत होता आणि ऑर्केस्ट्राच्या आवाजाबरोबर गातहि होता : ' ओ माय डार्लिंग ! ओ माय डार्लिंग ! '

आशानें लालचंद कमालचंदला म्हटलें – ' मला कससंच होतं आहे. फार उकडतंय ! चला, आपण बाहेर समुद्राच्या गार हवेंत कांहीं वेळ भटकूं या. '

थोड्याच दिवसांत त्यांच्या एंगेजमेंटची बातमी सर्वांना समजली. मोठी झकास पार्टी झाली. लालचंद कमालचंदानें पंचवीस हजाराची हिरेजडित आंगठी आपल्या भावी पत्नीला भेट दिली. निर्मलहि पार्टीला आला होता आणि आशेला, एक मिनिटभर एकटीच आहे असें पाहिल्यावर, म्हणाला–, ' आशा, अभिनंदन ! ' आणि तिच्या कानांत हळूंच – ' कधीं जरूर पडलीच तर मला विसरूं नकोस.'

सहा महिन्यांनंतर लग्न झालें. पण लग्नासाठीं निर्मल आला नव्हता. कारण तो पुन्हां विलायतेला सफरीवर गेला होता. लालचंद कमालचंदनेंहि हनिमूनसाठीं स्वित्झर्लंडला जाण्याचें ठरविलें. मुंबईहून कायरो, तेथून रोम. रोमला कित्येक नवीन प्रवासी विमानांत चढले. परंतु जेव्हां आशा आणि तिचे पति हॉटेलमधून परतले तेव्हां सर्वजण आपापल्या जागीं बसले होते. आशेनें पाहिलें तर समोरच्या मोकळ्या जागेवर एक जोडपें बसलें होतें. एक पुरुष आणि एक तरुणी. परंतु पाठीमागून चेहरे दिसत नव्हते.

पुन्हां एकदां इटालीच्या आल्प्सवरून विमान जात होतें. खालीं बर्फानें झांकलेल्या टेकड्या ताऱ्यांच्या मंद-मधुर प्रकाशांत अंधुक अंधुक दिसत होत्या. आशेच्या मनांत विचार आला– ' आज चंद्र उगवणार नाहीं. हृदयाबरोबर माझ्या जीवनाचा प्रकाशहि नाहींसा झाला आहे ! गोड निर्मल ! बेफिकीर, क्रूर, निर्मल ! सुंदर चेहऱ्याचा आणि बळकट बाहू असलेला निर्मल ! आज तो कुठें असेल कुणास ठाऊक ? त्याची काय स्थिति झाली असेल कुणास ठाऊक ? माझ्या लग्नाची बातमी ऐकून तो हिंदुस्थानांतून निघून गेला. तो










इंटरकोलोनला गेला असेल आणि तेथील बर्फमय पर्वतांच्या सान्निध्यांत मला विसरण्याचा प्रयत्न करीत असेल. अरेरे, यावेळीं माझ्या शेजारच्या सीटवर तो बसलेला असता तर ... ! '

पुढील जागेवर बसलेल्या एका तरुणीचा आवाज आला,– ' चला, चावट कुठले ! ' आणि मग एक ओळखीचा आवाज– ' नाहीं. विश्वास ठेवा. मी अगदीं सभ्य गृहस्थ आहे. पण काय करूं, आपण फार सुंदर आहांत ! '

**: ४ :**

तिसऱ्या वेळीं पुन्हां एकदां मला आपल्या सृष्टीचा नाश करावा लागला. हे प्रियकर आणि प्रेयसी जाऊंद्यांत खड्ड्यांत ! एक क्षणभर ते दृष्टीआड झाले तर प्रेमाचा सरळ राजमार्ग सोडून जीवनाच्या वेड्यावांकड्या मार्गावरून भटकायला लागले. कदाचित् प्रेमालाच फार गरिबी किंवा फार श्रीमंती मानवत नसावी. या वेळीं मी माझ्या निर्मलला आणि आशेला मध्यमवर्गांत जन्म दिला. निर्मलला एका ऑफिसांत दीडशें रुपयावर कारकून बनविलें आणि आशेला फक्त मॅट्रिकपर्यंत शिक्षण दिलें.

यावेळीं निर्मल आणि आशा मुंबईतल्या एका चाळींत दुसऱ्या मजल्यावर रहात होते. सायंकाळीं निर्मल जेव्हां ऑफिसांतून दमूनभागून परत यायचा तेव्हां लांबूनच बाल्कनींत उभ्या राहिलेल्या आशेला पाहिल्यावर त्याची कळी खुलायची. आतां त्यानें संध्याकाळीं सिनेमाला जाणेंहि कमी करून टाकलें होतें. कारण पडद्यावर सिनेमांतल्या तारकांच्या पडछाया पहाण्यापेक्षां आशेचें खरें रूप पाहण्यांतच त्याला जास्त आनंद मिळत होता. त्यालाहि माहीत होतें कीं आशेचें आपल्यावर प्रेम आहे. ' नाहींतर ती नियमितपणें दररोज संध्याकाळीं आपण ऑफिसांतून परत यायच्यावेळींच आपल्या खोलीसमोर कां उभी रहाते ? ' निर्मलनें आपल्या खोलींत उभें राहून भिंतीकडे तोंड करून ' आज घरीं साखर शिल्लक नाहीं, चहा कसा प्यायचा ? ' असें म्हटल्यावर आशा आपल्या वडिलांना म्हणायची ' दादा, निर्मलरावांच्याकडे साखर शिल्लक नाहीं. एक कप चहा करून देऊं का त्यांना ? ' निर्मल तिच्या वडिलांना आवडत असे. ते लगेच म्हणत – ' हो, हो जरूर. मंजूला सांग, एक कप चहा घेऊन जा म्हणावं. ' आणि जेव्हां तिची धाकटी बहीण कप घेऊन जायला निघायची, तेव्हां आशा उगीचच ओरडून म्हणायची : ' अग मंजू ! सांभाळून जा. तूं कप पाडणार खालीं. थांब, दे माझ्याकडे ... ' आणि मग ती स्वतः कप घेऊन जायची आणि प्रत्येक वेळीं पहिला घोट घेतल्यावर निर्मल कोणत्यातरी सिनेमांतलें वाक्य हमखास म्हणायचा – ! ' चहा फार सुंदर झालाय, बुवा. तुम्हींच बनविलात वाटतं. '

आणि आशा लाजून निघून जायची आणि बहिणीला ओरडून सांगायची – ' निर्मलरावांनीं चहा घेतला असेल तर कप घेऊन ये. चहाबरोबर आमचा कपहि ठेवून घेतला नाहीं म्हणजे मिळविली ! '

मॅट्रिकची परीक्षा जवळ आली. एके दिवशीं तिच्या वडिलांनीं निर्मलला सांगितलें कीं आशेचा इतिहास आणि भूगोल थोडासा कच्चा आहे. ही संधि पाहिल्यावर निर्मल म्हणाला – ' इतिहास आणि भूगोल तर अगदींच सोपे विषय आहेत. तेच तर घेऊन मी बी. ए. झालों ना ! ' आतां आशेच्या वडिलांना म्हणावेंच लागलें, ' जर तुम्हाला फारसा त्रास होणार नसेल तर संध्याकाळीं तासभर आशेला शिकवा बरं कां. '

त्या दिवसापासून त्या दोघांना भेटायला आणि बोलायला एक बहाणा मिळाला. प्रथम – प्रथम शिकविण्याचे वेळीं आशेची आई अगर वडील हजर असायचे परंतु लवकरच हिंदुस्थानांतल्या खनिज संपत्तीनें आणि पानिपतच्या तीन लढायांच्या वर्णनानें त्या दोघांचाहि जीव नकोसा झाला. त्याशिवाय निर्मलची वागणूक आणि आचरण इतकें सभ्यपणाचें होतें कीं शिकवणाच्या वेळीं कोणी तरी तिसऱ्याच्या उपस्थितीची जरूरी नाहीं हें मान्य झालें होतें. त्यानंतर मग शहाजहान आणि मुमताजमहलच्या ऐतिहासिक प्रेमापेक्षां त्या दोघांच्या व्यक्तिगत आणि अनैतिहासिक प्रेमांतच जास्त गोडी वाटायला लागणें स्वाभाविकच होतें. हवापाण्याच्या गोष्टी बोलतां बोलतां दिलीपकुमार आणि कामिनी कौसलच्या नवीन सिनेमापर्यंत पोंचायच्या आणि बोलतां बोलतां नर्गीसच्या डोळ्यापेक्षांहि तिचे डोळे सुंदर असल्याची ग्वाही

गुरु शिष्येला द्यायचा !

मग एके दिवशीं मोठ्या धाडसानें निर्मलनें केंसांत गुंफायची मोतियाची वेणी आणली. "पांच रुपयांची नोट मोडायची होती. फूलवाला म्हणाला,– 'बाबूजी दोनचार आण्याचे हारगजरे घ्या. मग मोड देतों' मींहि विचार केला. तुझ्यासाठीं एक वेणीच घेऊन टाकावी. तुझ्या वेणीला ही फारच खुलून दिसेल" आणि आशा फुलांची वेणी आपल्या गालांना लावीत म्हणाली– 'किती मोहक वास आहे या फुलांना. रात्रभर सुगंध दरवळेल.' निर्मल कोणताहि एखादा सिनेमांतला संवाद आठवून म्हणाला नाहीं, सहज म्हणाला : –'आणि तुला माझी आठवण देतील.' आणि त्या दिवसांपासून निर्मलला पांच रुपयांची मोड करणें आणि चार आण्यांची वेणी खरेदी करणें दररोजचें काम झालें !

आशेच्या परीक्षेचा निकाल लागला. त्या दिवशीं आशेचे वडील निर्मलला म्हणाले–'तुमच्या कृपेमुळें आशा पास झाली बरं का ! आणि शिवाय दुसऱ्या वर्गांत ! आतां तिच्या विवाहाची चिंता लागली आहे. विचार करतो आहे – एखादा चांगला वर मिळाला तर...' आणि मग त्यांनीं चुटमळत म्हटलें– 'तुझा काय विचार आहे, निर्मल ? लग्नबिग्न करायचा विचार आहे कीं नाहीं ?' आणि जेव्हां निर्मल विचारांत पडला तेव्हां,–'तुला तर माहीत आहे कीं आशेच्या आईला आणि मला तूं अगदीं पसंत आहेस !'

निर्मल म्हणाला–'मी या रविवारी घरीं निघालों आहे. वडिलांना विचारून सोमवारीं तुम्हांला सांगेनच.'

आणि मला वाटलें कीं चला, यावेळीं तरी निदान निर्मल आणि आशेच्या प्रेमाची वेल मांडवावर चढणार असा रंग दिसतो आहे.

रविवारीं आपल्या गांवीं गेल्यावर निर्मलनें वडिलांना विचारलें. ते महिना पन्नास रुपये पगारावर एका शाळेंत शिकवीत होते. निर्मलचें म्हणणें ऐकल्यावर ते विचारांत पडले आणि नंतर म्हणाले,– 'बरं आहे. मी दोन दिवसांची रजा काढून मुंबईला येईन आणि मुलीच्या वडिलांशीं बोलेन.'

निर्मल मुंबईला परत आला, तर आशेनें होणाऱ्या भावी संबंधामुळें त्याच्याबरोबर बोलण्याचें आणि त्याच्यासमोर येण्याचें बंद केलें असल्याचें त्याला समजलें. बहुतेक तिच्या आईनें बंदी केली असावी ! परंतु या विरहामध्यें आणि अलगपणामध्यें किती गोडी होती, किती गोडवा होता ! कधीं कधीं चाळीच्या व्हरांड्यांत अचानक त्यांची गांठ पडलीच तर आशेचे गाल लाजेनें लाल होवून जात आणि ती लगेच पळत जावून आपल्या खोलीचा दरवाजा बंद करायची आणि मग फटीमधून निर्मलकडे पहायची ! आणि निर्मल ? तो तर आपले वडील येण्याची, लग्न ठरविण्याची आणि मग लग्न होण्याचीच वाट पहात होता. किती गोड असते ही प्रतीक्षा !

निर्मलचे वडील आले आणि आशेच्या घरच्या माणसांनीं त्यांचें अगत्यपूर्वक स्वागत केलें. इकडचें तिकडचें बोलणें झाल्यावर निर्मलच्या वडिलांनीं आपल्या मुलाला तेथून उठून जाण्यासाठीं खूण केली आणि दोघांच्या वडिलांमध्यें एकांतांत बोलणीं सुरू झालीं.

निर्मलच्या वडिलांनीं आशेच्या वडिलांना ते जावयाला हुंडा किती देणार आहेत त्याची चौकशी केली.

आशेच्या वडिलांनीं निःश्वास सोडून म्हटलें– 'हुंडा म्हणून दोनचार कपडे आणि लहानसहान दागिन्यांशिवाय आम्ही कांहींहि देवूं शकणार नाहीं.' मग त्यांनीं आपल्या आर्थिक परिस्थितीबद्दल सांगितलें. 'लहान दुकान, तेंहि या वाईट परिस्थितींत आणि त्यांत पुन्हां कंट्रोलच्या अडचणी. कशी तरी एवढ्या मोठ्या कुटुंबाची तोंडमिळवणी होते झालं.'

निर्मलचे वडील म्हणाले–, 'तर मग मला वाईट वाटतं. हा संबंध जुळणार नाहीं. माझीहि स्वतःची अशीच कांहींशी कठीण परिस्थिति आहे.'

आशा दरवाजाच्या पाठीमागें लपून ऐकत होती. तिचें हृदय धडधड करूं लागलें. 'आतां काय होणार ? पण नाहीं ! तिचा निर्मल नक्कीच ही प्रेमाची नाव दुसऱ्या तीराला नेईल. त्याच्या वडिलांप्रमाणें तो नक्कीच रुपयांची हाव धरणार नाहीं.'

आणि रात्रीं जेव्हां वडिल आणि मुलगा दोघे भेटले आणि निर्मलला आपल्या वडिलांचा निर्णय समजला, तेव्हां त्यानें खरंच आपल्या प्रेमाची बाजू घेतली. त्यानें आपल्या वडिलांना सरळ सरळ स्पष्ट शब्दांत सांगितलें– "आतां हुंड्यासारखे जुने रीतिरिवाज सोडून द्या आणि








रुपयांच्या नादीं लागून दोघांचें जीवन नष्ट करूं नका. आपण शांतारामचा ' दहेज ' सिनेमा पाहिला नाहीं वाटतं ? "

त्याच्या वडिलांनीं उत्तर दिलें – ' सिनेमा पाहण्यासाठीं माझ्यापाशीं वायफळ पैसे कुठे आहेत ? ' आणि मग आतांपर्यंत आपल्या मुलापासून लपवून ठेवलेली गोष्ट त्यांनीं सांगितली. त्यांनीं सावकाराकडून दोन हजार रुपयांचें कर्ज काढलें होतें आणि त्यांत व्याजाची भर पडून आतां जवळजवळ तीन हजार झाले होते. आणि हुंडा ज्या ठिकाणीं जास्त मिळेल त्या ठिकाणींच विवाह करायचा एवढाच कर्ज निवारण्याचा मार्ग होता. ' तूं बी. ए. झाला आहेस, चांगली नोकरी आहे. तीन हजार तरी मिळालेच पाहिजेत. '

' परंतु बाबा इतकें कर्ज काढलेंत तरी कशासाठीं ?'

आणि बापाला सांगावेंच लागलें – ' तुझ्याच शिक्षणासाठीं, निर्मल ! आणखी कशासाठीं ? नाहीं तर तूं बी. ए. कसा झाला असतास ? '

हें ऐकल्यावर निर्मलच्या प्रेमाची आग थंडगार झाली आणि तो म्हणाला – ' बाबा, क्षमा करा. पण मला कांहींच माहीत नव्हतें. '

पुढच्या आठवड्यांत निर्मलचें लग्न त्याच्या गांवातल्या सोनाराच्या मोठ्या आणि अशिक्षित मुलीबरोबर झालें. निर्मलनें विष खाल्लें नाहीं किंवा आशेनेंहि विष खाल्लें नाहीं. हुंड्यादाखल फक्त दीडहजार रुपये मिळाले. ते सावकाराला देण्यांत आले. परंतु बाकीची रक्कम आणि व्याज मिळून अजूनहि दोन हजार द्यायचे आहेत. आशेचें लग्न एका गरीब, मॅट्रिक पास झालेल्या तरुणाबरोबर झालें. तो पोस्ट ऑफिसांत पोस्टमन आहे आणि जागा नसल्यामुळें आशेच्या वडिलांच्याच घरीं घरजांवई म्हणून राहतो आहे. निर्मलनें दुसऱ्या एखाद्या चाळींत खोली मिळविण्यासाठीं लाख प्रयत्न केले. पण शेवटीं नाइलाज होऊन त्याला त्याच चाळींत आपल्या बायकोला घेवून यावें लागलें. आशा आणि निर्मलच्या पत्नीची चांगलीच मैत्री जमली आहे आणि जेव्हां पुरुष माणसं कामावर जातात तेव्हां दोघीहि गप्पागोष्टी करतात आणि आपल्या होणाऱ्या मुलांसाठीं लहान लहान कपडे शिवतात....

– आणि हें अगदीं अप्रिय दृश्य पाहिल्यावर मला पुन्हां आपली सृष्टि कल्पनेच्या तलवारीनें नष्ट करून टाकावी लागली !

: ५ :

आतां शेवटच्या वेळीं आशा आणि निर्मलला जन्म दिल्यावर मी त्यांना स्वैर सोडून दिलें. वाटलें तर प्रेम करा, नाहीं तर नाहीं ! मग मी त्यांना पार विसरून गेलों, आणि आपल्या कथांसाठीं दुसऱ्या पात्रांना निर्माण करण्यांत गुंग झालों.

मग कित्येक वर्षांनंतर मला एक म्हातारा आणि म्हातारी बाजारांत जातांना दिसली. माणसाच्या चेहऱ्यावर सुरकुत्या पडलेल्या होत्या आणि त्याची कंबर वाकलेली होती. स्त्रीचे केंस पांढरे झाले होते आणि तिचे हात जात्यावर दळल्यामुळें आणि मसाला कुटल्यामुळें खरखरीत आणि टणक झाले होते. ते दोघेहि बाजारांतून रेशन, भाजीपाला घेवून घरीं निघाले होते. त्यांचें रूप पार पालटलें होतें. दुसरा कोणी असतां तर त्यांना ओळखलेंच नसतें. पण मी त्यांना जन्म दिला. त्यांना कसा विसरेन ? म्हाताऱ्या निर्मलच्या हातांत एक पिशवी होती. त्यांत रेशनचे गहूं, तांदूळ आणि भाजीपाला होता. कांहींवेळ गेल्यावर म्हातारी आशा म्हणाली – ' द्या माझ्याकडे, तुम्ही थकला असाल ! '. असें म्हणून निर्मलच्या हातांतून तिनें पिशवी घेतली आणि जेव्हां त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें तेव्हां मी जन्मास घालतांना त्यांच्या डोळयांत ठेवलेली ती चमक दिसली.

म्हातारपणींसुद्धां त्यांचें प्रेम कमी झालें नव्हतें तर ? एका सत्य प्रेमकथेचा आदर्श 'क्लायमॅक्स' हाच होता ! परंतु संपूर्ण कथा कोणती होती ? ते भेटले कसे आणि त्यांचें प्रेम वाढीस लागलें कसें ? आणि कोणकोणत्या संकटांशीं, कठीण परिस्थितीशीं त्यांना चार हात करावे लागले ? त्यांच्या प्रेमाला किती परीक्षा द्याव्या लागल्या ?

ही सगळीं माहिती मिळविण्यासाठीं त्यांचा पाठलाग करीत गल्लीबोळांतून जातां जातां शेवटीं एका लहानशा घरापाशीं पोंहचलों. निर्मल आणि आशा घरांत शिरले नाहींत तोंच डझनभर मुलांनीं चीं-चीं-पीं-पीं करायला सुरुवात केली. मी दार खटखटावीत होतों तिकडे पुष्कळ वेळपर्यंत कुणीं लक्षच दिलें नाहीं.

जेव्हां मुलांची गडबड कमी झाली, तेव्हां मग म्हातारीनें कडी वाजल्याचा आवाज ऐकला – ' अरे,








अे, गोपाळ, मोहन, बाबू, कुणीतरी पहा बरं, दरवाज्यापाशीं कोण आहे तें !'

मुलांच्या फौजेनें मला मोडक्या बाजेपाशीं नेऊन सोडलें. त्यावर बसलेला निर्मल खोकत होता. आपल्या वय झालेल्या, बारीक डोळ्यांनीं माझ्याकडे निरखून पहात तो म्हणाला – 'बसा, चहा घेणार का ?'

म्हातारी आशा आपल्या नवऱ्यासमोर हुक्का ठेवीत म्हणाली – 'हो, न प्यायला काय झालंय. हे लोक तर दिवसांतून दहा-दहा बारा-बारा वेळां चहा पितात !'

'माझी आपणां दोघांनाहि कांहीं विचारायची इच्छा आहे' मीं म्हटलें.

'हं, विचारा ना.'

'आपलें लग्न होऊन किती वर्षें झालीं ?'

'काय राजाची आई, किती वर्षें झालीं ? मला तर जशी कांहीं कालचीच गोष्ट वाटते आहे.' म्हाताऱ्यानें तिच्याकडे पहात म्हटलें. तेव्हां चेहरा सुरकुतलेला असूनहि आशा लाजली.

'बा, तुम्हाला लाज कशी वाटत नाहीं ! दहा नातवंडें आहेत कीं तुम्हांला !'

मग म्हातारा म्हणाला – 'चाळीस एक वर्षें झालीं असतील. पण तुम्हांला एवढी आमच्या लग्नाच्या तारखेची कां चिंता लागली आहे ?'

मीच तुमचा जन्मदाता आहे म्हणून, असें सांगावेसें वाटत होतें.– परंतु मी एवढेंच म्हणालों– 'मी गोष्टी लिहीत असतों. म्हणून आपल्या जीवनाविषयीं कांहीं माहिति मिळाली तर पहावं अशी इच्छा होती.'

'खूं ! ... खूं ! खूं !' हुक्का गुडगुडत, खोकत आणि हंसत म्हातारा म्हणाला, 'आमचें हें कसलें जीवन ! जन्म घेतला, तरुण झालों, कष्ट केले मजुरी केली, लग्न केलें, मुलें झालीं. आतां तर मुलांनाहि मुलें झालीं आहेत. आतां फक्त मरायचेंच राहिलें आहे.'

'नाहीं – नाहीं ! – मला याची माहिती नको आहे. मला तुमच्या प्रेमाविषयीं ऐकायची इच्छा आहे. आपण आपल्या पत्नीला प्रथम कुठें भेटलात ? आपलें प्रेम कसें जमलें ?'

म्हातारीनें तर लाजेनें डोक्यावर पदर घेतला आणि म्हातारा रागानें गुडगुडी सोडून उभा राहिला : 'प्रेम ! ... प्रेम ! ...' तो खोकत खोकत ओरडला – 'ही कसली चेष्टा ? आमची चेष्टा करायला आलांत होय ... इथें सभ्य माणसें राहतात, माहिती आहे ?' असें म्हणून तो हुक्क्याची नळी घेऊन मला मारणारच होता, तेवढ्यांत मी पळालों – आणि अजूनहि पळतोंच आहे – म्हणूनच धांप लागली आहे. आपणच सांगा – प्रेमकथा लिहूं तरी कशी ?

---

## 'असा येथला चुके फकीर' !

फसव्या हास्याच्या या पोटीं<br>
ईर्ष्या फिरते संधि पहात<br>
उसन्या गांभीर्याच्या पोटीं<br>
चुराच सगळा भग्न मनांचा ...

मत्त पशूंच्या हौसेखातर<br>
पश्यापश्यानें बुद्धि विकावी<br>
गढूळ अंतर उजळुन घ्याया<br>
कवितेची मग कांस धरावी

वांझ दयेला भूक न दिसते<br>
भिल्लाघरच्या गोपाळांची<br>
तिथें प्रसवते वाल्मिकि-वाणी<br>
कामातुर ती क्रौंचकहाणी ...

दांभिकतेच्या घुमटीवरती<br>
मानवतेचें निशाण आहे<br>
बुद्धाघरचे फिरले वासे<br>
देव्हारा तरि तसाच आहे !

'असा येथला चुके फकीर'<br>
मशीद ना पण, नाहीं छाया<br>
घरटें बांधुन म्हणून फसवें<br>
घिरटत बसणें त्यांतच वांया !

— मधुकर जावडेकर










श्री. बी. के. मदन यांचे विचार. : संकलक – श्री. वा. ग. अळतेकर

# दुसरी पंचवार्षिक योजना : बेकारी व त्यावरील इलाज

दुसरी पंचवार्षिक योजना एक एप्रिल १९५६ पासून सुरू होणार आहे. या योजनेस आधारभूत समजला जाणारा प्रा. महालनोबीस यांचा प्रबंध, तसेंच त्यास पूरक असे आणखी दोन प्रबंध, दुसरी पंचवार्षिक योजना : हंगामी मसुदा, व दुसरी पंचवार्षिक योजना : मूलभूत विचार आणि अर्थशास्त्रज्ञांच्या समितीचे एक सदस्य प्रा. शेनॉय यांची भिन्न मतपत्रिका–इतकें अधिकृत वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे.

पहिल्या व दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंतील एक महत्त्वाचा फरक म्हणजे सामान्य जनतेला आतां योजनेची जाणीव झाली आहे. त्यामुळें योजनेविषयीं अपेक्षा निर्माण होणें स्वाभाविकच आहे. पहिल्या योजनेच्या दुपटीहून थोडी मोठ्या असलेल्या या दुसऱ्या योजनेचे प्रमुख उद्देश खालीलप्रमाणें आहेत :

( १ ) राष्ट्रीय उत्पन्न २५ टक्क्यांनीं वाढविणें.

( २ ) राष्ट्राच्या अर्थव्यवस्थेंत सामाजिक क्षेत्राची वाढ करून समाजवादी धर्तीची समाजरचना आणणें.

( ३ ) मूलभूत मोठ्या उद्योगधंद्यांची वाढ करून आर्थिक स्वयंपूर्णतेचा पाया तयार करणें.

( ४ ) उपभोग्य पदार्थांचें उत्पादन अधिकाधिक घरगुती धंद्यांनीं वाढविणें.

( ५ ) घरगुती धंद्यांशीं स्पर्धा न होईल अशा पद्धतीनें उपभोग्य पदार्थांचें यांत्रिक पद्धतीनें उत्पादन वाढविणें.

( ६ ) शक्य तितक्या लवकर, दहा वर्षांच्या आंत बेकारी नष्ट करणें.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या मसुद्यावर अनुकूल व प्रतिकूल असे बरेच लेख प्रसिद्ध झाले आहेत. केवळ रशियन तोंडावळ्याची योजना म्हणून योजनेकडे न पाहतां तिच्या उद्दिष्टांसंबंधीं अत्यंत बारकाईनें विचार करणें जरूर झालें आहे. अर्थशास्त्रज्ञांच्या समितीचे एक सदस्य व रिझर्व्ह बँक ऑफ इंडियाचे आर्थिक सल्लागार **श्री. बी. के. मदन** यांचा नुकताच रिझर्व्ह बँकेतर्फे दरमहा प्रसिद्ध होणाऱ्या पत्रिकेमध्यें योजनेच्या कांहीं उद्दिष्टांबद्दल विचार व्यक्त करणारा एक लेख सेप्टेंबरच्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे. त्यामध्यें व्यक्त केलेले विचार मननीय आहेत. त्यांतील कांहीं प्रमुख विचार सारांशरूपानें येथें मांडण्याचें योजिलें आहे.

दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या स्वरूपाची आंखणी ही लांबच्या काळांत साध्य होणाऱ्या उद्दिष्टांपेक्षांहि अल्पकाळांत साध्य होणाऱ्या उद्दिष्टांवरच अधिक अवलंबून आहे. असें असल्यानें तात्पुरतोत्र योजावयाच्या उपायांची दिशा ठरविण्याआधीं सद्यःपरिस्थितीचें अचूक निदान होणें अगत्याचें आहे.

दरवर्षी होणारी लोकसंख्येंतील वाढ व त्यामुळें रोजगारांच्या संख्येंतील होणारी वाढ, शहरी विभागांतील बेकारी, रहाणीचें अत्यंत निकृष्ट असें मान, रहाण्याच्या घरांची अपुरी सोय, शिक्षणाची व आरोग्याची असमाधानकारक व्यवस्था वगैरे गोष्टींचें योजनेच्या मसुद्यांत योग्य विवेचन केलें आहे. आणि त्यामुळें कोणत्या दिशेनें विकास करावयाचा याचें उपयुक्त मार्गदर्शन झालें आहे. परंतु बेकारीच्या स्वरूपाविषयीं केलेलें निदान आणि ती दूर करण्यासाठीं योजावयाचे मार्ग यांची चिकित्सा करण्यांत चूक झाली आहे.

प्रस्तुत आराखड्यांत बेकारीचा प्रश्न सोडविण्याची अखेरची मुदत दहा वर्षें ही आहे. – जोंपर्यंत बेकारी नष्ट होणार नाहीं अथवा आटोक्यांत येणार नाहीं तोंपर्यंत गिरण्या, कारखाने आणि हस्तव्यवसाय व घरगुती धंदे यांच्यांतील स्पर्धा टाळण्याचा जास्तींत जास्त प्रयत्न केला जाईल व त्यासाठीं हस्तव्यवसाय व छोटे उद्योगधंदे यांच्यांतील रोजगारीवर ज्यामुळें अनिष्ट परिणाम होईल अशी भांडवलाची गुंतवणूक उपभोग्य वस्तूंच्या कारखान्यांत करण्यास बंदी केली जाईल असेंहि आराखड्यांत म्हटलें आहे. एकदां सार्वत्रिक बेकारी नष्ट झाली कीं, स्वस्त वीज व छोटीं यंत्रें यांच्या साह्यानें छोट्या उद्योगधंद्यांतील दर माणशीं उत्पादन वाढविण्याकडे लक्ष दिलें जाईल. वरील उद्दिष्ट साधण्याकरितां दुसऱ्या पंचवार्षिक योजनेंत यंत्रतंत्रविषयक ( technological ) प्रगति बाजूला ठेवावी असें मसुद्यांत कांहीं ठिकाणीं म्हटलें आहे.

योजनाकारांनीं बेकारीचा प्रश्न सोडविण्यासाठीं सुचविलेले मार्ग व त्याचे होणारे परिणाम यांचा विचार करण्यापूर्वी आपल्या अर्थव्यवस्थेंतील बेकारीचें स्वरूप








पाहून त्याची चिकित्सा करणें आवश्यक आहे. बेकारी व अर्धबेकारी ही जितकी मोठी आहे तितकीच ती तांतडीचीहि आहे यांत संशय नाहीं. आपला आर्थिक विकास हा जेवढ्या तांतडीचा आहे, तेवढ्याच तांतडीचा बेकारीचा प्रश्न आहे. बेकारीचा प्रश्न हा अल्प मुदतींत सोडविला जाणारा प्रश्न नव्हे. औद्योगिक मंदी अथवा अवर्षणें यांनीं निर्माण होणारें तें अरिष्ट नाहीं. तेजीची लाट ओसरल्यावर बेकारीची झळ राजकीय दृष्ट्या जागृत अशा मध्यम वर्गाला अधिक जाणवली. आणि त्यामुळें बेकारीच्या प्रश्नाला महत्त्व प्राप्त झालें. बेकारी-संबंधींची अचूक माहिती उपलब्ध नाहीं. परंतु खरें म्हणजे हा रोग जुना, परंपराप्राप्त व मुरलेला असा आहे आणि देशाच्या अप्रगत आर्थिक अवस्थेंत त्याचें मूळ आहे. म्हणूनच आर्थिक प्रगतीच्या दीर्घकालीन कार्यक्रमाशीं सुसंगत अशीच त्यावरील उपाययोजना हवी. अशा तऱ्हेच्या कार्यक्रमांत यंत्र-तंत्रविषयक प्रगति हा एक अपरिहार्य भाग आहे. ती प्रगति थोपवून धरलीच पाहिजे असें खरोखरीं बेकारीच्या प्रश्नाचें स्वरूप नाहीं.

वस्तुतः भारताच्या अर्थव्यवस्थेंत रोजगारीचा प्रश्न हा सतत नजरेसमोर ठेवला पाहिजे आणि आपली प्रचंड मनुष्य-शक्ति ध्यानांत घेऊन मगच दीर्घकालीन आणि टिकाऊ असा आर्थिक विकासाचा कार्यक्रम आंखला पाहिजे. जोंपर्यंत आपल्या अर्थव्यवस्थेंतील बेकारीच्या समस्येचें गंभीर स्वरूप हें तात्पुरत्या कारणांनीं झालें आहे असें दाखवतां येत नाहीं, तोंपर्यंत अल्प काळांतील उपायांनीं हा प्रश्न समाधानकारकपणें सोडवला जाईल असें मानणें चुकीचें होईल. अर्थात् यामुळें हा प्रश्न कायम स्वरूपाचा आहे असें नाहीं. हा प्रश्न आपल्या अविकसित अर्थव्यवस्थेशींच निगडित आहे. अर्थव्यवस्थेचीच प्रगति होणें जरूरीचें आहे आणि तो कालावधीचा मार्ग आहे.

भांडवल कमी आणि माणसें जास्त अशी परिस्थिति असल्यानें ज्या उद्योगधंद्यांत कमी भांडवल लागून अधिक कामगार गुंतू शकतील अशा प्रकारचे उद्योगधंदे वाढविणें क्रमप्राप्त आहे. यामुळें आपल्या उत्पादनाच्या योजनेंत अल्प अथवा भांडवल न लागणारे लहान उद्योगधंदे, घरगुती धंदे आणि हस्तव्यवसाय यांना फार महत्त्वाचें स्थान आहे. उपलब्ध असलेल्या प्रचंड मनुष्यशक्तीचा अधिकांत अधिक वापर कसा करावा हा आपल्या विकासयोजनेपुढें एक प्रश्नच आहे. तसेंच विशिष्ट वातावरणांतील लोकांना पटतील, आवडतील अशा भांडवली वस्तूंचा पुरवठा करणें हेंहि एक महत्त्वाचें काम आहे. यामध्यें भांडवलांत वाढ करणें एवढेंच नव्हें तर भांडवलांत बचत करणाऱ्या पद्धतीचा वापर करणें हेंहि अभिप्रेत आहे. याकरितां ज्यामुळें चांगल्या मालाचें उत्पादन वाढेल अशा प्रकारची चांगली, तशीच विपुल यंत्र-सामुग्री उत्पादनांतील सुधारलेल्या पद्धति वगैरे गोष्टींना विशेष महत्त्व आहे. यंत्रतंत्रविषयक पद्धतीचा हा गाभाच आहे. या दृष्टीनें विचार करतां सरकारनें स्वतः पुढाकार घेऊन धीटपणें ग्रामोद्योगांचें व लहान लहान उद्योगधंद्यांचें पुनरुज्जीवन करणें अत्यंत महत्त्वाचें आहे. त्यासाठीं कच्चा माल, भांडवलपुरवठा, विक्रीची व्यवस्था, संशोधन, उत्पादनाच्या पद्धतीसंबंधीं सूचना वगैरे गोष्टींची तरतूद सरकारनें केली पाहिजे. आणि ग्रामीण विभागांत स्वस्त विजेचा पुरवठा करण्याचें कामास सरकारनें अग्रहक्क दिला पाहिजे. स्वस्त विजेचा पुरवठा व वहातुकीची सुलभ व्यवस्था या दोन गोष्टी आपल्या ग्रामोद्योगांचें भवितव्य ठरविण्याच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाच्या आहेत. लहान लहान यंत्रप्रधान उद्योगधंद्यांचा पुरस्कार करण्याच्या या धोरणामुळें हस्तोद्योगांना यापुढें आपल्या अर्थरचनेंत स्थान राहणार नाहीं अशांतला भाग नाहीं. ज्या क्षेत्रांमध्यें हस्तोद्योगांना सध्या यंत्रनिर्मित मालाशीं स्पर्धा करावी लागत नाहीं, आणि पुढेंहि बराच काल स्पर्धा करावी लागणार नाहीं अशा कांहीं महत्त्वाच्या व जुन्या उद्योगधंद्यांत हस्तोद्योगांना स्थान राहील.

मनुष्यानें आपल्या बुद्धीनें व कल्पनाशक्तीनें ज्या क्षेत्रांत हस्तोद्योगांपेक्षां अधिक चांगले व स्वस्त असें त्याच प्रकारच्या उत्पादनाचे मार्ग शोधले आहेत तेथें हस्तव्यवसाय करणाऱ्या कामगारास स्वस्त विजेची आणि लहान यंत्रांची जोड देऊन अधिक कार्यक्षम बनविलें पाहिजे. याशिवाय जवळची बाजारपेठ, कच्च्या मालाचा स्थानिक पुरवठा, कमी रहाणीचें मान, यामुळें तो मोठ्या उद्योगधंद्यांकडून होणाऱ्या वाढत्या स्पर्धेमध्यें टिकाव धरूं शकेल. कांहीं काळ त्यास आवश्यक वाटल्यास सरकारतर्फे प्रत्यक्ष मदत












अनुक्रमणिका

अथवा किंमतीबाबत सवलतहि देण्यांत यावी. परंतु एवढें खरें कीं यंत्रतंत्रविषयक तांत्रिक प्रगति रोखून विकेंद्रित उत्पादन यशस्वी ठरण्याची शक्यता फार थोडी आहे. शिवाय, आजच्या अणुयुगांत तंत्रविषयक प्रगतीकडे पाठ फिरवणें अनैतिहासिक होईल. दुसरें असें कीं, तांत्रिक पद्धति रोखून बेकारीचा प्रश्न सोडविण्यांत एक मोठी उणीव अशी आहे कीं, ज्या हस्तव्यवसायांतील उत्पादकांना संरक्षण मिळालें आहे ते कायमचेच अशा संरक्षणावर अवलंबून राहतील. आणि हा धोका खरा आहे.

उत्पादकांचें जर कायम स्वरूपाच्या पायावर पुनर्वसन करावयाचें असेल तर गिऱ्हाइकाच्या गरजा नजरेसमोर ठेवून कमी खर्चाच्या व सुधारलेल्या मालाचें उत्पादन त्यांचेकडून झालें पाहिजे याकडे लक्ष देणें आवश्यक आहे. असें झालें म्हणजे मालाची बाजारपेठ वाढेल. आपल्या देशांतील सर्वसामान्य जनतेची क्रयशक्ति फारच तुटपुंजी आहे. अधिक खर्चाचा माल खरेदी करण्यास जनता असमर्थ आहे. अशा परिस्थितींत अधिक खर्चाचें उत्पादन करणारांस तो वाढत्या स्पर्धेमध्यें टिकाव धरूं शकेल अशा प्रकारचें साहाय्य त्याच्या धंद्यास देणें हें संरक्षण देण्याहून अधिक हितावह आहे.

ज्या योजनेमध्यें बेकारी पुष्कळ प्रमाणांत कमी करतां येणार नाहीं ती योजना निरुपयोगीच आहे हें उघड आहे. परंतु रोजगारीच्या प्रश्नाला बेसुमार एकमेव महत्त्व देणें चुकीचें व घातकीपणाचें ठरेल. कमी विकास झालेल्या देशांतील बेकारीचें स्वरूप लक्षांत घेतां ही गोष्ट लक्षांत ठेवणें विशेष महत्त्वाचें आहे. कारण अपुऱ्या भांडवलामुळें रोजगारी उपलब्ध करून देणें अवघड होतें. बेकारीचा प्रश्न हा कांहींसा पूर्ण बेकारीचा परंतु फार मोठ्या प्रमाणांत अर्ध बेकारीचा-अपुऱ्या रोजगारीचा प्रश्न आहे. याचें कारण आपल्या सामाजिक व आर्थिक व्यवस्थेचें स्वरूप प्रामुख्यानें असें आहे कीं जींत लोक स्वतःच काम काढून ( self-employed ), त्यावर कशीबशी गुजराण करतात. प्रतिवर्षीं सुमारें २० लाखांनीं लोकसंख्या वाढत जाणार. म्हणजे सामान्यपणें तेवढ्याच संख्येनें मजुरांत वाढ होईल असें मानलें तर तें गैर ठरणार नाहीं. वस्तुतः तेवढे व त्याहूनहि लहान वयाचे लोक शेतींत अथवा इतर हस्तव्यवसायांत गुंतले जातात. अर्थात् त्यांना काम अपुरें असतें. कामांत वाढ नाहीं आणि संख्येंत मात्र वाढ – याचा परिणाम उपलब्ध रोजगारी अधिकाधिक लोकांत वाटली जाण्यांत म्हणजेच अपुरी रोजगारी वाढण्यांत. होतो. तेव्हां रोजगारीची संख्या वाढण्यापेक्षां रोजगारीची परिस्थिति सुधारणें हा तावडतोबीचा प्रश्न आहे. ज्यामुळें उत्पादन वाढेल, अशा तांत्रिक सुधारणांस उत्तेजन देऊनच हा प्रश्न सुटणार आहे. खर्चिक व अकार्यक्षम मार्गांनीं हा प्रश्न सुटणार नाहीं. विकेंद्रित औद्योगिक व्यवस्था व सतत सुधारलेल्या तांत्रिक मार्गाचा स्वीकार – हाच आपल्या भावी आर्थिक विकासाचा पाया असला पाहिजे. सहकारी तत्त्व आणि प्रादेशिक समतोल यांचा पाया या उत्पादनास लाभल्यास हा उपाय मोठ्या प्रमाणावर उपकारक ठरेल.

जगांतील आर्थिक इतिहासाची व प्रगतीची बारकाईनें पहाणी केल्यास आपणांस असें आढळून येईल कीं, अधिक व चांगलीं यंत्रें यांनीं उत्पादन, उत्पन्न व रहाणीचें मान वाढलें आहे आणि बेकारी कमी झाली आहे. ही गोष्ट लक्षांत घेतां जे कोणी सध्यां हस्तव्यवसायांत व घरगुती धंद्यांत गुंतले आहेत, त्यांना पुरेसें काम मिळेपर्यंत यांत्रिक पद्धतीनें उत्पादन वाढविण्याचें थोपवून धरावयाचें धोरण टाकून द्यावें. तांत्रिक बदलामुळें होणाऱ्या प्रगतीमुळें हस्तव्यवसायांत फार मोठ्या प्रमाणांत बेकारी निर्माण होईल असें नाहीं. जर आपल्या अर्थ-व्यवस्थेंतील इतर भागांत वाढ होत असेल तर वरील गोष्टीमुळें निर्माण झालेली बेकारी फार काळ टिकणार नाहीं.

बेकारीच्या प्रश्नाचें खरें स्वरूप वेळींच जनतेपुढें ठेवणें आवश्यक आहे. यामुळें जनतेस निष्कारण खोट्या अपेक्षा उराशीं बाळगून नंतर निराशा पदरीं घ्यावी लागणार नाहीं. राष्ट्रापुढें असणाऱ्या कोणत्याहि प्रश्नास तयार उत्तरें असत नाहींत. प्रश्नाचें स्वरूप, व्यापकता व गांभीर्य लक्षांत घेऊन योग्य दिशेनें पावलें टाकलीं पाहिजेत. अिच्छित ध्येय साधण्यासाठीं किती कालावधि लागेल याची स्थूलमानानें कल्पना सर्वसामान्य जनतेस लोकशाहींत देणें आवश्यक आहे.








# कै. आचार्य शं. द. जावडेकर : श्रद्धांजलि व विविध दर्शन

## शुद्धचित्त सत्यशोधक व तत्त्वचिंतक

आचार्य जावडेकरांच्या निधनामुळें देशाची, महाराष्ट्राची व विशेषतः माझी केवढी हानि झाली आहे तें शब्दांनीं सांगणें शक्य नाहीं. तें हृदयानेंच हृदय समजूं शकेल. माझ्या जीवनाच्या एका अत्यंत महत्त्वाच्या वेळीं शंकरराव कालवश व्हावेत ही खरोखरच फार दुःखद व दुर्दैवी घटना होय यांत संशय नाहीं. मानवी जीवन हें असेंच आहे. भूतकाल निघून गेलेला असतो, भविष्यकाल माहीत नसतो आणि वर्तमान-कालांत क्षणिक जीवनापलीकडे त्या जीवनाला कांहीं अर्थ नसतो. जावडेकरांच्या मृत्यूमुळें ‘ नवभारता’ची जी हानि झाली आहे तीहि भरून निघण्यासारखी नाहीं. ‘ नवभारत ’हि आज अशा स्थितींत आहे कीं ही हानि सहन करणें त्याला शक्य होईल कीं नाहीं याबद्दलहि संशय आहे.

सध्यांची माझी मनःस्थिति व बाहेरची परिस्थिति लक्षांत घेतां ‘ नवभारता ’साठीं शंकररावांच्यावर मोठा काय किंवा लहान काय लेख लिहिणें मला शक्य नाहीं. ता. ११ ला सकाळीं ६–६॥ च्या दरम्यान शंकररावांच्या मृत्यूची दुःखद वार्ता डॉ. लागूंनीं फोनवरून जेव्हां सांगितली तेव्हां माझ्या रोजनिशींत पुढील विचार म्हणा किंवा भावना म्हणा मीं नमूद करून ठेविली आहे: “ शंकरराव जावडेकरांच्या मृत्यूनें माझ्या जीवनाचा बौद्धिक व नैतिक आधार ढिला झाल्यासारखें झालें आहे. विवेकदीप मंदावला व पुढील जीवनयात्रा या मंद प्रकाशांत सरळ मुक्कामावर जाईल किंवा नाहीं याबद्दल मनांत एक प्रकारचा संशय व भय उत्पन्न झालें आहे. शंकररावांच्या गेल्या २५।३० वर्षांच्या निर्विकार, निरपेक्ष, प्रज्ञायुक्त स्नेहाला मी मुकलों आहे. शंकररावांसारखा शुद्ध-चित्त सत्यशोधक व तत्त्वचिंतक ‘ मनुष्याणाम् सहस्रेषु ’ – ! ”. या घटकेला यापेक्षां अधिक शंकररावांच्याबद्दल स्वतःला व जगाला मला अधिक कांहीं सांगावयाचें नाहीं. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेंत आचार्य भागवत यांनीं म्हटल्याप्रमाणें ‘संसारांत राहून संसाराबद्दलची अलिप्तता ’ याचें शंकरराव हें उत्तम उदाहरण होतें.

— शंकरराव देव








# महाराष्ट्राचा मार्गदर्शक गेला !

आचार्य जावडेकरांची प्रकृति गेल्या वर्षी इतकी चांगली झाली होती कीं ते पुण्यांस आले असतां एरंडवण्याच्या डोंगरावर चढून जाऊं लागले होते. यामुळें इतक्या लौकर त्यांचा देह काळाच्या तोंडांत पडेल असें मला वाटलें नव्हतें. तथापि या वर्षी गणेशोत्सवाचे सुमारास आचार्यांना ३-४ दिवस न्युमोनियाचा ताप आला व त्यानें हृदयावरहि बराच परिणाम होऊन त्यांना अत्यंत क्षीणता आली. अधिक उपचारासाठीं त्यांना ता. ३० नोव्हेंबर रोजीं पुण्यांत आणण्यांत आलें. पण पुण्यांत आणल्यावर त्यांना पुनः न्युमोनियाचा ताप आला व आधुनिक सर्व उपचार करून देखील त्यांना बरें वाटलें नाहीं. पुण्यांत आणल्यावरहि डॉक्टर-मंडळींना प्रथम कांहीं दिवस आशा वाटत होती पण ती देखील पुढें नाहींशी झाली. आणि आचार्य महाराष्ट्राला कायमचे अंतरले !

आचार्य जावडेकर हे स्वभावानें चिंतनशील वृत्तीचे पुरुष होते. वैचारिक विश्वांत ते सदैव विहार करीत असत. भारतीय स्वातंत्र्याच्या राजकारणाचा त्यांना मुख्य ध्यास होता. तथापि त्यांच्या विचाराची बैठक अत्यंत व्यापक होती. जीवनाचा भौतिक आणि आध्यात्मिक, बौद्धिक आणि भावनात्मक अशा विविध बाजूंनीं ते नेहमीं विचार करीत असत. आदर्श आणि व्यवहार यांचा एकत्रित संबंध शोधण्याची त्यांची विशेष प्रवृत्ति होती. त्यांचें अध्ययनहि अशाच प्रकारचें व्यापक आणि विविध-अंगी असे. लोकमान्य टिळकांच्या 'गीतारहस्या'नें महाराष्ट्रांत ग्रंथलेखनाचा एक नवा आदर्श निर्माण केला. नीतिशास्त्र, समाजशास्त्र अित्यादि शास्त्रांच्या विचारांत भारतीय व यूरोपीय दृष्टींचा तुलनात्मक विचार करावयाचा ही 'गीतारहस्या'ची खास दृष्टि दिसते. शंकरराव जावडकरांनीं आपल्या राजकारणावरील पहिल्याच पुस्तकांत 'गीतारहस्या'च्या या दृष्टीचा बुद्ध्याच स्वीकार केलेला आढळतो. त्यांच्या 'राजनीतिशास्त्रपरिचयां'त राजकारणांतील महत्त्वाच्या सर्व विभागांचा विचार तुलनात्मक पद्धतीनें करण्यांत आलेला आहे. वैदिक विचारापासून समाजवादाच्या विचारापर्यंत या पुस्तकांत व्यापक ऊहापोह आढळतो. रानडे–राजवाडे, आगरकर–टिळक यांच्या विरोधी विचारांचा परामर्श घेण्याची प्रथा पुढें टिळक–गांधी, गांधी–जवाहरलाल यांच्या विचारांच्या चिकित्सेंतहि दिसून येते. पाश्चात्त्य विचारप्रवाहांचें भारतीय विचारप्रवाहांशीं आढळून येणारें साम्य शोधून काढणें व तुलनात्मक रीतीनें दोन्ही विचारधारांचें समीक्षण करणें हें आचार्य जावडेकरांच्या बुद्धीचें आवडतें काम असे. या त्यांच्या सर्व विचारांचें परिपक्व स्वरूप 'आधुनिक भारत' या त्यांच्या सर्वश्रेष्ठ ग्रंथांत पाहावयास सांपडतें. राजकारण, अर्थशास्त्र, समाजशास्त्र, नीतिशास्त्र आणि अध्यात्मशास्त्र या सर्व शास्त्रांचा परस्परसंबंध जाणून ते आपले विचार मांडीत असत. यामुळें त्यांच्या कोणत्याहि लिखाणांत मौलिक विचार पाहावयास सांपडतात. कोणत्याहि व्यक्तीच्या वा विचाराच्या अेकांगीपणानें आहारीं गेल्याचें दृश्य त्यांच्या जीवनांत कधीं दिसलें नाहीं. इतका स्थिरबुद्धीचा विचारक लोकमान्य टिळकांनंतर महाराष्ट्रांत दुसरा आढळत नाहीं. कै. वामन मल्हार जोशी यांनीं म्हटल्याप्रमाणें 'आधुनिक भारत' हा 'गीतारहस्या' नंतरचा महाराष्ट्रांतील मोठा ग्रंथ आहे असें निःसंशय म्हणतां येईल. 'गीतारहस्या'नें सामाजिक विचाराचें सूत्र जेथपर्यंत आणून ठेविलें, तेथून तें आधुनिक काळांतील जीवन-विचारांच्या अद्यतन पातळीपर्यंत खेंचून नेण्याचें काम जावडेकरांच्या ग्रंथांनीं केलें आहे. महाराष्ट्राच्या दृष्टीनें आचार्य जावडेकरांचें हें कार्य अत्यंत मोलाचें झालें आहे असेंच भावी इतिहासकार लिहितील.

पहिल्या महायुद्धानंतर विचारांचीं सर्वच सूत्रें तुटून गेलीं आहेत. दुसऱ्या महायुद्धानें परिस्थिति अधिकच बिघडविली आहे. अशा बौद्धिक व्यामोहाच्या काळांत आचार्य जावडेकरांनीं महाराष्ट्राला जीवनविषयक सम्यक् दृष्टि देण्याचें काम जवळ जवळ दोन तपें केलें. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांना ज्या सर्वत्र श्रद्धांजली अर्पिल्या जात आहेत त्यांच्याकडे पाहिलें म्हणजे जावडेकरांचें महाराष्ट्र-जीवनांतील वैचारिक स्थान स्पष्ट झाल्याशिवाय राहात नाहीं.

आचार्य जावडेकर संपन्न स्थितींत जन्माला आले व वाढले अशा प्रकारची एक समजूत कित्येक ठिकाणीं प्रकाशित झालेली पाहिली. मला जावडेकरांच्या जीवनाची कित्येक वर्षें अगदीं जवळून माहिती असल्यामुळें वरील समजूत चुकीची आहे असें मला म्हणावेंसें वाटतें. आचार्य जावडेकर यांना आयुष्यांत केव्हांहि








अनुक्रमणिका

दारिद्र्याची झळ लागली नाहीं एवढेंच म्हणतां येईल. त्यांची आर्थिक स्थिति केव्हांहि संपन्नतेची नव्हती. त्यांचे वडील आपल्या मृत्यूपर्यंत चरितार्थासाठीं कष्ट करीत असलेले मीं पाहिले आहेत. शंकररावांनाहि अखेरपर्यंत कांहीं ना कांहीं मिळवावें लागत असे.' बेचाळीसच्या चळवळींत आणि नंतरहि कांहीं दिवस त्यांच्या पत्नी श्री. सुशीलाबाई इस्लामपूर येथील हायस्कूलमध्यें शिक्षिकेचें काम करीत असत. जावडेकरांच्या वडिलांचा परिवार बराच मोठा होता व त्यामुळें त्यांना खूप तोशीस लागत असे. तथापि जावडेकरांचें सबंच कुटुंब स्वावलंबी, स्वाभिमानी आणि समाधानी असल्यामुळें त्यांच्या घरीं कधीं दैन्य आढळलें नाहीं. आर्थिक सुस्थितीपेक्षां सांस्कृतिक संस्कार हेच जावडेकरांच्या घरांतील प्रसन्नतेला कारणीभूत झालेले होते. स्वतः शंकररावांनीं कधींच संसारविषयक चिंता केली नाहीं. त्यांची वृत्ति आशावादी असे. त्यांच्या गरजा अगदीं थोड्या असत. यामुळें त्यांचा सारा संसार सुखासमाधानाचा झाला. दारिद्र्य आणि दैन्य त्यांच्या मागें हात धुवून लागलें नाहीं एवढ्या अर्थानें त्यांना भाग्यवान् देखील म्हणतां येईल. त्यांच्या पत्नी अत्यंत अनुरूप अशा निघाल्या. त्यामुळें त्यांचें कौटुंबिक भाग्य उजळून दिसलें.

आचार्य जावडेकर हे केवळ एक रूक्ष तत्त्वज्ञ होते, त्यांचे अंगीं रसिकता नव्हती, त्यांना साहित्यादिकांचा परिचय नव्हता अशी आणखी एक गैरसमजूत प्रकाशांत आली आहे. जावडेकरांचें लिखाण साहित्यिक शैलीनें ढंगदार बनलेलें नाहीं एवढ्याचमुळें हा गैरसमज निर्माण झालेला असावा. शास्त्रीय लिखाण सरळ, तर्कशुद्ध व खणखणीत असावें असा लोकमान्य टिळकांप्रमाणेंच आचार्य जावडेकरांचा बाणा होता. तथापि साहित्याची रसिकता जावडेकरांचे अंगीं भरपूर होती. त्यांनीं शेक्सपियर, मिल्टन, शेली, बायरन, कीट्स, वर्ड्स्वर्थ इत्यादिकांचें साहित्य तरुणपणीं पुष्कळ वाचलें होतें. शॉ, गाल्सवार्दी, इब्सेन इत्यादि आधुनिक नाटककारांचीं बहुतेक नाटकें त्यांनीं आवडीनें अभ्यासिलेलीं होतीं. कालिदास, भवभूति इत्यादि संस्कृत सूरींचें रससाहित्य त्यांनीं चांगलें अभ्यासिलें होतें. मराठी संतांचा त्यांचा व्यासंग केवळ तत्त्वज्ञानापुरताच नव्हता. आधुनिक मराठी साहित्य त्यांनीं बहुतेक पाहिलेलें होतें. केशवसुत, गडकरी, विनायक, बालकवि, टिळक, तांबे, माधव ज्यूलियन, गिरीश, यशवंत इत्यादि सर्व प्रमुख आधुनिक कवींचीं पुस्तकें त्यांनीं वाचलीं होतीं. आधुनिक कवींचें काव्यहि ते पाहात असत. विंदा करंदीकर, मंगेश पाडगांवकर, वसंत बापट इत्यादि नवकवींच्या काव्याशीं त्यांचा परिचय होता. साहित्याचें आणि काव्याचें प्रयोजन काय असावें याविषयीं त्यांनीं पुष्कळ सूक्ष्म विचार केला होता. त्यांचा विशेष भर सामाजिक शास्त्रांवर असल्यामुळें व प्रकृतीनें तें मुख्यतः विमर्शशील असल्यामुळें त्यांचा साहित्याचा व्यासंग विशेष दिसून येत नसे इतकेंच. त्यांच्याजवळ जाऊन गप्पागोष्टी करणारांना त्यांच्यांतील रसिकतेचा प्रत्यय झाल्याविना राहात नसे. प्राध्यापक प्रधान यांचा ताजा अनुभव अशीच साक्ष देईल.

भारतीय विचारपद्धतींतील चार आश्रमांचा विचार आचार्य जावडेकरांना फार पसंत असे. ते स्वतः गृहस्थ असले तरी देखील अत्यंत अलिप्ततेनें वागत असत. त्यांच्या विचारांत आणि आचारांत विशेष प्रकारची सुसंगतता आढळून येई. संपत्तीचा, सत्तेचा अथवा कीर्तीचा त्यांना कधींहि लोभ झाला नाहीं. राजकीय नेतृत्व करण्याची त्यांनीं कधीं आकांक्षा बाळगली नाहीं. राजकीय नेत्यांनाहि मार्गदर्शन करण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे असा त्यांना आत्मविश्वास होता. तथापि याहि बाबतींत त्यांचेजवळ कधीं अहंकार आढळला नाहीं. यामुळें त्यांच्याबद्दल सर्व पक्षांच्या मंडळींत आदरभाव वसत असे. खासगी संभाषणांत देखील ते कधीं कोणाची व्यक्तिगत निंदा वा कुचाळी करितांना कोणाला आढळले नाहींत. अंतर्बाह्य शुचिता हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा फार मोठा विशेष होता.

महाराष्ट्राच्या भवितव्याबद्दल त्यांना सदैव आशा वाटत असे. सध्यांच्या महाराष्ट्राच्या विपत्कालांत आचार्य जावडेकरांचें मार्गदर्शन कांहीं वर्षें तरी लाभलें असतें तर तें महाराष्ट्राला उपकारक झालें असतें. मृत्यूनें महाराष्ट्राचें ऐन वेळीं मोठें नुकसान केलें आहे. तथापि विचार अमर असतात. माणसाचें विचारांच्या जिवंतपणावर मृत्यूची सत्ता चालूं शकत नाहीं. हें रहस्य ध्यानीं आणून महाराष्ट्रानें आचार्य जावडेकरांच्या दुःखद निधनाचा आघात शांतपणें सोसला पाहिजे.

—आचार्य स. ज. भागवत








# 'आधुनिक भारत'-काराची योग्यता

शंकररावांची व माझी भेट झाली ती कै. वासुदेवराव मुंडले यांच्यामुळें आणि त्यांच्याच घरीं इस्लामपुरास. त्या वेळीं जावडेकर एम्. ए. चा अभ्यास करीत होते. कै. वासुदेवरावांचा व माझा राजवाड्यांच्यामुळें स्नेह जुळला; तो आमरण टिकला. मुंडले हे 'प्रतोद'चे संपादक म्हणून राजद्रोहाची शिक्षा भोगून आले ते व्याधिदुर्बळ होऊन पेठ-इस्लामपुर येथेंच राहूं लागले. जावडेकरांची व त्यांची रोजची बैठक असे. मुंडले या वेळीं 'ब्राह्मणपत्रिका' नांवाची पत्रिका काढीत आणि सातारा जिल्ह्यांत ब्राह्मण-ब्राह्मणेतरवादानें जो क्षोभ माजला होता, त्यांत ब्राह्मणांची बाजू तत्परतेनें मांडीत. पण पुढें त्यांची विचाराची सर्व बैठकच बदलली; ते मार्क्सवादी बनले. असा त्या काळीं पुष्कळच विचारसंघर्ष महाराष्ट्रांत उसळून चालू होता. या संघर्षांत जावडेकरांच्या मनःपिंडांचें पोषण झालें.

जावडेकरांनीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला; पण तो केवळ पाश्चात्य तत्त्वज्ञानापुरता मर्यादित नव्हता. पौर्वात्य तत्त्वज्ञानहि त्यांनीं अभ्यासिलें होतें. तसेंच, महाराष्ट्रीय संतवाङ्मयाचाहि त्यांनीं अभ्यास केला होता. यामुळें त्यांची दृष्टि विवेचक आणि चौरस बनली. पुढें गांधींनीं या देशांत एक नवी राजकारणी विचारसरणि आणि एक अभूतपूर्व आंदोलन सुरूं केलें. त्यानें विशेष आकर्षिलें जाऊन जावडेकर यांनीं राजकारणाचाहि अभ्यास वाढविला. त्यांचा पिंडच व्यासंगी होता.

चळवळींचें महत्त्व ते ओळखीत. पण चळवळीमागील विचारांची तात्त्विक बैठक सखोल चिंतन-मननादिकांच्या आश्रयानें चांगली भक्कम व बळकट केल्याशिवाय कधींच काम होणार नाहीं हें मर्म जावडेकरांच्या मनांत उत्कृष्टपणें ठसलें असल्यामुळें त्यांनीं दृढ निष्ठेनें अभ्यास केला. श्रीभगवद्गीतेंत म्हटलेंच आहे: 'अभ्यासेन तु कौंतेय वैराग्येण च गृह्यते।' अभ्यासाकडे त्यांनीं आपलें सारें मन लाविलें आणि इतर गोष्टींचा फार लळा लावून घेतला नाहीं. प्रपंच टाकला नाहीं पण त्यांत ते गुरफटून गेले नाहींत. हेंच वैराग्य होय. सत्ता, धन इत्यादिकांचा मोह त्यांनीं आपणांस बाधूं दिला नाहीं.

अभ्यास आणि मनन यांच्या भट्टींत परिपक्व झालेले विचार त्यांनीं अत्यंत सुबोध व विवेचक शैलीनें लोकांपुढें मांडले. त्यांची मांडणी सोज्वळ असे. तींत युक्तिवाद भरलेला असे. आपल्या अनुपम प्रतिपादनशैलीनें जावडेकरांनीं महाराष्ट्रांतील गांधीवादाला तात्त्विक बैठक पुरविली. गांधीवादाच्या पुढें जाऊन समाजवादाचा जोर वाढला तेव्हां मार्क्सवादी विचारसरणीची छाननी करून समाजवादाचें समर्थन व विवरण जावडेकरांनीं पूर्वींच्याच प्रतिष्ठेनें केलें. परंतु समन्वयाच्या सांच्यांत दोन्ही वाद त्यांनीं आपल्या विशिष्ट पद्धतीनें बसविले. कारण मूळ पाया भारतीय संस्कृतीला धरून रचला पाहिजे हा त्यांचा कटाक्ष. ते केवळ भौतिक किंवा जडवादी नव्हते.

जावडेकरांचें '**आधुनिक भारत**' हा त्यांच्या विशुद्ध प्रतिपादनाचा नामांकित नमुना आहे. भारतसरकारनें नेमलेल्या स्वातंत्र्येतिहास-संपादकमंडळासमोर असा एक विचार माझ्या समक्षतेंतच आला कीं 'हा स्वातंत्र्यप्राप्तीचा इतिहास एक खंडांत लिहून तयार करावा; मोठाले ग्रंथ कोणी वाचणार नाहीं, पण जगाला भारतानें स्वातंत्र्य कसें मिळविलें हें जाणण्याची फार उत्कंठा आहे.' तेव्हां मी म्हटलें : "असें असेल तर आमच्या मराठींत असा एकखंडात्मक परामर्ष एका विद्वानानें फार मननपूर्वक घेतलेला प्रसिद्ध आहे." असें म्हणून जावडेकरांच्या '**आधुनिक भारता**'चा मीं उल्लेख केला. पुढें जावडेकरांच्याच पाठीस लागून या त्यांच्या ग्रंथाचें इंग्रजी सार त्यांच्याकडूनच तयार करवून भारत-सरकारांत दाखल केलें. आमच्या संपादकमंडळांत त्याची फार वाखाणणी झाली. यावरून जावडेकरांच्या लिखाणाची योग्यता सहज कळून येईल.

राजकारणाच्या गप्पा आणि सैल बोलणें-लिहिणें आपल्याकडे रोज आणि वारेमाप चालतें. परंतु बांधेसूद, साधार, मननपूर्वक केलेलें लिहिणें-बोलणें विरळ आढळतें. या विरळ कोटींत जावडेकरांचें लिखाण निःशंकपणें बसतें. भोंवतीं भावनांचें नर्तन चंडप्रचंड चालू असतां इतक्या संयमानें विचाराची वाट दाखविण्याचें कार्य निरलसपणें करणारे शंकरराव यांची उणीव भरून निघणें कठिण पडेल. ज्या तरुण मंडळींनीं जावडेकरांच्या पायाशीं बसून त्यांच्या विचारधनाची मनसोक्त लूट केली त्यांच्यापैकीं कोणी जर हा जावडेकरी वारसा बेमालूमपणें पुढें चालवील तर जावडेकरांनाच— ते असतील तेथें— काय, सर्व विचारवंतांना फार समाधान लाभेल.

— म. म. दत्तो वामन पोतदार










अनुक्रमणिका

# ध्येयवादी विचारवंत

गेल्या पसतीस वर्षांतील महाराष्ट्राच्या राजकारणांत वैचारिक मार्गदर्शन प्रामुख्यानें करणारी व्यक्ति म्हणजे कै. **शंकरराव जावडेकर** होत. त्यांचा मनःपिंड मननात्मक होता, वृत्ति सत्त्वस्थ होती व निष्ठा राष्ट्रीय होती. त्यांचा समन्वयाचा शोध करणारा दृष्टिकोण असल्यामुळें व चित्ताचा अध्यात्माकडे ओढा असल्यामुळें ते अजातशत्रु बनले. गांधीवादी युगांत म. गांधींना अनुसरणारे, वरच्या दर्जाचे लेखक, वक्ते व कार्यकर्ते महाराष्ट्रांत अनेक निर्माण झाले. गांधींच्या सत्य-अहिंसेचा वाणी व लेखणीनें सतत पुरस्कार व जयजयकार करणारे नामवंत साहित्यिकहि झाले. त्यांच्या वाणीनें व लेखणीनें हिंसाहि क्वचित् प्रसंगीं केलेली आढळते. परंतु त्यांत कै. जावडेकर हे अपवाद होत. त्यांच्या लेखणीनें अहिंसेचें सार्वभौम महाव्रत निरपवादपणें पाळलें. ते अनेक दैनिकांचे, साप्ताहिकांचे व मासिकांचे बहुत वर्षे संपादक म्हणून राहिले. परंतु कठोर वा हिंसक वा मर्मच्छेदक वा निंदक शब्द त्यांच्या लेखणीला स्पर्श करण्यास कधींहि धजला नाहीं. या दृष्टीनें विचार करतां असें म्हणावें लागतें कीं, ते जन्मतःच दग्ध–किल्बिष होते. महाराष्ट्राच्या बुद्धिक्षेत्रांत शुद्ध विचारांची वृष्टि सतत करीत राहून जावडेकर यांनीं आपल्या वाङ्मय-तपाची समाप्ति केली. त्यांच्या निधनामुळें महाराष्ट्राच्या दैवी संपत्तींतील एक थोर रत्न हरपलें !

त्यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास असहकारितेच्या चळवळीपासून प्रारंभ झाला. त्यांनीं गांधींच्या राजकीय चळवळींत कारावासहि भोगला. १९३० सालीं ६ महिने, १९३२–३३ सालीं पावणेदोन वर्षे आणि, ४२ सालच्या लढ्यांत २॥ वर्षे कारागृहांत त्यांनीं काढलीं. परंतु प्रथमपासून अखेरपर्यंत शिक्षक याच नात्यानें लोक-शिक्षणाचें कार्य त्यांनीं केलें. काँग्रेसच्या व समाजवादाच्या चळवळींत शेंकडों लहानमोठ्या कार्यकर्त्यांना त्यांनीं वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून दिलें. महाराष्ट्रांतील विद्यमान राजकीय कार्यकर्त्यांचे गुरु असा जर त्यांचा निर्देश केला तर ही गोष्ट वस्तुस्थितीचीच निदर्शक ठरेल. प्रजासमाजवादी पक्षाचे नेते जावडेकरांना स्वतःच्या पक्षाचे वैचारिक प्रवक्ते म्हणून मोठा मान देतात.

जावडेकर हे स्वतंत्र प्रज्ञेचे गृहस्थ होते. त्यामुळें त्यांनीं कोणत्याहि एका विचारसरणीच्या संप्रदायास चिकटून न बसतां स्वतंत्र विचार करून स्वतःचे असे तात्त्विक निष्कर्ष काढले. या बाबतींतली त्यांची कामगिरी नितान्त वैशिष्ट्यपूर्ण आहे. टिळकांचा राष्ट्रवाद, गांधींचा सर्वोदयवाद, आणि कार्ल मार्क्सचा समाजवाद या तिन्ही विचारप्रवाहांचें त्यांनीं खोल अवगाहन केलें. आणि एका मोठ्या समन्वयाच्या सिद्धांतावर येऊन ते स्थिरावले होते. गेल्या ५० वर्षांतील मोठमोठ्या विचारसंप्रदायांचा पुनः आढावा घेण्याची आतां वेळ आली आहे. कोणतीहि रूढ विचारसरणी आतां तपासलीच पाहिजे, असा इषारा देणारा हा संधिकाल आहे. या संधिकालाचा साद जावडेकरांच्या विचारसरणींत ऐकूं येतो. महाराष्ट्रामध्यें १९२० ते १९३७ सालापर्यंत टिळकसंप्रदाय व गांधीसंप्रदाय यांच्यांतील वैचारिक विग्रह महाराष्ट्रांत सुरू होता. या वैचारिक विग्रहांत जावडेकर हे गांधीसंप्रदायांत उभे राहिलेले दिसत होते. हें जरी खरें असलें तरी, जावडेकर हे वैचारिक भूमिकेवरून निक्षून व बजावून सांगत होते कीं, टिळकांच्या राजकारणाचा खराखुरा वारसा हा गांधींच्याच वांट्यास आला आहे, टिळकांच्या जीवनाचें साफल्य गांधींच्या राजकारणांतच उजळून दिसेल. टिळकांच्या राजकारणाचाच वारसा गांधींच्याकडे गेला आहे असें नव्हे, तर टिळकांच्या अध्यात्माची व कर्मयोगाचीहि दौलत गांधीवादच संभाळून वाढवीत आहे, असा निर्वाळा मोठ्या हिंमतीनें ते देत असत. त्यांची ही हिंमत



अनुक्रमणिका








म्हणजेच त्यांचें विचारस्वातंत्र्य होय. गांधींचा यति-धर्म हा श्रेष्ठ कर्मयोगच आहे; त्याचीच समाज-वादाशीं सांगड घातली म्हणजे जें अध्यात्मदर्शन उत्पन्न होतें तेंच नव्या युगाचें तत्त्वज्ञान होय; गांधींच्या अध्यात्माशीं किंवा सत्याग्रहाशीं समन्वित पावलेला समाजवाद हाच शांतिमय विश्वक्रांति निर्माण करील– अशी जावडेकरांची श्रद्धा होती. गांधी व कार्ल मार्क्स यांचा समन्वयच नव्या युगास आवश्यक असलेली क्रांति घडविण्यास समर्थ आहे, अशा निर्णयाप्रत ते पोंचले होते. त्यांचीं या संबंधा-चीं पुष्कळ विवेचनें आजपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत. अर्थशास्त्र, समाजशास्त्र किंवा मानवी विज्ञान या संबंधाचीं प्रमाणें किंवा पुरावे यांची न्यूनता जरी त्यांत अनेक ठिकाणीं भासत असली तरी त्यांतील समन्वयाचें दर्शन सखोल व सूक्ष्म होतें, ही गोष्ट पटल्याशिवाय राहात नाहीं.

साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून भाषण करतांना त्यांनीं आधुनिक वाङ्मयाचा मानदंड म्हणून किंवा मूल्यमापक म्हणून एक नवा रस दाखवून दिला; तो म्हणजे क्रांतिरस होय. साहित्य-समीक्षकां-नीं त्या रसाची उपेक्षा केली. परंतु क्रांतिरसाची कल्पना हें जावडेकरांच्या सूक्ष्म संवेदनाशील अशा नवसाहित्यविषयक सहृदयतेचें प्रमाण आहे. साहित्याची सामाजिक समीक्षा ही गोष्ट आधुनिक समीक्षाशास्त्रांतील अत्यंत महत्त्वास पोचलेली शाखा आहे. क्रांतिरस ही कल्पना आचार्य जावडेकर यांनीं सामाजिक समीक्षेस दिलेली एक अप्रतिम देणगी आहे. मनुष्यजातीच्या आधुनिक सामाजिक इतिहासाचें साहित्यांत जर प्रतिबिंब पहावयाचें झालें, तर तें प्रतिबिंब ' क्रांतिरस ' या कल्पनेनें अधिक उज्ज्वल स्वरूपांत दिसतें. या क्रांतिरसांत परिणत पावणारें वाङ्मयच पुरोगामी अस्सल वाङ्मय होय, असा निर्णय जावडेकरांच्या प्रतिपादनांतून निघतो.

जावडेकरांचें वैचारिक वाङ्मय–विशेषतः त्यांचा ' आधुनिक भारत ', ' राजनीतिशास्त्र-परिचय ' आणि त्यांची ' राज्यशास्त्रमीमांसा ' हीं मराठी भाषेंत चिरंतन ठरतील. आधुनिक भारताची त्यांनीं केलेली मीमांसा शास्त्रीय इतिहासाचें नमुनेदार उदा-हरण होय. या विषयावर इतका सुंदर ग्रंथ दुसरा कोणताहि नाहीं. राष्ट्रीय दृष्टिकोणांतून इतिहास कसा लिहावा याचें उत्तम निदर्शन म्हणजे हा ग्रंथ होय. ऐतिहासिक कार्यकारणभाव, वर्गसंबंध, वैचारिक प्रवाह, थोर व्यक्तींचें इतिहासांतील स्थान इत्यादि गोष्टींचें उत्कृष्ट विवेचन या ग्रंथांत मिळतें. राष्ट्रीय चळवळींत प्रत्यक्ष भाग घेत असतां केलेल्या ऐतिहासिक चिंतनांतून हा निबंध निर्माण झाला असल्यामुळें त्यांत जिव्हाळा व वैचारिकता यांचा उत्कृष्ट संगम झालेला अनुभवास येतो.

जावडेकरांचें खाजगी जीवन व सार्वजनिक जीवन या दोन्ही बाजू सारख्याच शुद्ध चारित्र्यानें पावन झालेल्या दिसतात. त्यांचें जीवन व वृत्ति संताला शोभणारी होती. त्याचा परिणाम नातेवाईक, संबंधी जन व मित्रमंडळी यासर्वांवर अनुकूल असाच झाला. त्यांना जिव्हाळयाचे मित्र पुष्कळच मिळाले. सार्वजनिक व विशेषतः राजकीय क्षेत्रांत त्यांच्या चहात्यांची संख्या फार मोठी आहे. म्हणून त्यांचें आयुष्य जरी स्वास्थ्यांत गेलें नसलें तरी त्यांची उपेक्षाहि फार झाली नाहीं. सद्विचारांचा निर्मळ निर्झर जसा तृषितांना आकर्षित करतो तसे ते विचारांची कदर असलेल्या माणसांस आकर्षित करीत होते. त्यांची प्रकृति मात्र दीर्घकालपर्यंत श्वासानें बेजार झाली होती; अशा स्थितींतहि त्यानीं साठीचें आयुष्य भोगलें. याचें श्रेय त्यांच्या थोर, सच्छील पत्नी-कडेच जातें. त्या सतीसावित्रीमुळें या सत्यवानास दीर्घजीवन लाभलें !

– त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी









अनुक्रमणिका

# आचार्य जावडेकरांचे राज्यशास्त्रीय विचार

राजकारणांतील पक्षोपपक्ष, राजकारणी व्यक्तींचीं भलीबुरीं चरित्रें व राजकीय घडामोडींतील प्रसंग व पेंचप्रसंग यांच्याकडे पाहून सामान्य माणसाला राजकारण म्हणजे एक सत्तेचा चक्रव्यूह वाटूं लागतो ! राजकारणाचा त्याला उबग येतो असें म्हटलें तरी चालेल. पण एकीकडे तिटकारा वाटला तरी पुन्हा राजकीय घडामोडींवर व मूठभर राजकारणी व्यक्तींच्या कर्तृत्वावर आपलें व भावी पिढ्यांचेंहि सुखदुःख अवलंबून आहे हें लोकांना कळत असतें. म्हणूनच पुढाऱ्यांच्या दर्शनासाठीं व एकेका शब्दासाठीं लाखों माणसें उत्सुक असतात. राजकारणाबद्दल ही उद्वेग-उत्सुकतेची जी दुहेरी भावना समाजांत आढळते तिचें कारण असें सांगता येईल कीं राजकारणाच्या बाबतींतहि एक शास्त्र आहे, किंबहुना असूं शकतें. ही गोष्ट आज लोकांना अपरिचित आहे. पण राज्यशास्त्र हें इतर कोठल्याहि मानवशास्त्राप्रमाणेंच एक शास्त्र आहे. कांहीं श्रद्धा, तसेंच प्रत्यक्ष निरीक्षण व प्रयोग आणि त्यांवरून कांहीं सिद्धान्त हे राज्यशास्त्रांतहि रचले गेलेले आहेत व प्लेटो आणि कौटिल्यापासून आजपर्यंत राज्यशास्त्रीय सिद्धान्तांची मालिका व विकासक्रम दाखवितां येण्यासारखा आहे.

आचार्य जावडेकर हे या राज्यशास्त्रांतील एक गाढे पंडित होते. त्यांच्या विचारांना ग्रंथ-ग्रथित ज्ञानाच्या व्यासंगाप्रमाणेंच प्रत्यक्ष अनुभव व प्रयोग यांचाहि आधार असल्यामुळें त्यांच्या सिद्धान्तांचें महत्त्व फार मोठें आहे. त्यांची वृत्ति खऱ्या पंडिताला साजेशी नम्र व प्रांजल होती आणि सत्यान्वेषणाच्या प्रेरणेमुळें तितकीच आवेशयुक्त व खंबीर होती. म्हणून त्यांच्या एकंदर लिखाणांतून त्यांच्या राज्यशास्त्रीय विचारांचा विकास कसकसा होत गेला हें स्पष्टपणें मांडतां येण्यासारखें आहे. अर्थात् हें कार्य दीर्घ संशोधनानें साध्य होण्यासारखें आहे. या संशोधनाचें महत्त्व असें आहे कीं आचार्यांच्या विचार-विकासांत आधुनिक भारताच्या राजकीय व सामाजिक जीवनाच्या मूळ समस्या प्रतिबिंबित झालेल्या आढळतील. सन १९२९ ते १९५५ पर्यंतचा सुमारें पाव शतकाचा काळ म्हणजे भारतीय जीवनांतील राजकीय वादळांचा, स्थित्यंतरांचा व मोठ्या व्यापक आणि गुंतागुंतीच्या संघर्षांचा काळ होता. या काळांतील घटनांच्या मागील वैचारिक संघर्षाचें प्रतिबिंब आचार्यांच्या विचारांत दिसून येतें. तेंहि नुसतें प्रतिबिंबरूप दिसत नाहीं तर साक्षेपी मीमांसेच्या रूपांत आढळतें.

## आगरकरांच्या व्यक्तिवादाचे संस्कार

आचार्यांच्या राज्यशास्त्रीय विचारांची खरी ओळख करून घ्यावयाची तर दीर्घ अभ्यास व संशोधन करावयास हवें. परंतु प्रस्तुत लेखामध्यें केवळ स्थूल मानानें त्या विचारांचें स्वरूप मांडण्याचा मी प्रयत्न करणार आहे. महान् वृक्षाचा विस्तार शेवटीं बीजांतील सुप्त विकासशक्तींत असतो. या न्यायानें आचार्यांच्या विचारव्यूहामागें प्रथमावस्थेंत बीजरूपानें कोणचें तत्त्व आहे, याचा शोध घेतला तर असें दिसतें कीं आगरकरांनीं ज्या विवेकनिष्ठ व्यक्तिवादचा पुरस्कार केला. तो व्यक्तिवाद हीच त्या व्यूहामागील प्रेरणा आहे. आचार्यांच्या जीवनांत राजकारण हाच प्रमुख विषय होता. पण ते सत्तेच्या राजकारणापासून अलिप्त राहिले. त्यामुळें त्यांना ‘ निष्प्रभ तत्त्वचिंतक ’ म्हणून राजकीय दृष्ट्या ‘ अज्ञातवास’च पत्करावा लागला असा भास होतो, पण खोलवर विचार केला तर तो अज्ञातवास त्यांनीं जाणूनबुजून व तत्त्वचिंतकाची भूमिका पूर्णपणें पार पाडण्यासाठींच पत्करलेला होता असें आढळतें. समाजाच्या उपेक्षेविषयीं बेफिकीर राहणाऱ्या आगरकरांच्या विचारांचा व प्रत्यक्ष खडतर जीवनाचा गाढ व स्थायी संस्कार या त्यांच्या अज्ञातवासाच्या भूमिकेंतहि स्पष्टपणें उठून दिसतो. जें घडवावयाचें आहे तें महत्त्वाचें आहे व म्हणूनच घडविण्याच्या क्रियेइतकेंच विचाराचेंहि महत्त्व आहे, साध्याइतकेंच साधनांचें व साधनेचें मोल आहे, ही शिकवण आगरकरांनीं जितक्या उत्कटतेनें दिली तितकी त्यांच्या समकालीनांनीं दिली नाहीं. ह्याच गोष्टीचा प्रभाव आचार्यांच्या मनावर झालेला दिसतो. घरीं टिळकपंथीय वातावरण असून तरुणपणीं आचार्यांनीं आगरकरांचें शिष्यत्व पत्करिलें, यांतच त्यांच्या भावी विचारविकासाचीं बीजें दिसून येतात.

आगरकरांचें शिष्यत्व म्हणजे तरी काय ? राज्यशास्त्रीय विचारांच्या विकासांत सामाजिक सुधारणेचीं तत्त्वें आवेशानें मांडणाऱ्या आगरकरांचा प्रभाव कां व

आगरकर हे केवळ समाजसुधारक होते निदान सुधारणेला राजकारणापेक्षां ते जास्त महत्त्व देत होते असा समज आहे. त्या काळच्या वादामध्यें 'आधीं राजकीय कीं आधीं सामाजिक' असा संघर्ष झाल्यामुळें वरील समजाला थोडाफार आधारहि आहे. पण मुळांत पाहिलें तर खरा वाद केवळ सामाजिक सुधारणा व राजकीय प्रगति यांच्या 'आधीं-नंतर'चा नव्हता असें दिसून येईल. यापैकीं एक प्रमुख व दुसरें गौण असाहि तो प्रश्न नव्हता. स्वातंत्र्य व सुधारणा ह्या दोन्हींची गरज सर्वांनाच मान्य होती. खरा मतभेद असा होता कीं भारतीय समाजाची पुनर्रचना करावयाची का नाहीं ? आगरकरांचें म्हणणें असें होतें कीं स्वातंत्र्यासाठीं झगडत असतांनाच आपल्याला सामाजिक पुनर्घटनेचें नवें तत्त्व अंगिकारिलें पाहिजे व अशा पुनर्घटनेच्या साध्यावरील दृष्टि विचलित होऊं न देतां राजकीय स्वातंत्र्यासाठीं प्रयत्न झाला पाहिजे. सामाजिक पुनर्घटनेच्या आशयावांचून स्वातंत्र्यहि कमकुवत राहील हा आगरकरांच्या शिकवणीचा भावार्थ आहे. तो मांडतांना त्यांनीं आपल्यासमोरील प्रश्नच घेतले हें खरें. त्यामुळें केवळ हिंदु पांढरपेशा समाजापुढील सुधारणेच्या प्रश्नांपुरती त्यांची दृष्टि मर्यादितहि झालेली दिसते. परंतु ही मर्यादा असूनहि त्यांच्या भूमिकेचा मूळ पाया हा व्यापक आहे. त्यांनीं सामाजिक पुनर्घटनेच्या आधारभूत तत्त्वांचा आग्रह धरलेला आढळतो. प्रत्येक व्यक्तीला विकासाची संपूर्ण संधि व साधनें देणारा समाज घडविला पाहिजे हें तत्त्व त्यांनीं पुनःपुनः प्रतिपादिलेलें आहे. त्यांचा व्यक्तिवाद हा असा मूलगामी आहे व त्या व्यक्तिवादांतूनच एका आदर्श समाजाचें चित्र त्यांनीं आपल्या मनश्चक्षूंपुढें उभे केलेलें दिसतें. आज ज्याला आपण स्वार्थप्रेरित स्पर्धाप्रधान असा व्यक्तिवाद म्हणूं शकतों त्याच्याशीं आगरकरी व्यक्तिवादाचा संबंध जोडणें अगदीं चुकीचें ठरेल. कारण, स्वार्थमूलक व्यक्तिवाद हा चार्वाकपंथी सुखवाद व स्वैराचारालाच मोठ्या तत्त्वज्ञानाची बेगड चिकटवून तयार झालेला आहे. उलट, आगरकरांचा व्यक्तिवाद हा रूसोप्रभृति तत्त्वज्ञान्यांनीं पुरस्कारिलेल्या एका सखोल तत्त्वप्रतिपादनांतून निर्माण झालेला आहे. रूसो, स्पेन्सरप्रभृतींच्या विचारांच्या प्रभावामुळें उत्पन्न झालेला व भारतीय जीवनाच्या पुनर्घटनेसाठीं विशिष्ट रूप धारण करणारा आगरकरांचा व्यक्तिवाद म्हणूनच आचार्यांसारख्या तत्त्वचिंतकाला मार्गदर्शक ठरला यांत नवल नाहीं. 'आधुनिक महाराष्ट्राचे गौतमबुद्ध' म्हणून आचार्यांनीं आगरकरांना गौरविलें आहे,[१] त्याचा अर्थ या दृष्टीनें लावला पाहिजे.

## विवेकवादी जहाल राष्ट्रीयत्व

आचार्यांच्या राज्यशास्त्रीय विचारांचा पाया अशा रीतीनें आगरकरांच्या व्यक्तिवादी तत्त्वज्ञानामुळें घातला गेला व त्यांच्या 'विवेकवादी जहाल राष्ट्रवादा'चे ते अनुयायी बनले. या राष्ट्रवादी संप्रदायाचें वैशिष्ट्य कोणतें ? तर या राष्ट्रवादी वृत्तीमध्यें मुख्य भर भारतीय परंपरेच्या गौरवावर व पुनरुत्थानावर नसून विवेकवादावर आहे. आगरकरांसारखा बुद्धिवादी सुधारक व द्रष्टा केवळ महाराष्ट्रांतच नव्हे तर सर्व भारतांत होऊन गेलेला नाहीं असें सांगतांना आचार्यांच्या मनांत आगरकरांच्या राष्ट्रवादाचें हें वैशिष्ट्य स्पष्टपणें नांदत आहे. नव्या भारतीय राष्ट्राचा उदय होणार आहे तो केवळ ब्रिटिशांना हांकून देण्यानें होणार नसून एका सर्वांगीण समाजक्रांतीचा आशय लाभल्यामुळें होणार आहे व त्यासाठीं पुरातन परंपरेंतील अनेक गोष्टींचा बुद्धिप्रामाण्याच्या आधारें नाश करण्याचें कटु कर्तव्य आपल्याला पार पाडावें लागणार आहे याची जाणीव आचार्यांच्या सर्व राज्यशास्त्रीय विचाराच्या मागें सतत व दृढ आहे. 'आधुनिक भारतां'त त्यांनीं ही गोष्ट आगरकरांच्या शब्दांत मांडली आहे. भारतीय संस्कृतीचा जो वृक्ष भारतीय आर्यांनीं भरतखंडांत रुजविला तो इराणी, ग्रीक, रोमन इत्यादिकांच्या संस्कृति-वृक्षांप्रमाणें कालौघांत उन्मळून पडला नाहीं असें असलें तरी आगरकरांच्या म्हणण्याप्रमाणें, "हें जरठ झाड कसें तरी अजून उभें आहे. पण त्यांत कांहीं त्राण उरलेलें नाहीं ! तें आंतून अगदीं शुष्क होत आलें आहे व त्याचें खोड व फांद्या डळमळूं लागल्या आहेत. याला आतां असेंच उभें ठेवण्यास व यापासून नवीन शाखांचा उद्भव होऊन यास फिरून नवीनावस्था आणण्यास एकच उपाय आहे तो कोणता म्हणाल, तर त्याची खूप खच्ची करून त्यास अर्वाचीन कल्पनांचें भरपूर पाणी द्याव-

१ 'आधुनिक भारत' दुसरी आवृत्ति, पान १८८.








याचें ! असें केलें तरच त्याचें पूर्वस्वरूप पूर्ण नष्ट न होतां, त्यापासून नूतनशाखावृत वृक्ष अस्तित्वांत येईल." [२]

वरील उताऱ्यामध्यें आगरकरांच्या एकंदर तत्त्वप्रतिपादनाचें सार एका उत्तम रूपकाच्या द्वारें स्पष्ट होत आहे. आचार्यांनीं हा उतारा उद्धृत केला आहे याचें मर्महि हेंच आहे कीं, त्यांच्या स्वतःच्याहि राजकीय तत्त्वज्ञानाचें मर्म या रूपकाच्या द्वारें व्यक्त होण्यासारखें आहे.

जरठ वृक्षाच्या छेदनानें त्याला नूतनशाखावृत वृक्षाचा नवा जन्मच लाभूं शकतो हें तत्त्व केवळ भारतीय समाजापुरतें आगरकरांनीं येथें सांगितलें असलें तरी तें तत्त्व व्यापक आहे व मानवी संस्कृतीच्या विकासक्रमाला लागूं होणारें आहे. मानवी प्रज्ञेंत व कर्तृत्वांत सर्जनशीलता आहे व म्हणून मानवी जीवनाचा ओघ जरी कधींकधीं रुद्ध व रक्तलांछित झाल्यासारखा दिसला तरी त्याच्या अंतरंगांत एक चिरयौवनाची ऊर्मि आहे, या मूलभूत श्रद्धेवर आगरकरांचा दुर्दम्य व युयुत्सु आशावाद भक्कमपणें उभा आहे. नवसर्जनाची प्रेरणा अंतरंगांत उसळत असल्यामुळें केशवसुतांप्रमाणें ' जुनें जावुं द्या मरणालागुनि ' असें आत्मविश्वासानें म्हणण्याचें सामर्थ्य या आशावादांत आहे. आचार्यांच्या राष्ट्रवादांतहि या आशावादाचें सामर्थ्य आहे व म्हणूनच भारतीय स्वातंत्र्याच्या घडणींत जुन्याच्या विच्छेदनाकडे पाहतांना त्यांनीं एक खंबीर व वस्तुनिष्ठ दृष्टि स्वीकारलेली आढळते.

## इतिहासाची वस्तुनिष्ठ मीमांसा

आपल्या राज्यशास्त्रीय विचारांचा पाया म्हणून आगरकरांचा ' विवेकवादी राष्ट्रवाद ' हें तत्त्व आचार्यांनीं अंगिकारिलें व मग त्या दिशेनें भारतीय इतिहासांतील राज्यविषयक घडामोडींची मीमांसा केली. ' हिंदुस्थान कां व कसा जिंकला गेला ? ' या महत्वाच्या प्रकरणानें ' आधुनिक भारत ' या ग्रंथाची आचार्यांनीं सुरवात केली आहे व त्यांत असें स्पष्ट दाखवून दिलें आहे कीं भारतीय समाजाची जी परंपरागत रचना होती ती युरोपीय भांडवलदारी रचनेच्या तुलनेनें मागासलेली असल्यामुळें मूठभर इंग्रजांना येथें साम्राज्य स्थापन करतां आलें. इंग्रजांच्या साम्राज्यस्थापनेच्या उपक्रमाला येथील दुर्बल व्यापारी वर्गानें कसें साहाय्य केलें याचें वर्णन करून सरंजामदार–वर्गाच्या पराभवाचीं कारणें त्यांनीं विशद केलीं आहेत. महाराष्ट्राच्या इतिहासाचें परीक्षण करून त्यांनीं असा निष्कर्ष काढला आहे कीं स्वाभिमान, धर्मप्रेम व स्वामिनिष्ठा या सद्गुणांच्या जोरावर येथें स्वराज्यस्थापना जरी झाली तरी ' राष्ट्रधर्माची भावना ब्राह्मणांत व क्षत्रियांत व्यापकत्वानें पसरली होती असें मुळींच दिसत नाहीं." [३] इंग्रजांच्या 'व्यापारी' ( म्हणजे भांडवलदारी ) संस्कृतीपुढें ही सरंजामदारी पद्धतीची रचना कोलमडून पडणें अपरिहार्य होतें ही गोष्ट सांगून आचार्य म्हणतातः " ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिंकतांना व तो जिंकल्यावर आपली सत्ता सुस्थिर करतांना या देशांत एक सामाजिक क्रांति घडवून आणली होती व एका वर्गाला जिंकतांना दुसऱ्या वर्गाला हातांशीं धरून वर आणण्याचा आभास तरी उत्पन्न केला होता. अर्थात् ब्रिटिशांनीं हिंदुस्थान जिंकून केवळ एक राज्यक्रांतीच केली नाहीं, तर सर्वांगीण समाजक्रांति करण्याचें बीजारोपण केलें " [४]

## विवेकवादी आणि कल्पनारम्य राष्ट्रवाद

' विवेकवादी राष्ट्रवाद ' आणि 'कल्पनारम्य राष्ट्रवाद' यांतील फरक वरील मीमांसेवरून स्पष्ट होईल. राज्यशास्त्रीय विचारांना अधिष्ठान कोणतें असावें याबद्दलच या दोन प्रवृत्तींत फरक आहे. मनुष्यमात्राच्या विचारांना व आचारांना, तसेंच साध्यसाधनांच्या व मूल्यांच्या योजनेला विवेकाचा आधार हवा आणि हा विवेक डोळस व वस्तुनिष्ठ हवा, हें तत्त्व आचार्यांनीं पुरस्कारलेलें आढळतें. त्याच वेळीं महाराष्ट्रांत दुसऱ्या म्हणजे ' कल्पनारम्य ' राष्ट्रवादी प्रवृत्तीची जोपासना फार मोठ्या प्रमाणावर झालेली आढळते. ' कल्पनारम्य राष्ट्रवादा ' चा पायाहि इतिहासाच्या अधिष्ठानावर रचलेला असतो. पण इतिहासाचा अर्थ मात्र वस्तुनिष्ठ रीतीनें लावलेला नसतो. प्रत्येक ऐतिहासिक घटना ही एखाद्या अमूर्त ध्येयाच्या

२ कित्ता, पा. १८६.
३ कित्ता, पान २१.
४ कित्ता, पान १८.



अनुक्रमणिका






पूर्तीसाठीं घडलेली असते व तिचें श्रेय एखाद्या व्यक्तीच्या अद्‌भूत प्रतिभेला द्यावें लागतें अशी मीमांसा करून इतिहासाचा अन्वयार्थ लावण्यांत येतो. या पद्धतीनें संतांच्या व सरदारांच्या कामगिरीचा अर्थ लावल्यामुळें मराठ्यांच्या साम्राज्याचें सामर्थ्य व दुबळेंपण कशांत होतें याची वस्तुनिष्ठ मीमांसा करतां येणें 'कल्पनारम्य राष्ट्रवादा'च्या पुरस्कर्त्यांना अशक्य ठरतें. परंतु, त्यांना वस्तुनिष्ठ मीमांसेची आवश्यकताहि वाटत नाहीं हेंहि तितकेंच खरें. 'राष्ट्र' ही कल्पना अमूर्त असली, तरी सर्वांच्या हृदयांत सर्व काळीं असतेच. तिला मालिन्य आलें कीं स्वार्थांधता व फुटीर वृत्ति बोकाळून समाज पारतंत्र्यांत रुततो. उलट पक्षीं, तिला एखाद्या महान् राष्ट्रविभूतीच्या कर्तृत्वामुळें व त्यागामुळें तेज प्राप्त झालें कीं राष्ट्र स्वतंत्र होऊन जगावर आपलें वर्चस्व प्रस्थापित करूं शकतें-अशा कल्पनांच्या अधिष्ठानावर 'कल्पनारम्य राष्ट्रवादा'ची उभारणी होते. महाराष्ट्रांत या प्रवृत्तीचें सामर्थ्य फार मोठें आहे आणि आचार्य जावडेकरांनीं या राष्ट्रवादाविरुद्ध विवेकवादी राष्ट्रवादाची भूमिका अविरतपणें व फार उत्कट तऱ्हेनें मांडली हें त्यांचें महत्त्वाचें कार्य होय.

ऐतिहासिक वस्तुनिष्ठा व विवेकवाद यांच्या आधारावर आपले राज्यशास्त्रीय विचार संघटित करीत असतांना अगदीं सहज क्रमानें व अपरिहार्यपणें आचार्य हे समाजवादाचे प्रवक्ते बनले. 'कल्पनारम्य राष्ट्रवादा'चा पायाच 'राष्ट्र' या कल्पनेवर रचलेला असल्यामुळें त्या राष्ट्रवादाचें मंदिर त्या निरुंद पायाच्या मर्यादेचा कोट फोडून विस्तार पावूं शकत नाहीं. 'राष्ट्रवाद' ही निष्ठा राष्ट्रीय पारतंत्र्याच्या अवस्थेंत प्रधान ठरणें इष्ट असलें तरी ती निष्ठा व्यक्तिवादाच्या खऱ्या व्यापक उद्दिष्टालाहि कोंडाळ्यासारखी जाचक ठरते. प्रत्येक व्यक्तीच्या बौद्धिक, आर्थिक व सर्वांगीण स्वातंत्र्याचा आणि विकासाचा आशय 'राष्ट्र' या कल्पनेंत सामावूं शकत नाहीं. व्यक्तीच्या सर्वोदयासाठींच समाजाच्या सर्वोदयाची भूमिका अंगिकारावी लागते व त्यासाठीं 'राष्ट्र' या कल्पनेची सीमा ओलांडावी लागते. मानवजात हें एक विश्वकुटुंब आहे व त्या कुटुंबांत सर्वांचा अभ्युदय साधावयाचा तर राष्ट्रांतील व वर्गहीन अशा मानवबंधुत्वाचा भव्य आदर्श आपण पुढें ठेवला पाहिजे हा उपदेश आचार्यांनीं महाराष्ट्राला केला. मीरत-कटाचा खटला चालूं होता तेव्हांच, म्हणजे सन १९२९ मध्येंच, आचार्यांनीं 'विश्वकुटुंबवाद' ही पुस्तिका लिहून समाजवादाच्या तत्त्वज्ञानाची ओळख महाराष्ट्राला करून दिली.

आचार्यांच्या सर्व विचारांत आगरकरांचा विवेकवादी राष्ट्रवाद आणि व्यक्तिवाद यांचा मूलभूत पाया आढळून येतो. त्याप्रमाणेंच एकीकडे गांधीवाद व दुसरीकडे मार्क्सप्रणीत साम्यवाद यांच्यांतील मूलतत्त्वांचें ग्रहण व समन्वय करण्याचा प्रयत्न दिसून येतो.

## समन्वयाचा विवेकवादी आधार

गांधीवाद व साम्यवाद या दोन 'वादां'च्या मागें महात्माजी व कार्ल मार्क्स या आधुनिक युगांतील दोन युगपुरुषांच्या प्रज्ञेचें व कर्तृत्वाचें अद्‌भुत सामर्थ्य उभें आहे व ही दोन्हीं जीवनदर्शनें या सामर्थ्यामुळें स्वयंपूर्ण आहेत असा आत्मविश्वास या दोन्ही तत्त्वज्ञानांच्या पाइकांच्या मनांत दृढ झालेला आढळणें साहजिक आहे. परंतु, लेनिननें म्हटल्याप्रमाणें सर्व सिद्धान्तापेक्षां शेवटीं प्रत्यक्ष मानवी जीवन हें जास्त जिवंत ठरतें व तें कोणत्याहि सिद्धान्ताला अपुरा ठरवून आपल्या समृद्धीच्या सामर्थ्यानें नव्या प्रमेयांना व जुन्या प्रमेयांच्या नव्या समन्वयांना जन्म देतें.

आचार्यांच्या राज्यशास्त्रीय विचारांत गांधीवाद व साम्यवाद यांच्या समन्वयाचा जो आग्रहपूर्वक प्रयत्न दिसतो तो केवळ दोन प्रवृत्तींची सांगड घालून मिळतें-जुळतें घेण्याच्या वृत्तींतून जन्माला आलेला नाहीं. तशा प्रासंगिक व व्यावहारिक सोयीच्या समन्वयाची गरज तत्त्वतः कधींच नसते. प्रत्यक्ष राजकीय जीवनांत मिळतें घ्यावें लागतें व प्रसंगीं माघारहि घ्यावी लागते; पण या गोष्टी तत्त्वच्युति किंवा भ्रष्ट समन्वय न करतां साधतां येतात. प्रत्येक राष्ट्रपुरुषाच्या व क्रांतिवादी नेत्याच्या आयुष्यांत असे क्षण आलेले दिसतात व त्यांतून तत्त्वभ्रष्टतेचा संपर्क होऊं न देतां ते बाहेर पडलेले आपण पाहतों. पण राजकारणांतील लहान व्यक्तींना मात्र सोयीसाठीं भ्रष्ट समन्वयच स्वीकारावा लागतो व समन्वय हेंच एक 'तत्त्वज्ञान' बनवावें लागतें.

प्रत्यक्ष कार्यांत तत्त्वनिष्ठ राहून परिस्थितीशीं जुळतें घेण्याचा महात्माजी किंवा मार्क्स-लेनिनप्रभृतींवर आलेला प्रसंग आचार्यांवर आला नाहीं. कारण,












लढ्यामध्यें कारावास सहन करण्याचा कर्मयोग त्यांनीं आचरिला तरी ते प्रत्यक्ष निर्णयाच्या राजकारणापासून बरेच अंतरावर होते. त्यांची समन्वयाची धडपड ही त्यांच्या विवेकवादी वस्तुनिष्ठेला प्रखर तत्त्वनिष्ठेची जोड मिळाल्यामुळेंच सतत चालू होती. गांधीवाद ही निष्ठा त्यांनीं स्वीकारली. परंतु वस्तुस्थितींत त्यांना जें दिसलें तें आचार्य भागवतांच्या शब्दांत असें सांगतां येईल : " स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं साधन म्हणून राष्ट्रीय सभेनें स्वीकारलेला शांतताप्रधान मार्गहि खरोखर अहिंसाधर्म म्हणूनच नव्हे, तर राजकारणाचें व्यवहार्य धोरण म्हणूनच स्वीकारलेला ठरला ! "[५] याहि पुढें जाऊन आचार्यांनीं असें म्हटलेलें आढळतें कीं गांधीवादाच्या आदर्शापासून राष्ट्रीय सभा ही भ्रष्ट झालेली आहे व गांधीवादाचा वारसा हा कॉंग्रेसकडे नसून विनोबाजींसारख्या सर्वोदयवाद्यांकडेच उरला आहे.

दुसरीकडे, भारतीय साम्यवादी ( कम्युनिस्ट ) व इतर तत्सम पक्षांच्या कृतींकडे पाहून त्यांना असें दिसलें कीं मार्क्सप्रणीत तत्त्वांचा अवलंब येथील परंपरेशीं व वस्तुस्थितीशीं एकनिष्ठ राहून करण्याचें सामर्थ्य या पक्षांमध्यें कधीं जोपासलें गेलें नाहीं. त्यांनीं असाहि एक निष्कर्ष काढला कीं रशियन समाजक्रांतीच्या वेळची मानवजातीची परिस्थिति आतां उरलेली नसल्यानें आमूलाग्र समाजक्रांतीच्या मार्गांचा फेरविचार करण्याची वेळ आतां आली आहे.

गांधीवाद व साम्यवाद या दोन्ही तत्त्वज्ञानांतील साध्यसाधनांची मीमांसा करून व भारतीय आणि जागतिक वस्तुस्थितीचें निरीक्षण करून त्यांनीं एका समन्वित तत्त्वाची मांडणी केली आहे व त्यालाच ' सत्याग्रही समाजवाद ' हें नांव दिलें आहे. त्यांनीं ' आधुनिक भारता'च्या स्वतःच्या प्रास्ताविक निवेदनांत म्हटलें आहे कीं व्यक्तिवाद, राष्ट्रवाद आणि समाजवाद हीं " तीनहि सामाजिक तत्त्वज्ञानें एकमेकांपासून कितीहि भिन्न दिसलीं तरी तीं तीनहि तत्त्वज्ञानें आधुनिक युरोपांतून भारतांत आलेलीं आहेत. " परंतु या तिन्हींहि मतांहून वेगळा व श्रेष्ठ असा ' सर्वोदयवाद ' त्यांना ग्राह्य वाटतो. या सर्वोदयी तत्त्वज्ञानांत जर सनातन अशी एक वृत्ति सूचित होत असेल तर ती " मानवी अंतःकरणांतील सनातन क्रांतिवृत्तीच होय " असें सांगून ते पुढें म्हणतात कीं, " या सनातन क्रांतिवृत्तीवर अधिष्ठित झालेला सत्याग्रही सर्वोदयवाद हा व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद या तीनहि तत्त्वज्ञानाहून भिन्न असला तरी त्या तिन्हींतील सत्त्वें आत्मसात् करून मानवसंस्कृतीला सत्ययुगाचें मार्गदर्शन करणारा असा तो शांतिमय क्रांतिवाद आहे. "

आचार्यांची समन्वयी वृत्ति ही अशी सर्जनशील राज्यशास्त्रीय विचारांना अखिल मानवजातीच्या हिताच्या उत्तुंग ध्येयवादाकडे प्रेरित करणारी श्रद्धान्वित वृत्ति आहे. विनोबाजींच्या भूदान – आंदोलनापासून आज आशियावासी मानवजातीच्या नेत्यांनीं निर्माण केलेल्या–पंचशील आंदोलनापर्यंत जें जें आंदोलन आज मानवाच्या सत्प्रवृत्तीला आवाहन करीत आहे तें तें आंदोलन मानवी अंतःकरण व प्रज्ञा यांतील सत्त्वगुणाचा आविष्कार आहे व याच गुणाचा आधार घेऊन आचार्यांच्या राज्यशास्त्रीय विचार-समन्वयाची रचना झाली आहे. या तत्त्वाचा विजय झाला तर भारतांतील नव्हे तर आशियांतील व इतर खंडांतील मानवसमूह एका नव्या इतिहासयुगाची निर्मिति करण्यास मुक्त होणार आहेत. क्रांति आणि शांतता यांचा समन्वय होण्यांतच आतां मानवी संस्कृतीचें भवितव्य सुरक्षित राहणार आहे. म्हणूनच ' शांततामय क्रांति ' हा आचार्यांच्या विचारांतील प्रेरक मंत्र आपल्या राजकीय जीवनांत एक ब्रीदमंत्र म्हणून मार्गदर्शक ठरणार आहे.

आचार्यांच्या जीवनाचें साफल्य त्यांच्या अखंड ज्ञानसाधनेंत, राजकीय कर्मयोगांत व उदात्त चारित्र्यांत झालेलें आहे. मृत्यूनें त्यांना आपल्यांतून ओढून नेलें असलें तरी त्यांनीं निर्माण केलेली ज्ञानसंपदा आपल्यापासून काळालाहि हिरावून नेतां येणार नाहीं. त्यांच्यासारखा उदारधी ज्ञानतपस्वी महाराष्ट्राला लाभला हें मोठेंच भाग्य ! त्यांचें स्मरण ठेवून त्यांच्या विचारांनीं दाखविलेल्या दिशेनें ज्ञानसाधना करीत राहणें हीच त्यांना श्रद्धांजलि होय.

— प्रा. दि. के. बेडेकर

५ ' आधुनिक भारत ', प्रस्तावना, पान ८






अनुक्रमणिका





# आदरणीय आणि आदर्श आप्त आचार्य जावडेकर

कै. आचार्य शंकररावजी जावडेकर यांचेसंबंधीं ही आदरांजलि वाहण्याची संधि, मी त्यांसंबंधीं कांहीं लिहिण्याची सूचना करून 'नवभारत'कारांनीं मला दिली आहे याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे. मे १९४९ च्या 'नवभारता'च्याच 'साहित्यसंमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर-विशेषांका'तहि मी "जावडेकरांचें वैचारिक विभूतिमत्त्व" या शीर्षकाचा कांहीं मजकूर लिहिला होता. तो आज पुन्हां वाचून पाहतां त्यांत मला फारसा कांहीं फरक करावासा वाटत नाहीं. त्यांच्या वैचारिक विभूतिमत्त्वाविषयीं त्या वेळीं मी जें लिहिलें होतें तोच त्यांचा ठसा माझ्या मनावर त्यानंतरच्याहि कालांत कायम राहिला आहे. बी. ए. साठीं तत्त्वज्ञान व एम्. ए. साठीं इतिहास-राजकारण-अर्थशास्त्र या ज्ञानशाखांचा अभ्यास केल्यानंतर त्यांनीं कांहीं काळ प्रत्यक्ष समाजकार्य केलें व त्याच कालावधींत 'राजनीतिशास्त्रपरिचय' हा ग्रंथ लिहिला; आणि यानंतर ते निमंत्रणावरून टिळक-महाविद्यालयांत अध्यापनासाठीं आले. या त्यांच्या जीवनांतील कालखंडाबद्दल पूर्वींच्या लेखांत मीं लिहिलें होतें : "मूळ तत्त्वज्ञानांत अवगाहन करणाऱ्या विचारवंतानें समाजविचाराकडे वळविलेल्या दृष्टीचा तो ग्रंथ ('राजनीतिशास्त्रपरिचय') म्हणजे परिपाक आहे. या कालखंडांत तत्त्वज्ञानांतून समाजविचारांत व तेथून पुनः तत्त्वज्ञानांत- अशी जावडेकरांची बुद्धि अप्रतिहत संचार करीत होती. खुद्द तत्त्वज्ञानावर त्यांनीं प्रत्यक्ष असें थोडें लिहिलेंहि; परंतु त्यापेक्षां तत्त्वज्ञानांतील मूलगामी कल्पना व सिद्धांत यांचा त्यांनीं आपल्या समाजविषयक लिखाणांत अनेक ठिकाणीं जो सुंदर उपयोग केला आहे त्यांत त्यांच्या बुद्धीचें तत्त्वशोधकत्व व समाजदृष्टि हे गुण उत्तम रीतीनें प्रतीत होतात. तत्त्वज्ञान म्हणजे एक समाजविमुख विषय, व तत्त्वज्ञ म्हणजे एक संन्यस्त व्यक्ति — हे समज जावडेकरांच्या वैचारिक विभूतिमत्त्वावरून अगदीं लटके पडतात." ('नवभारत', मे १९४९, पृ. ६९२). हेंच त्यांचें वैचारिक विभूतिमत्त्व शेवटपर्यंत कायम होतें. त्यांच्या जीवनांत त्यांनीं तत्त्वज्ञानास समाजविचारोन्मुख किंवा समाजविचारप्रवण केलें व समाजविचारास तत्त्वज्ञानाच्या भरभक्कम पायावर उभें केलें. हाच त्यांचा मोठा वैचारिक पराक्रम होय असें वाटतें. त्यांचें पूर्वजीवन या पराक्रमाची बौद्धिक तयारी किंवा तपस्या करण्यांत गेलें, तर जीवनाच्या उत्तरार्धांत आपल्या प्रत्यक्ष ग्रांथिक व इतर विविध लेखनाच्या रूपानें या पराक्रमाचे अनेक उल्लास त्यांनीं आपल्या देशबांधवांस सादर केले. अशा प्रकारचा पराक्रम केवळ तत्त्वज्ञान किंवा केवळ समाजविज्ञान एवढ्याचा अभ्यास करणाऱ्या व्यक्तीस अशक्य होय. जावडेकरांच्या बुद्धीचें व कर्तबगारीचें खरें वैभव हेंच कीं त्यांनीं या दोन्ही ज्ञान-विज्ञानांच्या अभ्यासांत दीर्घोद्योग, चिंतन व मनन यांनीं एवढी ज्ञानाची उपस्थिति व कल्पनेचें संपन्नत्व संपादन केलें कीं तत्त्वज्ञानांत त्यांना समाजविचार सुचूं लागे व समाजविज्ञानांत त्यांना खोल तात्त्विक उपपत्ति दिसूं लागे. किंबहुना, पुढें पुढें तत्त्वज्ञान व समाजविज्ञान यांमधील सीमारेषा त्यांच्या विचारांत अस्फुटच होत गेली असें वाटतें. त्यांच्या मनाची घडणच समन्वयाची. त्यामुळें सगळें ज्ञान-विज्ञान त्यांच्या मनाच्या मुशींत विलीन होऊन त्यांतून त्यांची नवसिद्धान्तमूर्ति तयार व्हावयाची ! असो.

जावडेकर व मी यांच्या जुन्या स्नेहसंबंधांत अलीकडेच (म्हणजे १९५२ सालीं) जी एक नवी घटना झाली ती म्हणजे ही कीं तें माझे व्याही झाले. त्यांच्या द्वितीय चिरंजीवांशीं माझ्या ज्येष्ठ कन्येचा विवाह झाला. नैयायिकांच्या 'आप्त' या शब्दाच्या व्याख्येप्रमाणें ("आप्तस्तु यथार्थवक्ता") जे माझे पूर्वींच 'आप्त' होते ते आतां लौकिक अर्थानेंहीं 'आप्त' झाले होते. त्यामुळें पूर्वींच्या स्नेहसंबंधांत बराच निकटपणा व घनत्व आलें होतें. या संबंधाच्या अनुषंगानें त्यांच्या विभूतिमत्त्वाचे जे नवीन पैलू मला दर्शन देते झाले ते सर्वच अत्यंत हृद्य व आदरणीय असेच आहेत. पण त्यासंबंधीं सार्वजनिक रीतीनें सर्व कांहीं लिहिणें संकोचकारक वाटतें. तरीसुद्धां आचार्य जावडेकरांस तसें अगदीं खाजगी असें जीवन फारसें उरलें नव्हतें ही गोष्ट व त्यांच्या संबंधींचा लोकादर लक्ष्यांत घेऊन एक-दोन गोष्टींचाच केवळ उल्लेख करितों.

त्यांच्या कुटुंबांतील घटकांचे एकमेकांचे संबंध अत्यंत प्रेमाचे, परंतु एकमेकांच्या व्यक्तिमत्त्वाबद्दल आदर बाळगणारे असे आहेत. विशेषतः आचार्य पति-






अनुक्रमणिका





पत्नी आदर्श मातापितरें होतीं. त्यांना दोन मुलगे, व एवढींच त्यांचीं अपत्यें. या अपत्यांबद्दलची त्यांची असीम आस्था खरी; परंतु ती त्यांच्या वैयक्तिक निर्णया-च्या कधींहि आड यावयाची नाहीं. किंबहुना, या पतिपत्नींनीं आपल्या अपत्यांचे आपुलकीचे सल्लागार एवढीच भूमिका स्वतःकडे ठेवलेली असे. आणि यामुळेंच कीं काय, त्यांचीं अपत्यें व सुना त्या दोघांना फार फार मानीत. आणि अपत्यनिर्विशेष संबंध आचार्य पति-पत्नींचे त्यांच्या भागिनेयीद्वयांबद्दलहि असत. त्यांची स्वतःची आप्तमंडळी थोडीच आहेत. परंतु त्यांच्या सासुरवाडाकडील आप्तसंबंध बरेच आहेत. या सर्वांशीं त्यांचे संबंध अत्यंत स्नेहाचे व निरपेक्ष स्नेहाचे, म्हणून अत्यंत जिव्हाळ्याचे असत. त्यांच्या निर्याणसमयीं ही सर्व मंडळी सुदैवानें जमूं शकली. त्या वेळींच्या त्यांजबद्दलच्या सर्वांच्या भावना मीं अत्यंत जवळून पाहिल्या आहेत. प्रत्येकास आपल्या भावनांस सेवारूपानें कांहींतरी व्यक्त स्वरूप द्यावें असें वाटत असे. हा सर्व परिपाक त्यांच्या आचार्यांशीं झालेल्या जन्मभराच्या संबंधानें उत्पन्न झाला होता हें उघड आहे. आणि हें जसें आचार्यांच्या आप्तांचें, तसेंच त्यांच्या मित्रमंडळींचेंहि. श्री. शंकरराव देव, आचार्य भागवत व श्री. प्रभाकरपंत कोरगांवकर ही मंडळी तर फार निकटची मित्रमंडळी. त्यांनीं आचा-र्यांना उतार पडावा यासाठीं केलेले अपार प्रयत्न आठ-वून मन भारावून जातें; आणि लक्ष्यांत येतें कीं इतकें कुटुंबीयांचें, आप्तांचें व मित्रांचें सौहार्द जमा केलेले आचार्य शंकरराव खरोखर धन्य होत !

आचार्य शंकररावांच्या व माझ्या आप्तपणांत मला स्वतःला त्यांचें जें विभूतिदर्शन झालें त्याचें पुरेसें वर्णन करणें कठीण आहे. आमच्यामधील होऊं घात-लेल्या आप्तसंबंधाबाबतच्या वाटाघाटी चालू असतांना त्यांचें मनोगत, उक्ति आणि कृति यांमधील जें संपूर्ण प्रांजल ऐक्य मला प्रतीत झालें, तें फारच फार विरळा असें म्हणावें लागेल. आंत एक-बाहेर एक असें नाहीं, टोलवाटोलवी नाहीं, अविश्वास नाहीं, अपेक्षा नाहीं ! विश्वास ठेवण्यास कठीण वाटेल– पण ती एक संपूर्ण सत्य गोष्ट आहे कीं निर्णायक वाटाघाट फक्त पांचच– किंवा दोनच मिनिटांत आटोपली ! आणि तिचा निष्कर्ष असा कीं एकमेकांस एकमेकांच्या अटी कांहीं नाहींत– ज्यास जें शक्य व इष्ट वाटेल तें त्यानें करावें ! आचार्यांचें हें खासगी जीवनांतील आप्तव्यवहारांतील विभूतिमत्त्व खाजगी व वैयक्तिक महत्त्वाचेंच असलें तरी तें त्यांच्या बौद्धिक विभूतिमत्त्वाएवढेंच मोठें आहे असें म्हणावें लागेल ! आणि हीच त्यांची वृत्ति सर्व प्रकारच्या आप्तसंबंधसमारंभांत दिसावयाची !

ते माझे आप्त झाल्यानंतर साहजिकच एकमेकांच्या घरीं जाणें-राहणें वाढलें. या संबंधांत आचार्य हे हवे-हवेसे वाटणारे अतिथि व आस्थेवाईक यजमान होत हें मीं अनुभविलें होतें. त्यांचा कशाबद्दलहि आग्रह नसावयाचा. 'हेंच हवें-हेंच नको' असें नसावयाचें. घरांतील इतरांशीं मिळून-मिसळून घेण्याची वृत्ति असे. त्यांना स्वस्थपणें पडून राहण्यास किंवा आल्या-गेल्या मित्रांशीं बोलण्यास खोली सुसज्ज करून दिली कीं शंकररावांच्या आरामाच्या कल्पना संपल्या. त्यांना दम्याचा त्रास व्हावयाचा; तरी मधून मधून उष्ण पेयें घ्यावयासहि त्यांना थोडा आग्रहच लागावयाचा. ऊन पाण्याची रबरी पिशवी दिली कीं ती छातीशीं घेत हा ऋषि चिंतन करीत पडावयाचा. "आणि हें पहा, वाडेकर, तें व्हाईटहेडचें पुस्तक मिळाल्यास मला एकदां नजरेखालीं घालायचें आहे, बरं का ?" अशी त्यांची मी कॉलेजांत जातांना साद यावयाची ! किंब-हुना, माझ्या घरांत ते आले कीं हाच एक त्यांचा खराखुरा सर्वगामी हव्यास असे. माझ्या शेल्फवरील नवीन पुस्तकें चाळतील, कांहीं 'नेतों' म्हणतील, कांहीं 'मागाहून पाठवा' म्हणतील, कांहीं नवीन 'आणून द्या, म्हणतील, कांहींबद्दल नुसता अभिप्रायच विचारतील ! नवीन पुस्तकें, नवीन विचार यांची पाहणी करून त्यांस आपल्या समन्वयांत कुठें तरी गोंवणें हा एक त्यांच्या मनाचा छंद असे. हा सगळाच समन्वयविचार लेखनिविष्ट करावयास त्यांना सांपडे असें नाहीं. कांहीं पूर्ण झालेलीं, कांहीं अर्धवट झालेलीं – अशी त्यांचीं अनेक चिंतनें तशींच अलिखित राहून गेलीं आहेत ! 'मिस्टिसिझम्' बद्दलचें असेंच त्यांचें एक मौलिक मानसशास्त्रीय-तात्त्विक चिंतन त्यांनीं गतवर्षी मजजवळ बोलून दाखविलें होतें. – पण तें कुठेंहि लेखांत आलेंच नाहीं ! अशीं कितीतरी चिंतनें आपणांस आतां दुरा-वलीं ! आणि ग्रंथांची एवढी उत्सुकतेनें चौकशी करून त्यांतील आशय आत्मसात् करण्यास इतका अधीर







असलेला दुसरा पाहुणाहि मला राहिला नाहीं !

'नवभारत'च्या गेल्या जुलै ( १९५५ ) च्या अंकांत आचार्यांनीं 'धर्म व समाजक्रांति' असा एक लेख लिहिला होता. त्यासंबंधीं पुढील ऑगस्ट व सप्टेंबर या अंकांत प्रा. शहा व श्री. सुराणा यांचेहि लेख प्रसिद्ध झाले. तेव्हां संपादकांच्या सूचनेवरून ऑक्टोबरच्या अंकांत मींहि 'धर्माचें मानवी जीवनांतील स्थान' असा मागील तीनहि अंकांतील उल्लिखित लेखांचा परामर्श घेणारा एक लेख लिहिला व त्यांत आचार्यांच्या विचारसरणींतील मला वाटणारी शृंगापत्ति मीं मांडली. हा लेख वाचल्यानंतर आचार्यांनीं मला लिहिलें : " आपला 'नवभारतां'तील लेख काल वाचला. तो मला आवडला, पण अर्थात् पटला नाहीं. आतां मला लिहिणें भाग झालें आहे. सावकाशीनें लिहीन. कारण विषय सनातन आहे. प्रकृति बरी वाटल्यावर लिहीन. " ( इस्लामपूर, ता. ४-१०-५५ ). त्यांची प्रकृति त्यानंतर बरी झालीच नाहीं, आणि आतां तर ते 'सनातनां'तच जाऊन सुस्थिर झाले आहेत ! याहि पत्रांत त्यांचें मन व बुद्धि आजारांत सुद्धां नेहमीं कशी तत्त्वचिंतनांत कार्यव्याप्त असत याचें उत्तम प्रत्यंतर येतें. त्यांना पुण्यास आणल्यानंतरहि रावसाहेब पटवर्धनांच्या बंगल्यावर आचार्य भागवत व मी त्यांजजवळ असतांना त्यांच्या अस्फुट बोलण्यांतहि उल्लेख आला तो 'प्रज्ञापारमिते'चा व तिच्या बौद्धदर्शनांतील स्वरूपाचा ! किंबहुना, आजारांतील त्यांचें सर्व जीवनहि प्रज्ञाजीवनच होतें. मृत्यु सन्मुख उभा असतांहि त्यांच्या वृत्तींत शांतता होती. जन्मभर तत्त्वचिंतनाचा तो परिपाक ( व कसोटीहि ) होता ! आचार्य जावडेकर धन्य होत ! ते स्वतः कृतार्थ झाले व इतरांस आदर्श ठेवून गेले !

— प्रा. दे. द. वाडेकर

## आमचे मामा

[ आचार्य जावडेकरांना त्यांची आप्तमंडळी मामा म्हणत. त्यांच्या स्नुषा सौ. लीला जावडेकर यांनीं त्यांच्या कांहीं हृदयंगम आठवणी 'साधने'त ( २४।१२।५५ ) दिल्या आहेत. त्यांतून पुढील कांहीं उद्धृत केल्या आहेत. -- का. सं. ]

मामा सर्वच गोष्टींचा अत्यंत रसिकपणानें आस्वाद घेत. पुष्कळांना वाटे कीं ते अतिशय रुक्ष असावेत. परंतु त्यांच्या रसिकपणाची प्रचीति गेल्या दोन वर्षांत आम्हांला फार आली. दोन वर्षांपूर्वीं आम्हीं रेडिओ घेतला. रेडिओवरचा कार्यक्रम मामा ऐकतील असें कुणालाहि वाटलें नव्हतें ! परंतु पुढें असें आढळलें कीं, घरांतील इतर कोणाहिपेक्षां मामाच रेडिओचा उपयोग अधिक घेतात. शास्त्रोक्त संगीत ते लावत. पुणें केंद्रावरून लागत असलेलें 'गीतरामायण' ते न चुकतां ऐकत. रेडिओवरील काव्यगायनाचा आस्वाद कधीं ते घेत तर आकाशवाणीवरून होणारी जुन्या नाटकांचीं नभोनाट्येंहि ते ऐकत. मधून मधून धारवाड केंद्रावरील कानडी संगीतहि ते ऐकत व आम्हांला म्हणतः " तुम्हीसुद्धां इतर प्रांतांतील संगीत ऐकून त्याबद्दलची आवड निर्माण केली पाहिजे. " सुंदर चित्रें पहाण्यांत आलीं कीं ते तीं फ्रेम करून आपल्या खोलींत लावीत.

त्यांच्या साधेपणाबद्दल काय लिहावें तेंच समजत नाहीं. मी व सासूबाई भाजी निवडत असलों तर तेहि आमच्याबरोबर भाजी निवडायला लागत. त्यांच्या चपला कितीहि खराब झाल्या तरी त्यांच्या ध्यानींमनींहि नसे. पुष्कळ वेळेला मग अंदाजानें आम्हींच बाजारांतून दुसऱ्या आणायच्या व मग त्या कशाहि बसल्या तरी ते घालत असत. कपड्यांकडे त्यांचें कधीं लक्ष नसे. नवीन कपडे करायला झाले तरी ते म्हणत अजून ह्यावर २।४ महिने सहज जातील ! जरूरीपेक्षां जास्त कपडा तर कधींच त्यांनीं केला नाहीं. परंतु एखादा जादा ( Spare ) म्हणूनहि त्यांचा कपडा नसायचा. एकच कोट त्यांचा असे. पुष्कळ वेळां त्यांचें कोठें व्याख्यान असलें कीं, मग सासूबाईंची धावपळ ! त्या तो कोट रात्रीं धूत व सकाळीं इस्तरी करून आणीत.

# एक थोर तत्त्वचिंतक

आचार्य शंकरराव जावडेकर यांनीं केलेल्या कार्याचें महत्त्व नीट रीतीनें समजून घेण्यासाठीं त्या काळीं महाराष्ट्रांतील राजकारणाची अवस्था कशी होती याची कल्पना असणें जरूर आहे. १९२० सालीं लोकमान्य टिळकांच्या मृत्यूनंतर काँग्रेसचीं सूत्रें महात्मा गांधींनीं हातीं घेतलीं. तोंपर्यंत म्हणजे अव्वल अिंग्रजी अमदानीपासून टिळकांच्या निधनापर्यंत राष्ट्रीय पुनरुत्थानाच्या जवळ जवळ सर्व क्षेत्रांत महाराष्ट्र आघाडीवर होता. सामाजिक, राजकीय, धार्मिक व आर्थिक इत्यादि प्रश्नासंबंधीं नवे विचारप्रवाह हिमालयांतून खाली येणाऱ्या अनेक महानदांप्रमाणें येथें उगम पावले. त्यांची गंगोत्री महाराष्ट्रांत आहे या जाणीवेनें एक प्रकारचा अभिमान, उमेद आणि आत्मगौरवाचा भाव महाराष्ट्रांतील पुढारलेल्या जागृत वर्गांत दिसत होता. लखनौ – अधिवेशनापर्यंत टिळकांच्या जहाल पक्षाच्या हातांत काँग्रेस आली नाही तरी भारतीय जनतेवर त्यांच्या मतांचा व व्यक्तित्वाचा प्रभाव फार मोठा होता. त्यांनीं राष्ट्राला लढाऊ कार्यक्रम दिला त्याचप्रमाणें 'गीतारहस्या'नें भारतीय जीवनाचें आणि राष्ट्रवादाचें तत्त्वज्ञान लोकांना दिलें अशी दृढ श्रद्धा विशेषतः महाराष्ट्रांत वसत होती. त्यामुळें हिन्दुस्थानच्या इतर प्रांतांत ज्या भावनेनें आणि श्रद्धेनें तेथील काँग्रेसजन व जनता महात्मा गांधींच्या नेतृत्वानें आकर्षित झाली तशी भावना महाराष्ट्रांत निर्माण झाली नाही. सुरुवातीला साशंक मनानें पण अगतिकत्वानें महाराष्ट्रांतील टिळकपंथीय लोक गांधींच्या मागें गेलेले दिसले तरी यामध्यें आपली कुतरओढ होत आहे असेंच त्यांना वाटत होतें. 'हा गांधी आम्हांला नवें तें काय शिकवणार?' हा भाव त्यांच्यांत वसत होता. सर्वसामान्य जनता महात्मा गांधींना डोक्यावर घेऊन बेहोषपणें नाचूं लागली, विभूति म्हणून त्यांची पूजा करूं लागली, तरी टिळक–परंपरेचे येथील अभिमानी अत्यंत सावध होते. पण लवकरच येथूनच उघडपणें विरोधाला सुरवात झाली. परंपरेसंबंधींचा अभिमान, नव्या विचारांसंबंधीं एक प्रकारची तुच्छता आणि टिळकांसारखा लोकोत्तर पुढारी गेल्यानंतर आलेला खुजेपणा– यांयोगें युक्तायुक्ततेचा विचार न करतां महात्मा गांधींना आपल्या अहंकारबुद्धीनें जोराचा विरोध येथून सुरू झाला. महाराष्ट्रांतील सर्वसाधारण जनतेची ओढ गांधींकडे होती. त्याचप्रमाणें नवे तरुण कार्यकर्ते अनुयायीहि गांधींना मिळाले होते. या नव्या कार्यकर्त्यांच्या मागें प्रतिष्ठा नव्हती आणि सर्वच दृष्टींनीं प्रतिकूल परिस्थितींत त्यांना झगडावें लागत होतें. महात्मा गांधींचा कार्यक्रम, त्यामागील त्यांचा नवा विचार आणि त्यांचें नेतृत्व यांचा जुन्या टिळकपरंपरेशीं जोराचा संघर्ष चालू असतांना, आचार्य जावडेकरांनीं महाराष्ट्राच्या राजकारणांत पदार्पण केलें.

आचार्य जावडेकर विद्यार्थिदशा संपतांच राष्ट्रीय चळवळीला वाहून घ्यावयाचें या निश्चयानेंच बाहेर पडले. त्या वेळीं महात्मा गांधींच्या विभूतिमत्त्वानें ते दिपून गेलेले होते तसेंच रशियांतील राज्यक्रांतीमुळें जगाला जो नवा विचार दिसला त्यानेंहि ते आकर्षित झालेले होते. या योगें गांधींच्या प्रभावाबरोबरच मार्क्सवादी विचारांचा पगडाहि त्यांच्या मनावर सुरवातीलाच बसला. गांधींच्या अनुयायांना अभ्यासाचें जवळजवळ वावडें होतें, तर आचार्य जावडेकरांचा पिंड मूलतः तत्त्वचिंतकाचा होता. त्यांना अभ्यासाची आणि वाचनाची मोठी गोडी होती. सामाजिक आणि राजकीय घडामोडींमागील विचारांचा शोध घेऊन ते उलगडून दाखवून त्यांची संगति लावण्याचें त्यांना










एक वेड होतें; किंबहुना, गांधींच्या विचारांची संगति लावण्याला त्यांना जी प्रेरणा मिळाली ती मार्क्सवादाच्या विचारानें असं म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. बदलत्या सामाजिक स्थितीचें अवधान ठेवून राजकीय घडामोडी समजून घेतल्या नाहींत तर आंधळेपणानें अनुकरण करण्याची प्रवृत्ति वाढते. महाराष्ट्राच्या गांधीवादी कार्यकर्त्यांचा कमकुवतपणा त्या काळीं या बाबतींत सहजपणें दिसून येत असे. अशा परिस्थितींत गांधीवादाची वैचारिक बैठक समजावून देण्याचें कार्य आचार्यांनीं केलें. महाराष्ट्रांतील गांधींच्या नव्या अनुयायांना आचार्यांनीं वैचारिक बैठक दिल्यामुळें त्यांच्या संघटनेला राजकीय धार देण्याच्या शंकरराव देव यांच्या महत्त्वाकांक्षेला मोठी मदत झाली. राजकीय दृष्ट्या जागृत अशा पुढारलेल्या सुशिक्षित समाजावर टिळकपरंपरेचें मोठें वजन होतें. त्या परंपरेशीं वैचारिक भूमिकेवरून आचार्य जावडेकर–भागवतप्रभृति मंडळी दोन हात करण्यास पुढें सरसावल्यामुळें टिळकांच्या अनुयायांना सुद्धां आपल्या विरोधाचें समर्थन तात्त्विक बैठकीवरून करणें अपरिहार्य झालें. गांधींच्या तंत्रातील कांहीं गोष्टींची कुचाळी करून किंवा उथळ तर्कवादानें होणारा विरोध दुबळा ठरूं लागला. या वैचारिक संघर्षांमुळें महाराष्ट्रांत गांधीवादी विचार अक्षरशः पिंजून निघाला. गांधीवादाची चिकित्सा आपल्याकडे जितकी झाली तितकी अन्य कोठें झाली नाहीं याचें मूळ या संघर्षांत आहे.

१९३०-३२ सालीं जे कार्यकर्ते तुरुंगांत भेटत त्यांच्या उशाशीं 'दासबोध' आणि 'गीतारहस्य' हीं दोन पुस्तकें असावयाचींच. आचार्य जावडेकरांच्या उशाला 'गीतारहस्या'बरोबरच मार्क्सचें 'कॅपिटल', लास्कीचें 'ग्रामर ऑफ पॉलिटिक्स' आणि इतर समाजशास्त्र, अर्थशास्त्र व राजकारण यांवरील ग्रंथ पहावयास मिळत. ३०-३२ च्या सत्याग्रहांत जी तरुण कार्यकर्ती मंडळी युवक-संघटनेंतून पुढ आली त्यांची बैठक आचार्यांकडे सुरू झाली. कारण आचार्यांकडे अभ्यास, वाचन आणि वादविवाद यांयोगें, त्यांचीं संस्कारसुलभ उत्साही मनें सहजच आकर्षित होत. शिवाय आचार्यांच्या विद्वत्तेला दुराग्रहीपणानें कधींच ग्रासलें नव्हतें. त्यामुळें मोकळेपणानें त्यांच्याशीं चर्चा करण्यांत विशेष आनन्द अनुभवाला येई; अभ्यासाची गोडी लागे. वादविवादांत तत्त्वमंथन झाल्यावर त्यासंबंधीं अधिक चिंतनाची महती पटूं लागे. अशारीतीनें नव्याजुन्या विचारांच्या अभ्यासाची संवय आचार्यांच्या सान्निध्यामुळें ज्यांना जडली ते त्यांचे सदैव ऋणीच आहेत. पुढें लवकरच श्री. शंकरराव देव यांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कामिटी गांधींच्या अनुयायांच्या हातीं आली. त्यावेळीं नव्या समाजवादी कार्यकर्त्यांचें श्री. शंकरराव यांच्याशीं सहकार्याचे संबंध जुळवून आणण्याचें श्रेय आचार्यांनाच आहे.

वर दिग्दर्शित केलेल्या वैचारिक संघर्षाचा अखेर काय लागला हा प्रश्न उरतोच. महाराष्ट्राला गांधीवादी सत्याग्रहाची दीक्षा दिली गेली का ? यासंबंधीं बरवर विचार केला तर महाराष्ट्र सत्याग्रही झाला असें कदाचित् म्हणतां येईल कारण महाराष्ट्राची कॉंग्रेस संघटना गांधीवादी कॉंग्रेस जनांच्या हातीं आली. निवडणुकी कॉंग्रेस पक्षानें जिंकल्या तेंव्हा सत्ताहि त्याच पक्षाच्या हातीं गेली. या गोष्टीवरूनच निष्कर्ष काढावयाचा म्हटलें तर गांधीवादानें आपला ध्वज महाराष्ट्रावर लावला असें वाटेल. पण पूर्व-परंपरेची पकड सोडून महाराष्ट्राच्या मनावर आणि बुद्धीवर गांधीवादी विचारांचा कायम ठसा किंवा संस्कार कितपत उमटला असा विचार केला असतां त्याचें उत्तर स्पष्ट नकारार्थी द्याव लागेल. याचा अर्थ मात्र असा नव्हे की तथाकथित टिळक परंपरेच्या अनुयायांना या झटापटींत गांधीवादावर मात करतां आली. प्रथमतः कै. तात्यासाहेब केळकरांनी गांधींच्या लोकजागृतीच्या प्रभावी सामर्थ्यापुढें आपला बुद्धिवाद निष्प्रभ ठरतो असें पाहिल्यानंतर 'हिंदु सभा' या नांवानें एक कॉंग्रेसला प्रतिस्पर्धी संघटना उभी केली. परंतु अखेर केळकरांची विवेकशीलता तेथेंहि आडवी आली. आत्यंतिक कडवा अतिरेकी विरोध करण्याचें सामर्थ्य आपल्यांत नाहीं असें पाहिल्यानंतर महाराष्ट्रांतील जुन्या टिळक परंपरेचें पुढारीपण त्यांनी बॅ. सावरकर यांच्याकडे सोप-

विलें. जुन्या टिळक परंपरेच्या अभिमान्यांनी सावरकर वादाचा आश्रय केल्यामुळें महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनावर कोणते इष्टानिष्ट परिणाम झाले याचा विचार येथें करण्याचें प्रयोजन नाहीं.

नव्या मार्क्सवादी विचाराच्या दृष्टीनें आचार्य जावडेकरांनीं कोणती भर घातली हें दिग्दर्शित करणें जरूर आहे.

मार्क्सवादाच्या विचाराची ओळख करून देण्याचें प्राथमिक कार्य आचार्यांनीं केल व नव्या पिढीला त्याच्या अभ्यासाची गोडी लावली किंबहुना कम्युनिस्ट पक्षांतील मंडळींनीं संप, निदर्शनें, चळवळीमध्यें पुढाकार घेऊन तिच्या द्वारें नव्या तत्त्वज्ञानाची महाराष्ट्राला ओळख करून दिली. परंतु केवळ तत्त्वज्ञानाच्या बैठकीवरून हें कार्य करण्याची मातब्बरी कम्युनिस्ट पक्षाला वाटली नाहीं. कम्युनिस्ट पक्षांतील यांत्रिक अनुकरणवाद आणि चळवळींतील उपरेपणा याचा अनुभव आजहि येतो. याचें कारण समाजांत मूळ धरून असलेल्या परंपरेचा अभ्यास करून त्यावरोवर वैचारिक सामना देण्याच्या अत्यावश्यक प्राथमिक गोष्टीकडे त्यांनीं दुर्लक्ष केलें यामधेंच सांपडलें. आचार्य जावडेकर, लोकमान्याचे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ प्रभृतींनीं या क्षेत्रांत केलेली कामगिरी कम्युनिस्ट पक्षाला सुद्धां मान्य करावी लागेल. तरी सुद्धां आचार्य जावडेकर यांना मार्क्सवादी विचाराचे एक प्रभावी भाष्यकार या नात्यानें त्यांनीं केलेली कामगिरी मात्र मोठी आहे ही गोष्ट नमूद करणें अत्यंत उचित होईल.

पहिल्या महायुद्धानंतर जगांतील अनेक विचारवंतावर मार्क्सवादी विचारांची छाप पडलेली दिसते. विशेषतः १९३० पासून दुसरें महायुद्ध सुरू होईपर्यंतच्या काळांत कम्युनिस्ट विचारांचा मोठा प्रभाव जगांतील विचारवंतांवर पडलेला दिसतो. त्यानंतर एक विरोधी प्रतिक्रिया सुरू झाली. त्याला सोव्हिएट रशियांत झालेल्या अनेक घडामोडी कारणीभूत आहेत. आचार्य जावडेकर यांनी संपूर्णपणें मार्क्सवादाचा स्वीकार केव्हांच केला नव्हता.

किंबहुना, नवा मार्क्सवादी विचार आणि परंपरागत चालत आलेली जीवन विषयक दृष्टि यांचा समन्वय कसा घडवून आणतां येईल याचें चिंतन आचार्यांनीं फार केलें. सामाजिक बदलाचें किंवा क्रांतीचें जें तत्त्वज्ञान मार्क्सनें जगापुढें ठेवलें तें अपूर्ण आहे अशी आचार्यांची भावना असलेली दिसते. राजकारणाला किंवा समाजकारणाला अध्यात्माची बैठक असणें जरूर आहे अशी त्यांची मूलभूत श्रद्धा होती. सामाजिक परिवर्तनाच्या चळवळीची उभारणी ही नैतिक मूल्यांच्या आधारावरच व्हायला हवी आणि या सामाजिक प्रक्रियेंतून व्यक्तीच्या आंतरिक जीवनाची शुद्धि होणें आवश्यक आहे, अशी त्यांची दृढ धारणा होती. यामुळेंच गांधीवाद, मार्क्सवाद, यांचा अभ्यास करीत असतांना ते अध्यात्मवादाकडे वळले आणि अध्यात्माच्या बैठकीवरून नवीं जुनीं राजकीय तत्त्वज्ञानें तपासूं लागले. आत्मबळ, आत्मराज्य अशा शब्दयोजना त्यांच्या लिखाणांत वारंवार येऊं लागल्या. त्याच बैठकीवरून मार्क्सवाद, गांधीवाद यांचा समन्वय घडून आणण्याचा त्यांचा प्रयत्न चालूं असे. समाजवादी किंवा प्रजासमाजवादी पक्षाचें राजकारण त्यांना आपलें वाटत असे. अलीकडे तर गांधी, नेहरू, जयप्रकाश अशी एक राजकीय गुरुपरंपरा त्यांनी कल्पिली होती. जयप्रकाश भूदानाकडे वळले, विनोबांच्या भूदान चळवळीला त्यांनी जीवन समर्पित केलें या योगें भारतीय समाजवादानें गांधीवादाचें मार्गदर्शकत्व पत्करलें ही एक शुभ घटना आहे असें ते मानीत. त्यांनीं कल्पिलेली राजकीय गुरुपरंपरा आणि समाजवाद व गांधीवाद यांचा आपल्या कल्पनेनुसार घडवून आणलेला समन्वय हीं पाहतां त्यांनीं केलेल्या प्रयत्नांचें स्वरूप आणि यश ध्यानीं येईल. पाश्चात्य देशांत मार्क्सवादाच्या प्रभावाखालीं आलेले कित्येक तत्त्वचिंतक मागाहून कम्युनिझमचे कट्टे विरोधक बनले. कित्येक ख्रिस्ताला शरण गेले तर कांहीं आणखी कोणी संपूर्णपणें अश्रद्ध बनून या ध्येयामागें जाण्यांत आपली फलगत झाली या विचारानें जुन्या भांडवली संस्कृतीचे फिरून उपासक बनले. आचार्य जावडेकरांनी धनिक सत्तालोलुप संस्कृतीचा आश्रय किंवा उपासना कधींच

केली नाहीं. त्या संस्कृतीकडून मिळणाऱ्या प्रतिष्ठेची किंवा मान्यतेची कदर बाळगली नाहीं. स्वतःचा आचार विचाराशीं सुसंगत राहील याबद्दल नेहमीं ते जागृत असत. सत्तेच्या राजकारणाचा हव्यास त्यांना कधींच नव्हता. राजकीय चळवळीपासून ते केव्हांहि दूर राहिले नाहींत. त्यांत होणारा देहदंड, आत्मशुद्धि व विचारशुद्धि घडवून आणतो असेंच त्यांना वाटत असे. त्यायोगें त्यांच्या विचाराला सामाजिक बैठक मिळालेली होती.

आचार्यांच्या सुरुवातीच्या प्रयत्नानें समाजवादी विचार फैलावण्याला मोठी मदत झाली हें उघडच आहे. तरीसुद्धा गांधीवादी विचारांचे छायेंत स्वतंत्र समाजवादी निष्ठा निर्माण होणें व जोपासली जाणें अवघड होतें. त्यांच्या विचार समन्वयांतील सर्व समावेशकपणामुळें समाजवादी विचारांत व्यवच्छेदक-पणाचा व रेखीवपणाचा अभाव जाणवतो असेंहि कित्येकांना वाटतें. या किंवा अशासारख्या आक्षेपांची चर्चा त्यांच्या शिकवणुकीचा स्वतंत्रपणें विचार करून मगच करणें उचित होईल. त्यांच्या निधनानें एक थोर अभ्यासक व तत्त्वचिंतक आपल्यांतून गेला. या योगें महाराष्ट्राच्या वैचारिक जीवनाची मोठी हानि झाली हें निर्विवाद होय.

—श्री. र. के. खाडिलकर

---

## लोकशिक्षणरत संस्कृतिचिंतक

आचार्य श्री. जावडेकरना अकाळ अवसानना समाचार जाणी आघात थयो। तेओ देशना एक संस्कृतिचिंतक हता। एमनी प्रगल्भ राजकारणमीमांसा आजनी घडील बहु कीमती हती। मराठी साहित्यसंमेलनना पूना अधिवेशनमां प्रमुखपद शोभावता एमने जोया हता —केवा नम्रतानी मूर्ति समा हता! आवा लोकशिक्षणरत संस्कृतिचिंतक जवाथी देशने मोटी खोट पडी छे। प्रभु एमना आत्माने शान्ति अर्पो।

— उमाशंकर जोशी
( संपादक, ' संस्कृति ', अहमदाबाद )












## संपादकीय

कै. आचार्य शं. द. जावडेकर हे पुणें येथें गेल्या १० डिसेंबर १९५५ रोजीं रात्रीं १०। वाजतां निधन पावले ! त्यांच्या शरीराला जर्जर करून टाकणारा दम्यासारखा व्याधि त्यांचा चिर–साथी त्यांच्या शरीरांत घर करून बसला असला, तरी आचार्य इतके अकस्मात् इहलोक सोडून जातील अशी कल्पनाहि नव्हती. गेल्या मे–महिन्यांत कोल्हापूर येथें कोरगांवकर-ट्रस्टतर्फे भरणाऱ्या स्नेह-संमेलनांत विविध विषयांवरील चर्चेत त्यांनीं आपल्या नेहमींच्याच उत्साहानें व तत्परतेनें भाग घेतला. त्यानंतर त्यांचें लेखन चालूंच होतें. ' नवभारता'च्या गेल्या जुलैच्या अंकांत 'धर्म आणि समाजक्रान्ति' हा त्यांचा अत्यंत विचारप्रवर्तक लेख येऊन गेला व त्यांतील विविध विचारांवर पुढील नंतरच्या तीन महिन्यांत ऑगस्ट, सप्टेंबर, ऑक्टोबर या अंकांतून चर्चात्मक लेख येऊन गेले, त्यांमुळें तो लेख बराच गाजला. त्यानंतर गेल्या गांधीजयंतीच्या निमित्तानें गेल्या ऑक्टोबरच्या 'नवभारता'च्या अंकांत त्यांचा ' भारतीय संस्कृति आणि महात्मा गांधी ' हा लेख येऊन गेला. ह्या लेखाचें हस्तलिखित त्यांनीं सेप्टेंबर १० च्या सुमारास पाठविलें. हा त्यांचा शेवटचा लेख. त्यानंतर सप्टेंबरमध्येंच त्यांना न्यूमोनिआचा ताप येऊन गेला व त्यांतून ते क्षीण होऊन उठले, ती त्यांची क्षीणता शेवटपर्यंत गेली नाहीं. त्यांच्या हृदयावरहि परिणाम झाला. ३० नोव्हेंबरला आचार्य भागवतप्रभृति त्यांच्या स्नेह्यांनीं त्यांना पुण्याला आणविलें. ३ डिसेंबरला त्यांना कोयाजींच्या नर्सिंग होममध्यें नेण्यांत आलें. डॉक्टरांनीं उपचारांची शर्थ केली. त्यांच्या प्रकृतींत सारखे चढ-उतार होत होते. सभोंवतालचे लोक आशानिराशांचें आंदोलन अनुभवीत होते. आचार्य स्वत: मात्र क्षोभरहित व शांत होते. श्री. शंकरराव देव त्यांना ८ नोव्हेंबर रोजीं भेटावयास आले. ' मला फारशी आशा दिसत नाहीं ' असें आचार्य त्यांना म्हणाले. यानंतर ता. १० रात्रीं १०। ला त्यांचें प्राणोत्क्रमण झालें !

आचार्यांच्या निधनानंतर गेल्या तीन आठवड्यांत सबंध महाराष्ट्रभर अनेक वृत्तपत्रांनीं, संस्थांनीं, प्रमुख व्यक्तींनीं जें दुःख व्यक्त केलें आहे त्यावरून आचार्य जावडेकरांना महाराष्ट्रांत केवढें अनन्य-साधारण स्थान लाभलें होतें याची कल्पना येईल. त्यांच्या निधनानें 'नवभारता'चा एक मोठा आधारच नाहींसा झाला आहे. त्यांच्यासारखा परिणतप्रज्ञ विचारधुरीण सिद्धहस्त लेखक ' नवभारता'च्या संपादकवर्गांत असल्यामुळें, ' नवभारता'ला आरंभा-पासूनच असामान्य प्रतिष्ठा पावण्याचें भाग्य लाधलें होतें. ' नवभारता'चें अंतरंग आपल्या विचारधनानें समृद्ध करणारे त्यांचे लेख ' नवभारता'चें एक मोठें भांडवल होतें. त्यांच्या निधनानें ' नवभारता'ची मोठीच हानि झाली असून, ती लवकर भरून निघणें कठिण आहे.

१९४९ सालीं महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाचे आचार्य जावडेकर अध्यक्ष निवडले गेले. त्या प्रसंगीं ' नवभारता'नें मे १९४९ चा अंक ' साहित्य-संमेलनाध्यक्ष आचार्य जावडेकर विशेषांक ' म्हणून काढला होता. त्या अंकांत आचार्यांचें कार्य, विचार व व्यक्तिमत्त्व यांचें विविध दर्शन निरनिराळ्या क्षेत्रां-तील विचारवंतांनीं करून दिलेलें ' नवभारता'च्या वाचकांस आठवत असेलच. त्यानंतर आज आचार्यांचा जीवन-ग्रंथ समाप्त झाल्यावर, त्यांच्या ग्रंथांचें, विचारांचें, व्यक्तित्वाचें अग्रयावत् समालोचन व समीक्षण पुन्हां अनेक विचारवंतांकडून घडवून आणणें आवश्यक असून तें मोठें उद्बोधक व फलप्रद होईल यांत शंका नाहीं. पण तो सवडीचा व कालावधीचा प्रश्न आहे. आजच्या प्रसंगीं प्रस्तुत अंकात थोड्या अवकाशांत आचार्यांचे निकटवर्ती स्नेही, चाहते, अभ्यासू विचारवंत यांनीं करून दिलेलें आचार्यांचें विविध दर्शन वाचकांस समयोचित व विचारप्रवर्तक वाटेल, असा विश्वास वाटतो. आचार्यांच्या स्मृतीला सादर अभिवादन.

—वि. म. बेडेकर
कार्यकारी संपादक







Regd. No. B. 5177






